# श्रीसोहिरोबानाथ-कवितासंग्रह.

( यांत या कवीनें रचलेलीं पदें, सवाया, श्लोक, अभंग, आरत्या वगैरे प्रकरणें आलीं आहेत. )

कवि संत सोहिरोबा बांदेंग्रामीं वसे महाद्विज हा।
ज्याची देखुनि कविता, हरि स्वजनां भूवरी म्हणे द्विज व्हा॥

—त्रिंठोबाअण्णा दसरदार.

प्रकाशक:

वैजनाथ शिवराम देशकुळकर्णी ऊर्फ राजाध्यक्ष.

शके १८५५.] किंमत २॥ रुपये. [सन १९३३.

हा ग्रंथ श्री. मंगेश रामचंद्र टाकी यांनीं सद्भक्ति-प्रकाश प्रिंटिंग प्रेस,
३९, नानाभाई गल्ली, कोट, मुंबई, येथें छापला व तो श्री. वैजनाथ
शिवराम देशकुळकर्णी ऊर्फ राजाध्यक्ष यांनीं सरस्वती बाग,
जोगेश्वरी (मुंबई-उपनगर) येथें प्रकाशित केला.

## योगिराज श्रीसोहिरोबानाथ आंबिये.



### आर्या.

सोय पहासी बरवी जीवांची म्हणुनि 'सोहिरा' नांव ।
दिधलें मातापितरें सार्थचि करिसी तसेंहि उपनांव ॥ १ ॥
कुलाभिधान 'आंबिये' लावी अमृतफळा तरी खाया ।
काव्यमिषें ते गोडी देशी इतरां जनांहि चाखाया ॥ २ ॥

ॐ

# समर्पण

हा ' कवितासंग्रह '

सावंतवाडीसंस्थानचे प्रख्यात राजेसाहेब

## श्रीमंत खेमसावंत,

ज्यांना

## श्रीसोहिरोबानाथांबद्दल

अत्यंत प्रेम व आदर होता व ज्यांच्या चरणीं नाथांनीं
आपल्या पवित्र लेखणीस कायमचें स्थान दिलें
त्यांच्याच गादीवरील प्रेमळ भगवद्भक्त

# श्रीमंत खेमसावंत ऊर्फ बापूसाहेब भोंसले,

## सरदेसाई, राजेबहाद्दर

यांस

अत्यंत नम्रपणें समर्पण असो.

# प्रकाशकाचें हृद्गत.

**अभंग.**

**आपुलिया बळें नाहीं बोलवत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥ १ ॥**
**साळुंकी ते कैसी बोले मंजुळ वाणी । बोलविता धणी वेगळाची ॥ २ ॥**
**काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥**
**तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळां पायांविण ॥ ४ ॥**

श्रीतुकाराममहाराजांचा वरील सर्वतोमुख अभंग मला सर्वतोपरी लागूं होतो. कारण, श्रीसमर्थांच्या उक्तीप्रमाणें 'अनाथ मी हीन दीन दरिद्री' असून, 'विद्या नाहीं वैभव नाहीं' असा माझा 'पूर्विल ठेवा' असल्यामुळें, 'मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्' अशा परमानंद माधवाच्या कृपेची अपेक्षा करून तत्पदीं लीन झाल्याशिवाय, मला तर गत्यंतरच नव्हतें, आणि त्या दीनवत्सल प्रभूनें आपलें ब्रीद साच केलें, यांत संशय नाहीं. वास्तविक पहातां माझ्यासारख्या यःकश्चित् मराठी शाळामास्तरला "श्रीसोहिरोबानाथ–कवितासंग्रहा" सारखा महत्त्वाचा ग्रंथ सध्यांचे बिकट परिस्थितींत प्रसिद्ध करणें, ही कांहीं लहानसान जबाबदारीची गोष्ट नव्हे.

श्रीसोहिरोबानाथांच्या दुर्मिळ होत चाललेल्या या कवितासंग्रहाचें पुनःप्रकाशन व्हावें, असा बहुत दिवसांचा संकल्प होता. परंतु त्यास मूर्तस्वरूप येण्यास 'तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्यावीण ॥' या संतोक्तीप्रमाणें गेल्या गुरुद्वादशीपर्यंत वाट पहावी लागली. गुरुद्वादशीच्या सुमुहूर्तावर छपाईच्या कामास सुरवात होऊन, आज गुरुपौर्णिमेसारख्या शुभदिनीं हा अमोलिक ग्रंथ प्रसिद्ध होत आहे, हा एक सुयोगच होय. 'सत्य संकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥' या श्रीतुकाराममहाराजांच्या उक्तीप्रमाणें हा माझा अल्प संकल्प आज सिद्धीस जात आहे, ही केवळ भगवत्कृपाच होय.

श्रीसोहिरोबानाथांची कविता "योगिराज सोहिरोबानाथ" नामक त्रैमासिकांतून पुस्तकरूपानें कै० भगवंत बाळकृष्ण पै (रायकर) यांनीं सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध केली. प्रस्तुत कविता एकत्र करून छापण्यास कै० पै यांना अत्यंत शारीरिक व मानसिक इतकेंच नाहीं तर आर्थिकही झीज सोसावी लागली. त्यांना "योगिराज सोहिरोबानाथ" मासिकाचे खातीं सुमारें चार ते पांच हजार रुपयांचें नुकसान झालें आहे, असें त्यांच्या चिरंजीवांकडून समजतें. कै० पैंनीं एवढी झीज सोसून अर्थात् एवढा स्वार्थत्याग करून सिद्धीस नेलेली ही संतसेवा भगवंताला कितीतरी गोड वाटली असेल! त्यांच्याप्रमाणेंच त्यांच्या चिरंजीवांतही श्रीसोहिरोबानाथां-बद्दल जो आदर व जें प्रेम आज पहावयास मिळत आहे, तेंही भगवत्कृपेचें लक्षण नाहीं असें कोण म्हणूं शकेल? फार कशाला गुरुद्वादशीच्या सुमुहूर्ता-वर कामास सुरवात होऊन प्रस्तुत 'कवितासंग्रहा'चीं कांहीं पृष्ठें छापून तयार झाल्यावर, तीं घेऊन मी श्रीयुत रमाकांत भगवंत पै यांस विलेपार्लें मुक्कामीं मुद्दाम भेटावयास गेल्यावेळीं त्यांनीं माझा मोठ्या प्रेमानें सत्कार केला व हातीं घेतलेल्या ह्या पवित्र कार्याबद्दल अभिनंदनही करून आपली पूर्ण सहानुभूति व्यक्त केली. त्यांनीं 'संग्रहा'चीं छापील पृष्ठें वाचून पाहिलीं व छपाईबद्दलही समाधानकारक उद्गार काढले. यावरून श्रीसोहिरोबानाथांबद्दल त्यांना किती प्रेम आहे याची सहज कल्पना होण्यासारखी आहे.

कै० पै यांनीं श्रीसोहिरोबानाथांच्या कविता-प्रकाशनकार्यांत कै० डॉ. अनंत नारायण सांबारे, एल्. एम्. अँड एस्. यांजकडून बरीच मदत मिळाल्याबद्दलचा "योगिराज सोहिरोबानाथ" मासिकाच्या प्रस्तावनेंत येणेंप्रमाणें स्पष्ट उल्लेख केला आहे:—

"डॉ. सांबारे यांनीं बहुतेक टीपालेखांचें संशोधन आणि शेवटपर्यंत सर्व प्रुफें तपासण्याचें काम अंतःकरणपूर्वक केलें....त्यांनीं ह्या कामांत पराकाष्ठेची झीज सोसून, हें कृत्य सर्वांगपरिपूर्ण होण्यासाठीं अविश्रांत परिश्रम केलेले आहेत."

# आभारप्रदर्शन.

( १ ) प्रस्तुत ग्रंथास गुरुवर्य श्रीरामचंद्र शंकर टाकीमहाराज ऊर्फ श्रीभाई यांची प्रस्तावना त्यांच्या प्रेमळकृपेनें लाभली, हा एक मी त्यांचा अनुग्रहच समजतों. श्रींच्या संगतीचा लाभ गेलीं ४।५ वर्षें सतत होत असून त्यांच्याच आशीर्वादानें सदरहू ग्रंथाचें प्रकाशनकार्य निर्विघ्न-पणें तडीस गेलें, हें येथें नमूद करण्यास मला फार आनंद वाटतो.

( २ ) ग्रंथमुद्रणाचें काम 'सद्भक्ति-प्रकाश' छापखान्यांतील भाविक कामगारांनीं किती मन लावून केलें आहे, याची साक्ष हा ग्रंथच देत आहे. छापखान्यांतील प्रत्येक इसम मजकडे आपलेपणानें जर वागला नसता, तर हा ग्रंथ इतक्या थोड्या अवधींत आणि इतक्या उत्तमप्रकारें प्रकाशित होणें अगदीं असंभवनीयच होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ग्रंथ-प्रकाशनाचें श्रेय त्यांसच आहे. कारण, त्यांच्या मदतीशिवाय हें कार्य मजकडून पार पडलेंच नसतें. याबद्दल त्यांच्याविषयीं वाटत असलेली कृतज्ञता कोणत्या शब्दांनीं व्यक्त करावी, हेंच मला समजत नाहीं.

( ३ ) रावबहादूर आनंदराव सदाशिव दळवी, एम्. ए., माजी प्रिन्सिपॉल, एल्फिन्स्टन हायस्कूल, श्रीयुत विश्वनाथराव गणपतराव दळवी, एम्. ए. बार-ॲट-लॉ, मुंबईतील लॉ कॉलेजचे माजी प्रिन्सिपॉल व बडोद्याचे सुप्रसिद्ध हायकोर्ट वकील श्रीयुत भास्करराव नारायणराव पाटकर बी. ए., एल्. एल्. बी. या त्रिवर्गांनीं ग्रंथाच्या बाबतींत अनेक महत्त्वाच्या सूचना करून आम्हांस उपकृत केलें आहे. त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

( ४ ) गोमांतकांतील माशेल येथील सुप्रसिद्ध ह. भ. प. रामचंद्र कृष्ण कामत ( चंदगडकर ) यांनीं पद्यांची वर्गवारी वगैरे बाबतींत अनेक बहुमूल्य सूचना करून मदत केली याबद्दल त्यांचा, आपलेकडील कांहीं ग्रंथ बरेच दिवस आम्हांस वापरावयास दिल्याबद्दल रा. रा. यशवंतराव वासुदेव गुणाजी यांचा, सावंतवाडीचे फोटो-आर्टिस्ट श्रीयुत पोतनीस

यांनीं कांहीं मोबदला न घेतां मुद्दाम बांदें मुक्कामीं जाऊन नाथांचें घर, समाधि व पादुका यांचीं छायाचित्रें पाठविल्याबद्दल त्यांचा व श्रीयुत माधव गोविंद भिडे यांनीं परिश्रम घेऊन कठीण शब्दांचा कोश करून दिल्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहें.

( ५ ) ग्रंथाच्या छपाईस सुरुवात तर केलीच. पण ' सर्वारंभा-स्तंडुलाः प्रस्थमूलाः ' या वचनाप्रमाणें आर्थिक अडचण प्रामुख्यानें पुढें उभी राहिली. ज्या माझ्या अनेक हितचिंतकांनीं माझ्या विनंतीस मान देऊन यथाशक्ति द्रव्यसहाय्य केलें त्यांचा नामनिर्देश पुढें केला आहेच. या बाबतींत प्रामुख्यानें ज्यांनीं ज्यांनीं हस्तेंपरहस्तें मदत केली त्या सर्वांचा स्थलाभावामुळें नामनिर्देश न करतां अंतःकरणपूर्वक आभार मानणें, हें मी माझें आद्य कर्तव्य समजतों.

( ६ ) ग्रंथारंभीं दिलेल्या श्रीसोहिरोबानाथांच्या चरित्ररचनेस श्रीराजाराम प्रासादिकृत "भक्तमंजरीमाला," ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकरकृत "संतचरित्रमाला" व महाराष्ट्रभाषाभूषण श्रीयुत जगन्नाथ रघुनाथ आजगांवकरकृत "महाराष्ट्रकविचरित्र" या ग्रंथांचा बराचसा उपयोग झाला असल्यामुळें त्या ग्रंथकर्त्यांचा मी फार आभारी आहें.

शेवटीं, 'यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥' या भगवदाज्ञेप्रमाणें—

तुवां देउनि प्रेरणा देवराया । त्वरें लाविसि 'संग्रहा' छापवाया ।
कृपेनें तुझ्या आज संपूर्ण झाला । तरी त्वत्पदीं अर्पि सप्रेम त्याला ॥

या श्लोकद्वारा ज्याची कृति त्यासच सप्रेम समर्पण करून त्यापाशीं पुढील याचना करून तत्पदीं लीन होतोंः—

**श्लोक.**

**मच्छिंद्र गोरक्षज गैबिनाथ । शोभे जयांचे शिरिं आदिनाथ ।**
**तयांच्या कृपें सोहिरा कीं सनाथ । वांछी तियेतें अजि वैजनाथ ॥**

**आषाढ शु० १५,**
**(गुरुपौर्णिमा),**
ता. ७ जुलै, १९३३.

**प्रकाशक.**

# श्रीसोहिरोबानाथ-कवितासंग्रहाच्या आश्रयदात्यांचीं नांवें.

१ श्री. गणपतराव सखाराम राजाध्यक्ष, एम्. ए, बार-अॅट-लॉ, आय्. सी. एस्., जे. पी. रु. ५१
२ श्री. वैजनाथ राजाध्यक्ष यांचा चाहता. रु. ५०
३ श्रीमंत मातुःश्री राणीसाहेब (राजमाता) संस्थान जत. रु. ३०
४ गौड सारस्वत सामाजिक समूह-बडोदें. रु. ३०
५ श्रीमंत मातुःश्री ताराबाई राणीसाहेब-रीजंट अक्कलकोट. रु. २०
६ श्रीमंत युवराजसाहेब, संस्थान भोर. रु. २०
७ श्री. पुरुषोत्तम मंगेश लाड, बी. ए., आय्. सी. एस्., असि. आणि सेशन जज्ज, अहमदनगर. रु. १५
८ श्रीमंत रामचंद्र कृष्ण पुराणिक पनवेलकर, पनवेल. रु. ११
९ श्री. भालचंद्र शांताराम सुखठणकर, एम्. ए., एल्. एल्. बी. सॉलिसिटर, मुंबई. रु. १०
१० ,, शिवराव निळेश्वर, जोगेश्वरी, मुंबई सबर्बन्. रु. १०
११ ,, विनायक दत्तात्रेय मुजुमदार, एम्. ए., इन्कम् टॅक्स ऑफिसर, मुंबई. रु. १०
१२ ,, बी. एल्. पाटील, मामलेदारसाहेब, पेटा-शिरोळ, कोल्हापूर. रु. १०
१३ ,, विठ्ठलराव संभाजी गांगला, मुंबई. रु. १०
१४ डॉ. यशवंत शिवराम आंबिये, एल्. सी. पी. एस्., सब अॅसि. सर्जन, अहमदनगर. रु. १०
१५ श्री. द्वारकानाथ पुरुषोत्तम नाईक, माहीम, मुंबई. रु. ५
१६ शेठ द्वारकादास त्रिभुवनदास, जे. पी, मुंबई. रु. ५
१७ नामदार न्यायमूर्ती सीताराम सुंदरराव पाटकर, बी. ए., एल्. एल्. बी., जे. पी., मुंबई हायकोर्टाचे जज्ज. रु. ५

१८ श्री. विष्णु नामदेव आडारकर, जी. डी. आर्टिस्ट, मुंबई. रु. ५

१९ ,, जयराम विष्णू जोशी, विलेपार्लें, मुंबई सबर्बन्. रु. ५

२० ,, नीळकंठ शिवराम रेगे, सुपरिंटेंडेंट, अकाँउटंट जनरलचें ऑफिस, मुंबई. रु. ५

२१ ,, बळवंत विठ्ठल वाघ, बी. ई., खाररोड, मुंबई सबर्बन्. रु. ५

२२ ,, बळवंतराव कृष्णराव वागळे, बी. ए., टेस्ट ऑडिट ऑफिसर, मुंबई म्युनिसिपॅलिटी. रु. ५

२३ ,, शांताराम आत्माराम कानविंदे, हेडक्लार्क, बॉम्बे कंपनी, मुंबई. रु. ५

२४ सौ. इंदिराबाई जनार्दन नेरूरकर, मुंबई. रु. ५

२५ श्री. डी. डी. रेगे, असिस्टंट सुपरिंटेंडेंट—गव्हर्मेंट स्टेशनरी ऑफिस, मुंबई. रु. ५

२६ ,, रामचंद्र विठ्ठल परुळेकर, एम्. ए., एम्. ईडी., टी. डी., जे. पी., सेक्रेटरी, स्कूल्स कमिटी, मुंबई म्युनिसिपॅलिटी, मुंबई. रु. ५

२७ ,, रामचंद्र बाळकृष्ण हेगडे, बी. ए., मुंबई. रु. ५

२८ ,, दत्ताराम वासुदेव रेगे, मुंबई. रु. ५

२९ ,, भार्गवराम ऊर्फ मामासाहेब वरेरकर, मुंबई. रु. ५

३० ,, दत्तात्रेय कृष्ण सांडू ब्रदर्स, चेंबूर, मुंबई सबर्बन्. रु. ५

३१ ,, रंगराव कृष्णराव वेंगसरकर आणि बंधु, दादर, मुंबई. रु. ५

३२ ,, परशुराम आबाजी कर्णिक, दादर, मुंबई. रु. ५

३३ ,, पुरुषोत्तम महादेव जुवळे, दादर, मुंबई. रु. ५

३४ ,, वसंतराव कृष्णराव वागळे, दादर, मुंबई. रु. ५

३५ डॉ. वसंतराव जनार्दन राथ, एल्. एम्. अँड एस्., दादर, मुंबई. रु. ५

३६ दिवाणबहादूर गणपतराव सदाशिव राव, एम्. ए., एल्. एल्. बी., खाररोड, मुंबई सबर्बन्. रु. ५

३७ प्रोफेसर काशिनाथ रामचंद्र गुंजीकर, एम्. ए., बी. एस्. सी.,
आय्. ई. एस्., मुंबई. रु. ५

३८ श्री. यशवंतराव नारायणराव भेंडे, मुंबई. रु. ५

३९ ,, गजानन पांडुरंग कुळकर्णी, जोगेश्वरी, मुंबई सबर्बन्. रु. ५

४० ,, कृष्ण जगन्नाथ थळी, मुंबई. रु. ५

४१ रावसाहेब विनायकराव भास्करराव साखळकर, बी. ए.,
पेन्शनर हुजूर डेप्युटी कलेक्टर, पुणें. रु. ५

४२ श्री. रामचंद्र मल्हार भिसे, बी. ए., एल्. एल्. बी., असिस्टंट जज्ज, पुणें. रु. ५

४३ ,, एस्. ए., हट्टंगडी, बी. ए., एल्. एल्. बी., स्मॉल कॉज कोर्ट जज्ज,
पुणें. रु. ५

४४ ,, श्रीधर आत्माराम नाईक, रिटायर्ड चीफ जज्ज, पुणें. रु. ५

४५ ,, पी. व्ही. लाड, सारस्वत कॉलनी, पुणें. रु. ५

४६ ,, शांताराम नारायण नेरूरकर, एम् बी. बी. एस्., बी. एच्वाय्.,
हेल्थ ऑफिसर, अहमदनगर. रु. ५

४७ ,, कृष्णराव दत्तात्रेय नेरूरकर, इलेक्ट्रिकल इंजिनियर, सोलापूर-
मिल, सोलापूर. रु. ५

४८ ,, बी. बी. कामत, बी. ए., बी. एस. सी., हेडमास्तर—गव्हर्मेंट-
हायस्कूल, सोलापूर. रु. ५

४९ ,, बी. एम्. बोरकर, स्पिनिंग मास्तर—जाम मिल, सोलापूर. रु. ५

५० ,, शिवराव मुजुमदार, पोलीस इन्स्पेक्टर, जत. रु. ५

## श्रीसोहिरोबानाथ-कवितासंग्रहाची

# विषयानुक्रमणिका.

# कवितासंग्रहांतील पद्यांची वर्णानुक्रमणिका.

## (४) अभंग

परमपूज्य गुरुवर्य

# श्रीरामचंद्र शंकर टाकीमहाराज ऊर्फ श्रीभाई.



## श्लोक.

श्रीरामचंद्रचरणांबुजीं गुंग व्हावें ।
भृंगें-मनें अनुदिनीं अतिशुद्ध भावें ॥
स्वच्छंदयें श्रवणकीर्तन तें घडावें ।
श्रीविष्णुच्या हृदयिं नित्य सुखें रहावें ॥ १ ॥

# प्रस्तावना.*

॥ श्रीसद्गुरु प्रसन्न ॥

## अभंग.

आम्हां दुर्बळांची सोय लावण्यासी । अवतरलासी 'सोहीरा' तूं ॥ १ ॥
निमित्त करूनी सांडुनियां घरा । जासी वनांतरा वीतरागी ॥ २ ॥
गैबीनाथ भेटी झाली अकस्मात । गरे देतां खात बैसलासी ॥ ३ ॥
संगें पूर्वपुण्यें सत्त्वशुद्ध झालें । ज्ञानही मिळालें गुरुकृपें ॥ ४ ॥
अनुभव पदांमाजी स्पष्ट केला । ऐसा तो न झाला कोणाहातीं ॥ ५ ॥
गोडी काय वानूं तयाच्या सुखाची । 'आंबिये' नांव त्याची साक्ष देई ॥ ६ ॥
साधकांसी पदोपदीं जागवीसी । म्हणूनी तूजशी नमूं सदा ॥ ७ ॥
राम म्हणे अंतीं रामजन्म दिनीं । अदृश्य होऊनी ब्रह्म होसी ॥ ८ ॥

अभंगाच्या "**आम्हां दुर्बळांची सोय लावण्यासी । अवतरलासी सोहीरा' तूं ॥**" ह्या पहिल्या चरणांत म्हटलें आहे कीं, हे सोहिरोबा! तुम्हांला मातापितरांनीं 'सोहिरोबा' हें जें नांव दिलें तें यथार्थ असून तुम्हांला अगदीं बरोबर शोभतें; कारण, आम्हीं जे दुर्बळ म्हणजे भक्तिहीन पामर त्या आमची 'सोय' लावावी म्हणजे आम्हांस भक्तिसुख प्राप्त व्हावें म्हणून तुम्ही अवतार घेतला. जोंपर्यंत आम्हांला भक्तीचें बळ नाहीं तोंपर्यंत आम्ही दुर्बळच. एखाद्याच्या अंगीं शरीराचें, विद्येचें, धनाचें, कीर्तीचें वगैरे ऐहिक बळ असलें आणि आत्मज्ञान, वैराग्यादि पारमार्थिक बळही असलें, तरी जोंपर्यंत त्याच्याअंगीं भक्तीचें बळ नाहीं तोंपर्यंत तो

---

* शिरोभागीं दिलेल्या श्रीसोहिरोबानाथांच्या अभंगरूपी स्तवनावर गुरुवर्य **श्रीरामचंद्र शंकर टाकी** उर्फ **श्रीभाई** यांचें सद्भक्ति-मंदिर, सरस्वतीबाग, जोगेश्वरी, येथें जून १९२७ सालीं झालेलें प्रवचन '**प्रस्तावने**'दाखल येथें देत आहों.—'**प्रकाशक.**'

दुर्बळच समजला पाहिजे. षड्शास्त्रसंपन्न अशा व्यासांचें निर्गुणस्वरूपाचें ज्ञान करतलामलकवत् होतें तरी "**तोंवरि तळमळ रे! तळमळ रे! नाहीं भक्तीबळ रे!॥**" या संतवचनोक्तीप्रमाणें त्यांचें चित्त अस्वस्थ होतें; त्यांच्या मनाला मुळींच शांति नव्हती. एकदां नारदमुनि त्यांच्या बद्रीकाश्रमांत त्यांना भेटावयास आले आणि त्यांचा उद्विग्न चेहरा पाहून म्हणाले, '**अरे बाबा! तूं इतका उदासीन कां दिसतोस? अजून तुझी तळमळ गेली नाहीं काय?**' व्यास म्हणाले '**नाहीं. याकरितां जेणेंकरून माझी तळमळ जाऊन माझ्या मनाला शांति प्राप्त होईल असा कांहीं तरी उपाय मला सांगा.**' हें ऐकून नारदऋषींना कळवळा आला आणि ते म्हणाले, "**तुझी तळमळ जावयास 'भगवद्भक्ति' हाच एक उपाय आहे; म्हणून तूं भगवंताचे गुण व लीला गा म्हणजे तुझे मनोरथ पूर्ण होतील.**" व्यास म्हणाले, "**त्यांची मला कांहींच माहिती नाहीं, तेव्हां त्या मी कशा गाऊं?**" हें ऐकतांच नारदऋषींनीं त्यांना कांहीं भक्तिसूत्रें दिलीं आणि त्यांच्या आधारानें त्यांनीं श्रीमद्भागवत लिहिलें; तेव्हां त्यांची तळमळ नाहींशी होऊन त्यांना अखंडानंदाची प्राप्ति झाली. तेंच भागवत त्यांनीं आपला पुत्र जो शुकाचार्य त्यास सांगितलें व त्यांनीं तें परिक्षितीराजास सांगितल्यामुळें सर्व जगतास आज त्याचा लाभ होत आहे. सारांश, अंगीं सर्व गुण असूनही जोंवर भक्ति नाहीं तोंवर आम्हीं दुर्बळच होत. भक्तीवांचून अंतःकरणशुद्धि होणार नाहीं, भक्तीवांचून ज्ञान प्राप्त होणार नाहीं, भक्तीवांचून चित्तचैतन्य होणार नाहीं व भक्तीवांचून सगुणमोक्ष किंवा वैकुंठवास ( **भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः। ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम्** ॥ भ. गी. १८।५५ ) प्राप्त होणार नाहीं. हें भक्तिफळ साध्य करून घेण्याची सोहिरोबांनीं आमची ही सोय लावून दिली म्हणून त्यांना '**सोहिरोबा**' म्हणतात.

प्रपंचांतही प्रत्येकाचे सोयरे असतात, परंतु ते फक्त आपलें प्रापंचिक कल्याण करूं शकतात, म्हणजे आमच्या खाण्यापिण्याची, विद्याभ्यासाची, चाकरीधंद्याची वगैरे सोय करून देतात. असलेही खरे प्रापंचिक सोयरे थोडेच असतात. बहुतेक तर "**काका मामा केवानूं । अने गांठियां भजियां खावानूं ॥**" ह्या गुजराथी म्हणीप्रमाणें केवळ आपल्या स्वार्थापुरतेच सोयरे असतात.

आतां खरे प्रापंचिक सोयरे थोडेबहुत तरी आढळतात, परंतु आपलें खरें पारमार्थिक कल्याण करणारा संत सोहिरोबासारखा सोयरा तर अति दुर्मिळ. म्हणून श्रीराजाराम प्रासादींनीं आपल्या सोहिरोबांच्या चरित्रांत '**त्यांनीं पाहिली बरी सोय भक्तीची**' असे उद्गार काढिले आहेत. आम्हां भक्तिहीन जनांची सोहिरोबांनीं कशी सोय लावून दिली याचा आपण आतां विचार करूं. पुढील पदांत ते म्हणतातः—

> "तो काय प्राणी ? विसरला हरिला जन्मापासून ॥ ध्रु० ॥ करितां संसारधंदा, आठविना गोविंदा । नित्य करी द्वेषनिंदा, सांपडला भवबंधा । चिंतेनें चूर केला ग्रासून ॥ १ ॥ भुलला जो शब्दनादीं, संतोषला शास्त्रवादीं । कीर्तीसाठीं विद्या साधी, त्याला अभिमान बाधी नानाछंदीं । बुद्धि गेली नासून ॥ २ ॥ देहाला मी ऐसें मानी, निरंतर आपणा वानी । पडला संशयाचे रानीं, विचार हा न घे कानीं । डुल्लतसे मोहमदिरा प्राशून ॥ ३ ॥ अवकाश जाहल्या वेळे । भलताचि खेळ खेळे । जो गर्वमदें सदां घोळे, अन्यथा सुखांत लोळे । सांगूं जातां बोले, डोळे त्रासून ॥ ४ ॥ लटकें खरें करी बासून, संसारीं जो घेतो घांसून । नक्कल करी भारी हांसून, त्रिविधतापें घेतो लासून । दुःखशोकें दांत वासून ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे व्यर्थ जन्म, निष्फळ त्याचें क्रियाकर्म । पांघुरला शरीरचर्म, जो का नेणे मुळिंचें वर्म । कोण्या कामाचा हा काय असून ? ॥ ६ ॥."

असें कडू औषध आम्हांला आईशिवाय कोण पाजणार ? ह्या पदांत आमच्या खऱ्या स्थितीचें हुबेहुब वर्णन करून आम्हांस वैराग्य उत्पन्न व्हावें

अशी योजना केली आहे. पुढें रोग्याला भयंकर रोग झाला आहे असें सांगून कांहीं औषधोपचार न सुचविणाऱ्या वैद्याप्रमाणें अशी शोचनीय स्थिति आम्हांस नुसती दाखवून वाऱ्यावर न सोडतां सोहिरोबांनीं खालीं दिलेल्या पदांत तिच्यापासून मुक्त होण्याचा उपायही निवेदन केला आहे:—

**" हरिभजनावीण काळ घालवूं नको रे ! ॥ ध्रु० ॥ दोरिच्या सापा भिऊनि भवा । भेटि नाहीं जिवा शिवा । अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नको रे ! ॥ १ ॥ विवेकाची ठरेल ओल । ऐसे बोलावे कीं बोल । आपुल्या मतें उगाच चिखल कालवूं नको रे ! ॥ २ ॥ संतांचे संगतीनें समज । ध्यानिं आणुनि पुरतें उमज । अनुभवावीण मान हालवूं नको रे ! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे ज्ञानज्योती । तेथें कैंचि दिवसराति । तयाविणें नेत्रपातिं, हालवूं नको रे ! ॥ ४ ॥ "**

अशा वैराग्य उत्पन्न झालेल्या जीवानें प्रारब्धानुसार प्राप्त होणाऱ्या सुखदुःखाचे भोग भोगून राहिलेला सर्व काळ ह्या पदांत सांगितल्याप्रमाणें हरिभजनांत घालवावा. तो 'हरि' म्हणजे '**दुःख हरण करणारा देव**' कोण ह्याचें वर्णन सोहिरोबांनीं पुढील पदांत केलें आहे:—

**" वंदियला भगवंत, तो म्यां वंदियला भगवंत ॥ ध्रु० ॥ भवसिंधुतारक, निजसुखकारक । सकळां आदी अंत ॥ १ ॥ सज्जनरंजन, अलख निरंजन । भक्तजनां कृपावंत ॥ २ ॥ वेद झाले मुके, शेष न स्तवूं शके । ज्याचें स्वरूप अनंत ॥ ३ ॥ नव्हे नरनारी, गैबी सूत्रधारी । हालवी जो जिवजंत ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे, अनुभविं पहाणें । चित्सुखवनवसंत ॥ ५ ॥ "**

ह्या भगवंताच्या म्हणजे सगुण ईश्वराच्या—"**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै । तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥**" (श्रुति) आराधनेनें अंतःकरण शुद्ध होऊन आपोआप तत्प्रसादें सद्गुरूची भेट होते. तेव्हां त्यांना शरण गेल्यावर ते जो ज्ञानबोध करतात त्या बोधाचें स्वरूप ( **अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगंधवच्चयत् । अनाद्यनन्तं महतः परं ध्रुवं**......॥ श्रुति कठ. ३-१५) पुढील पदांत निरूपिलें आहे:—

"त्या देवाचें तूं दर्शन घे ॥ संसार मोहांतुनि त्वरित निघे ॥ ध्रु० ॥ आदि मध्य ना अंत जयाला । 'नेति नेति' म्हणती वेद तयाला । ज्यापासुनि हा ॐकारहि जाहला । ब्रह्मा विष्णु हर हे तिघे ॥ १ ॥ अगम्य अगोचर सत्ता ज्याची । सहज लीला हे त्याची । जारज स्वेंदज अंडज उद्भिज्ज । ज्यापासुनि हे सहज निघे ॥ २ ॥ दृश्य सकळही टाकुनि जातां । निरालंबिं राहातां । प्राणापान ऊर्ध्वहि वाहतां । आनंद-भुवनीं मन हें रिघे ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा शून्याकार । रूप नाहीं आकार । परब्रह्मचि निर्विकार । आंत बाहेर अवघें ॥ ४ ॥"

हें निर्गुणज्ञान कसें प्राप्त करून घ्यावयाचें याची सविस्तर हकिगत सोहिरोबांनीं खालील पदांत दिली आहे:—

"ऐसी करीं हो! दया । परतोनि मन न धरीं, या देहाची माया ॥ ध्रु० ॥ कवणे ठाया कवण गेलें । कवणें काय भेटविलें ॥ अवचटेंचि काय झालें । उमज ना जया ॥ १ ॥ पाहों जातां जया आदीं । अंतीं लागली समाधी ॥ गेलियाची नाहीं शुद्धि । आपुलिया ठाया ॥ २ ॥ मी मजला पावुनि । स्थिर तेथें राहुनि ॥ कल्पनाही जाय जंव । आपआपें लया ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निरामया । झालीच ना हेचि काया ॥ मिठि पडली चिन्मयासी । मिनली तन्मया ॥ ४ ॥"

ह्या पदाचा अर्थ असा आहे कीं, "सद्गुरूनें माझ्याकडे कृपादृष्टीनें पाहतांच माझें देहभान जाऊन मी काय पाहिलें व काय झालें हें मला मुळींच सांगतां येत नाहीं" [**"अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानतां"** "आपणांस परब्रह्म कळलें असें जे म्हणतात त्यांना तें कळलेलें नसतें, आणि तें आपणांस कळलें हें ज्याना कळत नाहीं त्यांना तें कळलेलें असतें." केन. २-३ ]. परंतु मी इतकें सांगूं शकतों कीं कधींही न अनुभवलेला आनंद मला प्राप्त होऊन ( **यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह । आनन्दं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कदाचन** ॥ श्रुति ) मला कसलीच इच्छा राहिली नाहीं ( **आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः । किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंचरेत्** ॥ श्रुति ). असा पूर्ण व्यतिरेकान्वयबोध

सद्गुरूपासून झाल्यावर चित्तचैतन्य होण्यास सर्वेश्वराची ( १ ) प्रार्थना कशी करावी ? व ( २ ) स्वरूपाभ्यास कसा करावा ? हें अनुक्रमें पुढील दोन पदांत शिकविलें आहे:—

( १ ) "तुजविण रे भगवान ! कोठेंचि मन हें न जडो ॥ ध्रु० ॥ मिथ्या ऐसें दिसोनि सकळही विषयसौख्य नावडो । प्रारब्धास्तव जे जे समयीं घडेल तें सुखें घडो ॥ १ ॥ योगलक्ष निजधैर्य जडजिवां मोहांत ना सांपडो । आयुष्य पुरल्या देह तरी कोठें पडेल तेथें पडो ॥ २ ॥ प्रपंचरहाटीं वर्तत असतां कोणीकडे ना अडो । वैराग्यअग्निनें प्रचंड होउनि अखंडीत कडकडो ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा विपरित बुद्धीचा कुसंग हा विघडो । मुमुक्षु होउनि केवळब्रह्मिचें मोक्षद्वार उघडो ॥ ४ ॥";

( २ ) "तुम्ही अचलपदीं राहोन सदोदित अद्वयसुख कां घ्या ना ? ॥ ध्रु० ॥ प्रथमहि वाटत गोड विषयसुख, अंतीं विषवत् भाना । श्रवण मनन अध्यात्मनिरूपण क्षणभरि चित्त कां द्या ना ? ॥ १ ॥ मायामोहें भ्रमतां रमतां, चेष्टा करितां नाना । ध्यानीं भजनीं मनची नसतां, व्यर्थचि करितां तनाना ॥ २ ॥ जागृति, स्वप्न, सुषुप्तित साक्षी कवण तो आणुनि ध्याना । कमलदलिं जसें अलिवत् मन हें, आत्मस्वरूपीं कां न्या ना ? ॥ ३ ॥ अभिप्राय गुरुगम्य हें दुर्लभ जाणुनि आत्मज्ञाना । म्हणे सोहिरा ब्रह्मभुवनिचें परमामृत कां प्या ना ? ॥ ४ ॥."

अशारीतीनें अर्थात् ज्ञानयुक्त भक्तीनें चित्तचैतन्य झाल्यावर म्हणजे साधकास सिद्धदशा प्राप्त झाल्यावर त्याची स्थिति कशी होते तिचा उल्लेख श्रीसोहिरोबांनीं खालील पदांत केला आहे:—

"आजी हा जीव ब्रह्मानंदीं रमला रे ! ॥ ध्रु० ॥ संदेहीं न पडतां, देहीं पाहतां, विदेही मी हा गमला ॥ १ ॥ दिनमान, नाहीं कीं दिव्यमान, तेजें अभिमान, सहज दमला ॥ २ ॥ आंगीं चिन्हें उमटलीं कैशीं, कीं पुन्हा नये ऐशीं, गुन्हा सकळ खमला ॥ ३ ॥ जैसे सतीप्रति कांपती, कीं जन भूपती, तैशीं इंद्रियें जपती, अमला ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा भूतीं कीं भरला, भरोनि उरला, ज़वळ दुरला, न कळे मला ॥ ५ ॥"

वर दिलेल्या स्तवनपर अभंगाच्या '**निमित्त करूनी सांडुनियां घरा । जासी वनांतरा वीतरागी ॥**' ह्या दुसऱ्या चरणाचा अर्थ असा आहे कीं, 'तुम्ही जन्मतःच पूर्ण वैराग्यशील असून तुमचें अवतारकार्य प्रगट होण्याचा समय येतांच कांहीं निमित्त करून तुम्ही घर सोडून वनांतरास जाण्यास निघालांत.' तें निमित्त असें घडून आलें:—एके दिवशीं सोहिरोबांचा वरिष्ठ अधिकारी कांहीं कारणानें त्यांना टाकून बोलला, त्याबरोबर त्यांनीं लेखणी खालीं ठेवून प्रपंच सोडून देऊन ते भगवत्प्राप्तीच्या मार्गास लागले. मी वडिलांच्या मुखांतून ऐकलेली हकीगत अशी आहे. सोहिरोबांच्या छापून प्रसिद्ध झालेल्या चरित्रांत ती निराळ्या तऱ्हेनें दिली आहे. तरी सोहिरोबांस गऱ्यांचा प्रसाद मिळतांच गैबीनाथांचा उपदेश झाला (**प्रसादे सर्व दुःखानां हानिरस्योपजायते । प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते** ॥ भ. गी. २।६५) ह्या मुख्य मुद्द्याविषयीं सर्वांची एकवाक्यता आहे. असो. सर्व अवतारी पुरुषांची हीच स्थिति असते. म्हणजे त्यांना वैराग्य प्रकट होण्यास कांहीं तरी निमित्त घडून येतें. श्रीतुळसीदासांचेंच उदाहरण घ्या. त्यांची बायकोवर अत्यंत प्रीति असल्यामुळें ते कधींही तिच्यापासून दूर रहात नसत, व तिला माहेरींही बिलकूल धाडीत नसत. तिच्यावांचून त्यांना चैनच पडत नसे. एकदां ते कांहीं कामाकरितां बाहेरगांवीं गेले होते. त्या संधींत त्यांची परवानगी घेऊन बायको माहेरीं गेली. काम आटपून ते घरीं आले. बायको माहेरीं गेल्यामुळें त्यांना चैन पडेना म्हणून ते लगेच रातोरात ज्या गांवीं तिचें माहेर होतें तिकडे जाण्यास निघाले. घराजवळ येऊन वर पाहतात तों एक खिडकी उघडी असून तिच्यावर दोरासारखें कांहीं तरी लोंबत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यांना वाटलें कीं आपल्याच बायकोनें आपण येणार म्हणून खिडकी उघडी ठेवून आपल्याला चढण्याकरितां दोरही टांगून ठेवला आहे. परंतु तो दोर नसून खरोखर एक मोठा भुजंग होता. तो दोर आहे असें समजून त्या सर्पाच्या आधारानें खिडकीवर चढून

स्वारी खोलींत उतरली. त्यावेळीं त्यांची स्त्री निजलेली होती, तिला त्यांनीं उठविलें. ती जागी झाल्यावर तिनें पहिला प्रश्न केला कीं, आपण कोठून व कसें आलांत ? त्यावर त्यांनीं जबाब दिला कीं, तूंच माझ्याकरितां खिडकी उघडी ठेवून चढतां यावें म्हणून दोरही तूंच टांगून ठेविला होतास ना ? त्याच्या आधारानें मी येथें आलों. दोर आपण बांधला नव्हता हें तिला माहीत होतें, म्हणून दिवा घेऊन ती खिडकींतून पाहते तों तिला एक मोठा थोरला भुजंग दिसला. त्याबरोबर ती घाबरली व आपल्या नवऱ्यास म्हणाली, आज केवढा अनर्थ झाला असता ? सर्पदंश होऊन आज आपण जीवित्वास अंतरलां असता. काय हें तुमचें माझ्या ठिकाणीं प्रेम ! माझ्या ठिकाणीं जें आपले प्रेम आहें तेंच जर प्रभू रामचंद्रांच्या ठिकाणीं असतें तर जिवाचें सार्थक तरी झालें असतें ( **जैसी अभिरुचि विषयीं तैसी परमेश्वरीं असेल जरी । तरी मग काय उणें बा ! चारी पुरुषार्थ राबतील घरीं ॥** मोरोपंत). हें ऐकल्याबरोबर श्रीतुलसीदासांना पश्चात्ताप होऊन तीव्र वैराग्य उत्पन्न झालें, आणि त्यांनीं पत्नीला सांगितलें कीं, आजपासून तूं माझी माता आहेस. पुढें ते मोठे रामभक्त झाले, आणि त्यांनीं हिंदी भाषेमध्यें वाल्मीकीसारखेंच रामायण लिहिलें. तसेंच श्रीरामदासस्वामी लग्न करण्याचें त्यांच्या मुळींच मनांत नसतां केवळ मातोश्रीच्या आग्रहावरून लग्नाला उभे राहिले. पण त्यांच्या कानांत 'सावधान' हे शब्द पडतांच ते खरोखरच सावध होऊन लग्नमंडपांतून पळून जाऊन परमार्थास लागले. आम्ही किती वेळां 'सावधान' हे शब्द ऐकतों परंतु पूर्वसंस्कार अनुकूल नसल्यामुळें आमच्या मनावर त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं.

आद्यसद्गुरु श्रीनारायणमहाराज जालवणकर यांची पत्नी व मूल निवर्तल्यावर मागें कांहीं बंधन राहिलें नसून परमार्थ करण्याकरितां म्हणजे गिरनार पर्वतावर श्रीगुरुदेव दत्तात्रेयांची भेट घेण्याकरितां मी आतां मोकळा झालों असें वाटून त्यांनीं पेढे वांटले. परंतु ही गोष्ट जनांस चमत्कारिक दिसेल

म्हणून नदीवर गेलों असतां पाय घसरला तेव्हां नदींत पडून बुडून मेलों असतों पण ईश्वरकृपेनें बांचलों याबद्दल पेढे वाटले असें निमित्त केलें.

श्रीएकनाथमहाराज जसे इतर गुणांनीं मंडित होते, तसेच ते व्यवहारचतुरही असल्यामुळें जनार्दनस्वामींनीं हिशेब ठेवण्याचें जबाबदारीचें कामही त्यांजवर सोंपविलें होतें. एके दिवशीं नाथ हिशेब तपाशीत असतां जमेचा व खर्चाचा मेळ बसण्यास एका पैशाचें अंतर पडूं लागलें. नाथांनीं चूक शोधून काढण्यांत बरीच रात्र घालविली, तथापि चूक कांहीं केल्या सांपडेना इतक्यांत, जनार्दनस्वामी जागे होऊन पहातात तों एकनाथांच्या खोलींत दिवा जळत असून एकचित्तानें ते कांहीं कामांत गुंतले आहेत. स्वामी खोलीजवळ जाऊन पाहतात तों नाथांनीं दप्तर उघडलें असून हिशेब मोठ्या एकाग्रतेनें तपाशीत आहेत. त्यांची एकाग्रता एवढी झाली होती कीं, जनार्दनस्वामी त्यांच्या पाठीमागें येऊन उभे राहिल्याचें भानही त्यांस नव्हतें. नाथांच्या ह्या अपूर्व एकाग्रतेचें जनार्दनस्वामींस फार कौतुक वाटलें. इतक्यांत नाथांना हस्तदोषानें विपरीत पडलेला आंकडा आढळून चूक सांपडली व त्यांनीं आनंदभरांत मोठ्यानें टाळ्या पिटल्या व गदगदां हासूं लागले.

जनार्दनस्वामींनीं नाथांस प्रेमानें विचारलें, "बाळा ! तुला एवढा आनंद होण्यासारखी अपूर्व गोष्ट कोणती घडली ?" स्वामींचे हे शब्द ऐकून नाथ विस्मित झाले व चरणीं वंदन करून म्हणाले, "हिशेबांत एक पैशाचा मेळ मिळत नव्हता, तों आपल्या कृपेनें चूक आतांच लक्षांत आली व म्हणून आनंदानें टाळी वाजविली." जनार्दनस्वामी म्हणाले, "बाळा ! एकनाथा ! ! ही एक पैशाची चूक सांपडल्यानें जर तुला एवढा आनंद झाला, तर ज्या चुकीनें तुझी व परमात्म्याची तुटातूट झाली आहे ती चूक सांपडली असती तर तुला किती बरें आनंद होईल !" जनार्दनस्वामींनीं असें म्हणून नाथांकडे

कृपादृष्टीनें पाहिलें, तोंच त्यांना अष्टसात्त्विकभाव उत्पन्न झाले व देहभाव समूळ नष्ट होऊन ते अचेतन टोणप्याप्रमाणें जनार्दनस्वामींच्या चरणांवर पडले. साक्षात्कारास जरूर अशी नाथांची मनोभूमिका शुद्ध झालेली पाहून जनार्दनस्वामींनीं त्यांत ज्ञानबीज पेरिलें. अर्थात् नाथांस त्या घडीसच पूर्णबोध प्राप्त होऊन ते कृतार्थ झाले.

प्रसिद्ध साधु मध्वमुनीश्वर हे अमृतरायांचे समकालीन होत. असें सांगतात कीं, रायजींचा स्वभाव अंमळ थट्टेखोर असल्यामुळें, त्यांनीं मध्वमुनीश्वरांची एकदां थट्टा केली. परंतु त्यामुळें, मुळींच न रागवतां, मुनीश्वरांनीं रायजींस इतकेंच म्हटलें कीं, "तुम्हांला परमेश्वरानें अमृतासारखी वाणी दिलेली आहे; शिवाय तुमच्या आईबापांनीं तुमचें नांवही 'अमृतराय' असें ठेविलें आहे. असें असतां त्या वाणीचा असा दुरुपयोग करण्यापेक्षां तिला तुम्ही जर ईश्वरस्तुतीकडे लावाल तर केवढा फायदा होईल बरें ?" मुनीश्वरांचें हें भाषण रायजींच्या पश्चात्तापास निमित्त होऊन ते त्या दिवसापासून परमार्थाकडे वळले. असो. हे पांच तर अवतारी पुरुषच होते. परंतु नुसता योगभ्रष्टही त्याचा भाग्योदयकाळ आला म्हणजे अशाच कांहीं निमित्तानें प्रपंचांतून परमार्थाकडे वळतो ( **तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥** भ.गी. ६।४३ ).

वरिष्ठ अधिकाऱ्याचें कटुवचन श्रीसोहिरोबांच्या वैराग्यास निमित्त होऊन ते घर सोडून अरण्याच्या मार्गानें निघाले. परंतु माध्यान्हकाळ होतांच त्यांना भूक लागली—देहधर्माप्रमाणें ती लागलीच पाहिजे—म्हणून एका झाडाचे छायेखालीं बसून बरोबर आणलेला फणस फोडून गरे काढण्यांत त्यांची एकाग्रता झाली होती. इतक्यांत अभंगाच्या "**गैबीनाथ भेटी झाली अकस्मात । गरे देतां खात बैसलासी ॥**" ह्या तिसऱ्या चरणांत सांगितल्याप्रमाणें '**अलख निरंजन**' हे शब्द त्यांच्या कानीं पडले व डोळे उघडून

पाहतांच श्रीगैबीनाथांची दिव्य मूर्ति अकस्मात् त्यांच्या दृष्टीस पडली. प्रत्येक कार्याला कांहींतरी कारण लागतेंच. परंतु तें नेहमीं सर्वांस समजतें असें नाहीं. त्याप्रमाणें श्रीगैबीनाथ हे कोण, कोठून व कशाकरितां त्याच वेळीं तेथें आले हें त्यांना समजेना. तथापि हे कोणी अलौकिक पुरुष आहेत अशी त्यांची खात्री होऊन त्यांनीं त्यांना आदरानें बसा म्हणून सांगितलें व काढलेले सर्व गरे त्यांना श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत अर्जुनास—

**" यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ "** [९।२७]

ह्या श्लोकांत उपदेशिल्याप्रमाणें अर्पण केले. श्रीसोहिरोबांनीं भक्तीनें दिलेले हे गरे—

**' पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ "** [९।२६]

या न्यायानें श्रीगैबीनाथांनीं मोठ्या आनंदानें खाल्ले व राहिलेले पांच गरे त्यांना प्रसाद म्हणून खावयास दिले. श्रीसोहिरोबांना वैराग्य तर पूर्वींच झालें होतें व आतां सत्संगतींत कर्म ईश्वरार्पण झाल्याच्या योगानें त्यांची शास्त्रोक्त चित्त-शुद्धि होऊन ते स्वरूपबोध घेण्यास अगदीं पात्र झाले होते. याकरितां—
**" संगें पूर्वपुण्यें सत्त्वशुद्ध झालें । ज्ञानही मिळालें गुरुकृपें ॥ "**
ह्या चवथ्या चरणांत " पूर्वपुण्याईनें सत्संगति प्राप्त होऊन चित्तशुद्धि-द्वारा श्रीसोहिरोबांना पूर्ण आत्मज्ञान झालें" असें निवेदिलें आहे. श्री-सोहिरोबा हे अवतारी पुरुष असल्यामुळें त्यांना व्यतिरेकान्वयें तात्काळ पूर्ण स्वरूपबोध होऊन ( **आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळ वेळ तयांलागीं** ॥ तुकाराममहाराज ) त्यांचें चित्त अर्जुन, उद्धव, हनुमंतादि भक्तांप्रमाणें त्याच बैठकीवर भगवद्रूप झालें यांत कांहीं आश्चर्य नाहीं !

श्रीमुकुंदराजांनीं "**आनंद आनंदासी घोटी । बोलतां परेसी पडे मिठी । मुक्यानें सुखाच्या गोठी । केंवि कीजे** ॥ " ह्या ओंवींत म्हट-

त्याप्रमाणें ब्रह्मानुभवाचें वर्णन करणें कोणासही शक्य नाहीं. तथापि श्रीसोहिरोबांनीं नाना व्यावहारिक दृष्टांत देऊन आपल्या अनेक कवितांमध्यें सोप्या व गोड भाषेंत त्या अनुभवाची जितकी फोड करून समजूत केली आहे तितकी आपल्या आद्यगुरु श्रीनारायणमहाराजांच्या सागरांवांचून इतर कोणत्याही ग्रंथांत केलेली क्वचितच आढळते हा "**अनुभव पद्यांमाजी स्पष्ट केला । ऐसा तो न झाला कोणाहातीं ॥**" ह्या पांचव्या चरणाचा आशय आहे.

साधकास सद्गुरूपासून स्वरूपाचा बोध झाल्यावर स्वरूपाची गोडी लागून त्याचा अभ्यास उत्तम रीतीनें व्हावा म्हणून श्रीसोहिरोबांनीं योजिलेले उपाय आम्रफळासारखे अनुपम्य आहेत. उदाहरणार्थ, "**तुम्ही अचलपदीं राहोन सदोदित अद्वयसुख कां घ्या ना ? ॥**" ह्या वर दिलेल्या पदांतील "**कमलदलीं जसें अलिवत् मन हें, आत्मस्वरूपीं कां न्या ना ? ॥**" या चरणांत स्वरूपाच्या गोडीच्या वर्णनाची शिकस्त केली आहे. कारण, कठीण लांकडें कोरणारा भ्रमर देखील कमलाच्या मकरंदांत गुंग होऊन त्यांच्या अतिकोमल वेष्टनांतूनही बाहेर येऊन जीव वांचविण्यास असमर्थ होतो. परंतु ज्या अनुभवाच्या अभ्यासाची गोडी श्रीसोहिरोबांनीं लावून दिली आहे, तो अनुभव गुरुमुखानें '**तत्त्वमसि**' वाक्य ऐकल्यावांचून मुळीं होतच नाहीं, असें ह्याच पदाच्या '**अभिप्राय गुरुगम्य हें दुर्लभ जाणुनि आत्मज्ञाना ।**' ह्या शेवटल्या चरणांत त्यांनींच प्रतिपादन केलें आहे. असें असून कांहीं सुशिक्षित लोकही साधूंना पंगु म्हणतात हें मोठें आश्चर्य आहे ! त्यांची कानउघाडणी 'कविचरित्रां'तील खालील दोन वाक्यांत केली आहे:—

"इतिहासाकडे पाहतां शहाजी, शिवाजी, शाहू, बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, विजापूरचा एक बादशहा, चिमाजी आप्पा, महादजी शिंदे, अहल्याबाई होळकरीण, कोल्हापूरचा संभाजी व तिसरा शिवाजी, सावंतवाडीचे सरदेसाई, शिधोजीराव निपाणकर, बापू गोखले या सगळ्या राजकारस्थानी सत्पुरुषांचा आनंदतनय, रामदास,

तुकाराम, स्वानंदस्वामी, कचेश्वर, धावडशीकर, ब्रह्मेंद्रस्वामी, मुक्तेश्वर, **सिद्धेश्वर,** गोपाळनाथ, चिदंबर दीक्षित इत्यादि सत्पुरुषांशीं शिष्यसंबंध होता व ह्यांच्या आशीर्वादाची त्यांस आवश्यकता वाटत होती, ही गोष्ट स्पष्टपणें सिद्ध होत आहे. आतां हे सगळे साधु जर अगदीं 'पंगु' होते, तर त्यांच्या आशीर्वादाची वर नमूद केलेल्या राजकारणी पुरुषांस एवढी आवश्यकता वाटण्याचें कारण काय ?"

येथें जर कोणी असें म्हणेल कीं, हे सर्व बडे लोक प्रापंचिक सुखाकरितां नव्हे तर पारमार्थिक सुखाकरितांच गुरूस शरण गेले होते, तर ज्या कोणास गुरूपासून स्वरूपाचा बोध झाला असेल त्याच्याच हातून जगताचें कल्याण होतें, इतरांकडून कधींच होत नाहीं असें पुढील उताऱ्यांत स्वामी विवेकानंद सकारण प्रतिपादन करतात:—

"ज्याला आत्मानुभव झाला असेल तो मनुष्य ऐहिक गोष्टींनीं लिप्त होत नाहीं व अशाच प्रकारचा मनुष्य जगाचें कांहीं तरी बरें करूं शकतो. आत्मानुभवाच्या स्थितींतील मनुष्याचें असें द्विधारूप आहे. परक्याचें बरें कां करावें याचें कारण अशाच मनुष्याला पूर्णपणें अवगत असतें. तो कोणाचें बरें करतो यांत त्याच्या ठिकाणीं अहंभाव असतो असें म्हणतां येत नाहीं; कारण, जेथें 'अहं' शिल्लक आहे तेथें भेदबुद्धि आहे. त्याच्या ठिकाणचा अहंभाव पूर्ण नाहींसा झालेला असतो. त्याचा अहंकार नष्ट होऊन तो ब्रह्माकार झालेला असतो. तो कोणावर जें प्रेम करतो अथवा कोणाला जी सहानुकंपा दाखवितो तिचें स्वरूप वैय्यक्तिक नसून विश्वव्यापी असतें. त्याच्या ठिकाणचें '**मी**' जाऊन तेथें '**तूं**' आलेलें असतें. दुसऱ्याच्या ठिकाणींही मीच असल्यामुळें तो दुसऱ्याला मदत करीत असतो." ( सप्तमखंड. )

याकरितांच हल्लींचे राजकारणी पुरुष वर सांगितलेल्या पूर्वीच्या पुरुषांपेक्षां कोणत्याहीप्रकारें कमी योग्यतेचे नसून त्यांना पाहिजे तसें यश येत नाहीं हें आपल्या दृष्टोत्पत्तीस पडतें याचें कारण त्यांना गुरूचें पाठबळ (**सद्गुरू सारिखा असतां पाठीराखा । इतरांचा लेखा कोण करी ॥ राजयाची कांता काय भीक मागे । मनाचिया जोगें सिद्धी पावे ॥** ज्ञानेश्वर) नाहीं हेंच समजलें पाहिजे. अशा गुरूची आवश्यकता 'शंकरसुधें'तील पुढील अभंगांत दाखविली आहे:—

**"गुरुपाठबळ जयासि असेना । काय त्याच्या ज्ञाना करावें हो ॥ १ ॥**
**गुरुकृपा ज्ञान गुरुकृपा भक्ति । तेचिही विरक्ति जाणा सत्य ॥ २ ॥**

गुरुविण यज्ञ गुरुविण जप । गुरुविण तप बोलों नये ॥ ३ ॥
गुरु तो करावा अनुभव घ्यावा । मग तो भजावा ईश्वरत्वें ॥ ४ ॥
तेणें जीवन्मुक्ति लागतां पायासी । जावें वैकुंठासी राम म्हणे ॥ ५ ॥"

आतां कित्येक लहान सहान नसून मोठी माणसेंही, जगतांत गुरूच्या योग्यतेचे पुरुष आम्हांस कोठेंच दिसत नाहींत असें उघडपणें म्हणतात. हें म्हणणें जगांत आपणास कोणीच चांगला मनुष्य दिसत नाहीं असें दुर्योधनाच्या म्हणण्यासारखेंच आहे. तथापि, इतकें खरें आहे कीं, गुरूच्या योग्यतेचे पुरुष जगतांत पुष्कळ नसून फारच थोडे असतात **(ब्रह्म अनुभव अनुभवती ते सज्जन साधु घरोघरीं कैंचे ॥ सच्चित्सुखमय जनीं असे परि ते यतिराज मठोमठीं कैंचे ॥)** व ते देखील खऱ्या उत्कंठतेवांचून कोणास कधींही भेटत नाहींत **(सच्चे दिलकी दोर लगी जद् नारायण गुरु पाया ॥** नारायणमहाराज ). परंतु असे सत्पुरुष जगतांत मुळींच नाहींत हें विधान अगदीं खोटें आहे. कारण, तें खरें असतें तर मुकुंदराय, ज्ञानोबाराय, एकनाथमहाराज, रामदासस्वामी, तुकाराममहाराज, वामनपंडित, सोहिरोबा, नारायण-महाराज, रामकृष्ण परमहंस आदिकरून शेंकडों संत आजपर्यंत जो जगदुद्धार करीत आले आहेत तो झालाच नसता ! शिवाय आणखी एक गोष्ट ध्यानांत धरण्यासारखी आहे ती ही कीं, 'गुरु' व 'नाम' यांना सोन्यारुप्याच्या नाण्यासारखी आंगची किंमत ( intrinsic value ) असते, म्हणजे ज्याप्रमाणें सोन्यारुप्याच्या नाण्यावरील छाप झिजून गेला असतां त्याला जरी त्या नाण्याची पूर्ण किंमत येऊं शकत नाहीं तरी नाण्यांतील सोनें व रुपें यांची किंमत पदरांत पडण्यास केव्हांही अडचण पडत नाहीं, त्याप्रमाणें '**गुरु**' चांगला नसतां व '**नाम**' वेडेंवांकडें घेतलें असतां जरी लगेच आत्मज्ञान होणार नाहीं तरी तेणेंकरून पातकांचा नाश होऊन खऱ्या गुरूची म्हणजे सद्गुरूची गांठ पडून व नामाचें संकीर्तन—म्हणजे योग्यप्रकारें अर्थात् जसें व्हावयास पाहिजे तसें—होऊन

आत्मज्ञान प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं. उदाहरणार्थ, आपण बाजारांतून धातूची मूर्ति विकत आणतों ती निर्जीव व गुणरहित असते परंतु तिच्या प्राणप्रतिष्ठेबरोबर कोणत्याही एका देवाचें नाम तिला देण्यांत आलें कीं, ती सजीव होऊन त्या देवाचे गुण तिच्यामध्यें आपोआप येतात (**हरिगुण हरिनामें धातुमूर्तीस आले**) हा सिद्धांत आहे. तसेंच गुरूसंबंधानें एकलव्या नांवाच्या कोळ्यास द्रोणाचार्यांनीं धनुर्विद्या शिकविण्याचें नाकारल्यावरून त्यानें त्यांच्या पादुका गुरुस्थानीं स्थापून तो संपूर्ण धनुर्विद्या शिकला ही गोष्ट तर पुराणप्रसिद्धच आहे.

श्रीसोहिरोबांचा अवतार आंबिये ऊर्फ आंबे कुळांत झाल्यामुळें त्यांना सद्गुरूपासून मिळालेल्या ब्रह्मानुभवाची गोडी साधकांस लावून देण्याचा सुयोग आला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें अभंगाच्या "**गोडी काय वानूं तयाच्या सुखाची । 'आंबिये' नांव त्याची साक्ष देई ॥**" या चरणांत निवेदिलें आहे. श्रीराजाराम प्रासादीनें श्रीसोहिरोबांस आंबिये हें उपनांव मिळण्याचें पुढील दोन ओंव्यांत आणखी एक कारण दिलें आहे तेंही सयुक्तिक आहे:—

> "उपनाम आंबिये शोभायमान । उतरती भवाब्धिपार करून । ना तरी अच्युतवृक्षासि जाण । नामाभिधान आंबिये तें ॥ स्वस्वरूपापासूनि नव्हे च्युत । यालागीं नामें आंबिये अच्युत । सोहिरोबा आंबिये धन्य संत । अवतार प्रत्यक्ष गहिनीचा (?) ॥"

मनुष्यांचे पामर किंवा बद्ध, आर्त किंवा विषयी, जिज्ञासु किंवा मुमुक्षु, अर्थार्थी किंवा साधक व ज्ञानी किंवा सिद्ध असे पांच वर्ग आहेत. त्यांपैकीं पहिले पामर किंवा बद्ध हे अति कनिष्ठ प्रतीचे मानव होत. ते देव जाणत नाहींत व धर्मही जाणत नाहींत. किंबहुना जनावरांसारखे "आहार, निद्रा, भय व मैथुन" या चोहोंपलीकडे ते कांहींच

जाणत नाहींत. ते नररूपी खर भगवद्गीतेंतील 'पापयोनी' किंवा अतिशूद्र समजावे. दुसरे आर्त किंवा विषयी हे देवाचें भजन करितात व धर्माचें आचरणही करितात. परंतु तें भजन व धर्माचरण त्यांच्या त्यांच्या कामनेपुरतेंच असतें. ते भगवद्गीतेंतील शूद्र समजावे. तिसरे जिज्ञासु किंवा मुमुक्षु हे देवाचें भजन व स्वधर्माचरण ज्ञान किंवा मोक्ष-प्राप्त्यर्थ निष्काम करितात. ते भगवद्गीतेंतील वैश्य समजावे. येथें कोणास अशी शंका येईल कीं, ज्ञान किंवा मोक्षप्राप्त्यर्थ केलेलें कर्म निष्काम कसें होईल ? तिचा परिहार यथार्थदीपिकेंत केला आहे, तो असा:—

> **" गोड चरित्र ऐकावें । तेंचि मधुरकंठीं गावें । ताल मृदंग प्रभावें । कीर्तन करावें बहु गोड ॥ चांगलें रूप स्मरावें । कीं चांगलें भगवदर्चन करावें । ऐशा अपेक्षेनें भरावें । हाही काम ॥ संसारवनातें तोडी । हरिभक्तीची कुऱ्हाडी । परि त्याच वनाच्या काष्ठाची दांडी । घालावी तीस ॥ कीं कामावांचूनि मन । भलत्या गोष्टीचें न करी साधन । मनें मोक्ष मनेंचि बंधन । हा सिद्धांत ॥ संसारअरण्याचेंचि । कामकाष्ठ परी त्याची । करितां दांडी भक्तीकुऱ्हाडीची । मनचि तोडी वन संसाराचें ॥ एवं विषयवासने वेगळा । तो काम मोक्ष-दायक मोकळा । पदक त्याचें बांधावें गळां । भक्ति नवरत्न जोडोनी ॥ मग त्यास न म्हणावें काम । ज्यास इच्छिती आत्माराम । ज्यांत विषयवासनेचें धाम । तो वाईट ॥ काम निर्विषय । तेथें रजोगुणाचा लय । शुद्धसत्वाचा उदय । भक्ति म्हणावी ॥ "** ( ३।६५७–६६४ )

चवथे अर्थार्थी किंवा साधक यांस सद्गुरूपासून व्यतिरेकान्वयबोध झालेला असून ते जीवन्मुक्तीकरितां वैराग्ययुक्त स्वरूपाभ्यास (**सर्वभूतस्थ-मात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥** भगवद्गीता, ६।२९) किंवा सत्संगतींत श्रवणमनन करून अव्यभिचारी भक्ति-योगाचें आचरण (**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते । स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥** भगवद्गीता, १४।२६ ) करितात, ते

भगवद्गीतेंतील क्षत्रिय समजावे. पांचवे ज्ञानी किंवा सिद्धपुरुष हे जीवन्मुक्त होऊन जगदुद्धारांत आपला राहिलेला काळ घालवितात. तो असा कीं, अधिकारी जनांस स्वरूपाचा बोध देतात व अनधिकारी जनांस श्रवणकीर्तनाच्यायोगानें ज्ञान संपादन करून घेण्याचा अधिकार प्राप्त करून देतात. ते भगवद्गीतेंतील ब्राह्मग म्हणजे अगदीं श्रेष्ठ पदवीचे मानव केवळ परमेश्वरच ( **शब्दज्ञानें पारंगत । जो ब्रह्मानंदें सदा डुलत । शिष्यप्रबोधनीं समर्थ । तो मूर्तिमंत स्वरूप माझें** ॥ एकनाथी भागवत ११।१०२८ ) समजावे. त्यांना श्रीसोहिरोबांनीं आपल्या एका पदांत "**धन्य प्राणी**" असें म्हटलें आहे. भगवद्गीतेंतील चारी वर्णांचें तत्त्व पुरुषार्थदीपिकेंत "**ब्राह्मणो लयलीनश्च । क्षत्रियो ध्यान एव च । वैश्यस्तु स्तोत्रपाठे च । शूद्रः शुद्ध्यति पूजनात्** ॥" या एकाच श्लोकांत दिलें आहे. वर सांगितलेल्या पहिल्या चार वर्गांच्या मनुष्यांस युक्तीप्रयुक्तीनें जागृति म्हणजे जाणीव देऊन वरच्या पायरीवर क्रमाक्रमानें आणावयाचा मार्ग दाखवून श्रीसोहिरोबांनीं जगतावर महदुपकार केले असल्यामुळें, अभंगाच्या "**साधकांसी पदोपदीं जागवीसी । म्हणूनी तुजशीं नमूं सदा** ॥" या सातव्या चरणांत मोठ्या आदरानें त्यांना अखंड म्हणजे खंड किंवा अवकाशरहित नमन केलें आहे. या नमनाचें स्पष्टीकरण श्रीनिजानंदस्वामींनीं पुढील पदांत केलें आहे:—

> "मम हृदयगगनरवि उघड करिल त्या गुरुला मी नमीं । अशा त्या गुरुला मी नमीं ॥ ध्रु० ॥ बिंबप्रतिबिंबातें निवडुनी, ऐक्यविचारें भेद हरिल त्या गुरुला मी नमीं ॥ १ ॥ दृश्यभास शब्दासहि सांडुनि, अखंड आत्मस्फूर्ति धरिल त्या गुरुला मी नमीं ॥ २ ॥ नासुनि जगनग अंतर्ज्ञानें, आत्मकनक जो सत्य वरिल त्या गुरुला मी नमीं ॥ ३ ॥ ग्रासुनि मीपण एकचि आपण, निजानंद परिपूर्ण स्मरिल त्या गुरुला मी नमीं ॥ ४ ॥"

ह्या चार वर्गांपैकीं—( १ ) पामरांस किंवा बद्धांस त्यांच्या आयुष्यक्रमणाच्या स्थितीची निर्भर्त्सना करून, ( २ ) आर्त किंवा विषयी

लोकांना सर्व विषय " **आदी गोड अंतीं दुःख, विख रांधिलें पीयूख** " असे आहेत हें दाखवून, ( ३ ) जिज्ञासु किंवा मुमुक्षूंस देह हा क्षणभंगुर असल्यामुळें अडचण सोसूनही ज्ञान जितकें लवकर संपादन करितां येईल तितकें करावयास उत्तेजन देऊन व ( ४ ) अर्थार्थी किंवा साधक यांस ज्ञान बाणण्याकरितां श्रवण, मनन व स्वरूपानंद यांची गोडी लावून श्रीसोहिरोबांनीं भवसागरांत बुडणाऱ्या जीवांस वर कसें ओढलें, हें अनुक्रमें खालीं दिलेल्या पदांवरून कळून येईल:—

**( १ ) "हरिस्मरण–विस्मरण, तरि तुझें काय जिणें रे ! असून ॥ ध्रु० ॥ स्वार्थचि साधिसी, सार्थक नेणसी । कोणासी पहा तरि पुसून । पुढें नाहीं गति, मलिन जाहलि मति । साधुचि संगति नसून ॥ १ ॥ रतीविलासीं लंपट होसी । मानस गेलें डसून । लवकर सर कीं, पडशिल नरकीं । फुकट मरशील कुसून ॥ २ ॥ आळसि कामा, उगा रिकामा । थट्टाचि करिसी बसून । कुकर्मांच्या कांहीं वर्माच्या । गोष्टी सांगसी कसून ॥ ३ ॥ शरीर फिरवी तुजला मिरवी । देव असे रे रुसून । जवळिं असून तुझे हृदयिं बसून । भगवंत नये रे दिसून ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा गुरूनाथ हा । माझ्या हृदयीं घुसून । जनांसि उद्धरावया कारणें । वचन सांगतो ठसून ॥ ५ ॥";**

**( २ ) "केवळ विस्मृति हा प्राणी ईश्वरीं लय लावीना ॥ ध्रु० ॥ वितंड पाखंड स्थापी । आचरणें महापापी । निंदाद्वेषें सदां दापी । भरेना कीं अनुतापीं । अद्यापीही विषयीं वीट येईना ॥ १ ॥ आत्मशुद्धि नाहीं ज्याला । उद्योगाखालींच गेला । संसार हा सत्यची केला । निवांत होउनि न ठेला । अद्यापीही समजुनी उमजुनी । दुष्टबुद्धि जाईना ॥ २ ॥ बहुत जन्म फिरला मागां । अद्यापि जो नव्हे जागा । ज्याला पुढें नरकीं जागा । त्याला तुम्हीं कितीहि सांगा । नायकेच तो येतो रागा । वृत्ति कांहीं साहीना ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे संतांचे । भेटीला जो कधीं न वचे । श्रवण मनन कीर्तन न रुचे । मत्सर द्वेष बहुत सुचे । विश्वव्यापक हृदयस्थाचे । नित्य गुण गाईना ॥ ४ ॥";**

**( ३ ) "विसरूं नको तो देव । जो साक्षिभूत स्वयमेव ॥ ध्रु० ॥ तारुण्यकाळीं पुण्यदशेचा, होऊं पाहे चेव । रंगरुपाला भुलूं नको तूं,**

पाहत क्रियेचा ठेव ॥ १ ॥ अंतकाल हा पावे तोंवरि, भवसागर हा पेंव । वैराग्यविवेकें, संगाविरहित, सदैव सुख हें सेव ॥ २ ॥ पराधीनता पावेल तेव्हां, विस्मय पडेल भेव । स्वइच्छ असणें, यास्तव घरघर, भिक्षा मागुनि जेव ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा त्यावांचुनि हें, शरीर केवळ शव । स्वयंप्रकाशक सत्ता ज्याची, चालवि हे अवयव ॥ ४ ॥";

(४) "पतीतपावन दीनदयाघन करुणाकर देवा। श्रवणमनन-निदिध्यासें निरंतर घडो तुझी सेवा ॥ ध्रु० ॥ परमप्रकाशक तेजोमय हें गुप्त तुझें स्वरुप । परतुनि दृष्टि पाहणें पाहतां निर्गुण हें अरुप । परमार्थ परिपूर्ण साधनीं भरलें हें अमुप । परात्पर तूं अंतरसाक्षी हृदयभुवनदीप ॥ १ ॥ तिम्ही संधी साधुनि घेणें सुख हें एकांतीं । तिन्ही गुण हे निरसुनि शून्यीं उगवली हे ज्योती । तीक्ष्ण ज्ञानें पुरतें पाहतां कुळ नाहीं याती । तितुकी प्रतीति आगलिया मग दिवस नाहीं राती ॥ २ ॥ तळगत तळगत सकळहि जीव हे चित्सिंधू आंत । तरंग जैसे उमटत भासत नासत हे बहुत । तरणोपाय सांगति साधू मत हें सिद्धांत । तरले येणें मार्गें बहुत देहीं देहातीत ॥ ३ ॥ पान्हा पिउनि प्रेमकळेचा हरिलें संकल्पा । पाहतां परापरेनें भवभय दोरीच्या सापा । पारंगत हें करुनि सकळही अहं सोऽहं कापा। पारख करितां तटस्थ जाहल्या नेत्रांच्या मलपा ॥ ४ ॥ वरिली शांति आंगीं जाहला पूर्ण अनुभव । वरदबळें सद्गुरुप्रसादें अक्षय वैभवं । वमिलें सकळहि मायिक आतां नाहीं भय भव । वदली वाणी मौनपणीं हे रूप नाहिं नांव ॥५॥ नम्र होउनि वृत्ति लागली अलक्ष हें लग्न। नटत नटत हे लोक सकळही होउनियां भग्न । नख नलगे जेथ देहबुद्धिचें विकासलें गगन । नमुनि सोहिरा म्हणेचि अवघा अलख निरंजन ॥६॥"

पांचव्या ज्ञानी व सिद्ध पुरुषांसंबंधानेंही "Do as I bid you to do, don't do as I do." (मी सांगतों तसें कर, मी करतों तसें करूं नको.) ह्या इंग्रजी म्हणीला अनुसरून श्रीसोहिरोबांनीं संतांमध्यें प्रारब्धयोगानें म्हणजे पूर्वसंस्कारानें (**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति** ॥ भ. गी ३।३३) ज़री एखादा दुर्गुण दिसला (**प्रारब्ध शेष उरलें जन निश्चयाला ।**

रंगनाथस्वामी ), तरी त्याचा त्याग करून त्यांच्या सद्गुणांचेंच अनुकरण करावें असें खालीं दिलेल्या पदांत उपदेशिलें आहे:—

**“ संतांचे दुर्गुण टाकुनि श्रेष्ठचि गुण घ्यावा ॥ ध्रु० ॥ सुमनीं सुवास येतो मोठा । शेवंती सर्वांगासी कांटा ॥ १ ॥ दीपा-अंगीं अवगुण असती । प्रकाश होतां अवघे न दिसती ॥ २ ॥ द्वाड वनिता हे रूपवती । कामिक पुरुषा प्रियकर होती ॥ ३ ॥ धनाचि मोट ओझें भारी । केवीं त्यागिति नर संसारीं ॥ ४ ॥ समुद्र क्षार न शमवी तहान। पुण्यासाठीं करणें स्नान ॥ ५ ॥ हिरा कठीण नव्हे अरु-धार । छेदल्या होती तालेवार ॥ ६ ॥ क्रूर स्वभाविया रणशूर । त्याला अवश्य पाळी धूर ॥ ७ ॥ बाळ उन्मत्त पिशाच्च साधू । मात्रचि घ्यावा ब्रह्मबोधु ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे ग्राहक ज्याचा । तोचि संग्रह करील त्याचा ॥ ९ ॥”**

श्रीसोहिरोबा उज्जनींत असतां त्यांचें प्रारब्ध संपतांच शालिवाहन शके १७१४ चैत्र शुद्ध नवमीस आपल्या मठांतून अदृश्य किंवा गुप्त झाले. या त्यांच्या लीलेचा उल्लेख अभंगाच्या “**राम म्हणे अंतीं रामजन्मदिनीं । अदृश्य होऊनी ब्रह्म होसी** ॥” ह्या शेवटल्या चरणांत केला आहे. श्रीसोहिरोबा अदृश्य झाल्यावेळीं त्यांच्या बिछान्यावर एक कागद सांपडला, त्यावर पुढील पद लिहिलेलें होतें:—

**“ दिसणें हें सरलें । अवघें प्राक्तन हें मुरलें ॥ ध्रु० ॥ आलों नाहीं गेलों नाहीं । मध्यें दिसणें हे भ्रांती । जागृत होतां स्वप्नचि हरपे । कर्पुरन्यायें जग हरलें ॥ १ ॥ दिसणें हाचि जन्म योगियां । ना दिसणें हा मृत्यु म्हणा । गैबिप्रसादें गैबचि झालें । आपआपणा-मध्यें लपलें ॥ २ ॥ मच्छिंदर गोरख जालंधर हे । न्याया आले स्वस्वरूपीं । जातां जातां गमनग्राम तें । समूळ कोठें ना गमलें ॥३॥ म्हणे सोहिरा सत्रा चवदा । मधुमासाच्या नवमदिनीं । सगुण स्वरूपीं निर्गुण ठेलें । अनुभव हरले स्वरूप कळे ॥ ४ ॥”**

ज्याप्रमाणें सर्व अवतारी पुरुषांचे जन्म म्हणजे त्यांचें प्रगट होणें हें एकसारखें नसून कधीं कधीं भिन्न असतें, त्याप्रमाणेंच त्यांचें प्रयाण

म्हणजे निजधामास जाणेंही भिन्न असतें. उदाहरणार्थ, ज्याप्रमाणें प्रभु येशू ख्रिस्त हे मेरी मातेच्या उदरांत तिच्या कौमार्यावस्थेंत झाले, तर नामदेवराय शिंपल्यांतून प्रगट झाले, श्रीकृष्ण भगवान् देवकीचे नऊ मास पूर्ण होतांच प्रत्यक्ष तिच्या समोर येऊन उभे राहिले, शुकाचार्य आपल्या सुलजा मातेच्या उदरांत बारा वर्षें राहिले होते, त्याप्रमाणेंच सोहिरोबांचा देह उज्जनींत अदृश्य झाला, तुकाराममहाराजांचा देह विमानांतून वैकुंठास जातांना संतांनीं पाहिला, एकनाथांनीं गोदावरीच्या तीर्थांत कंबरभर पाण्यांत जलसमाधि घेतली, आणि वामनपंडितांच्या देहाची दहनक्रिया वाईच्या ब्राह्मणाच्या रूपानें भगवंतांनीं स्वतः केली. हे सर्व चमत्कार अलौकिक नाहींत असें कोण म्हणेल ! गारोड्यांचे क्षुद्र चमत्कार, हट-योगी व अष्टांगयोगी यांनीं सिद्धीच्या बळानें दाखविले जाणारे सकाम चम-त्कार व अवतारीक पुरुषांकडून निर्हेतुक घडून येणारे लीलारूपी चमत्कार यांचा खुलासा श्रीयुत आजगांवकर यांनीं आपल्या लेखामध्यें थोडक्यांत केला आहे तो असा:—

"अवतारीक पुरुषांना सिद्धि या नैसर्गिकच असतात. वास्तविक पाहतां थोर महात्म्यांच्या या अमानुष सामर्थ्यास 'सिद्धि' म्हणणेंच अयोग्य आहे. उज्ज्वल उपा-सनेनें अपेक्षा नसतांही प्राप्त झालेलें व होणारें हें 'अनंताशीं साधर्म्य' होय. प्राकृत महत्वाकांक्षा अंतरीं धरून केलेल्या योगाभ्यासानें प्राप्त होणाऱ्या योगसिद्धि व निष्काम पण उत्कट प्रेमळ उपासनेनें प्राप्त होणारें '**अनंताशीं साधर्म्य**' अथवा आत्मसिद्धि अगर ईश्वरप्रसादानें प्राप्त होणाऱ्या '**देवसिद्धि**' यांमध्यें महदंतर आहे. चांगदेवाचे '**चमत्कार**' व तुकारामरामदासादिकांच्या '**लीला**' यांचें स्वरूप बहिर्दृष्टीस एकच दिसतें, पण त्या त्या महात्म्यांच्या योग्यतेंत जमीन अस्मानाचें अंतर आहे. वरील विवेचनावरून असें आढळून येईल कीं, अवतारी पुरुषांचे चमत्कार, चांगदेवासारख्या ज्ञानशून्य हटयोग्याचे चमत्कार, तुकारामादि संताचे चमत्कार व गारुड्यांचे चमत्कार एकाच स्वरूपाचे किंवा एकाच कारणानें घडणारे नसून राम, कृष्ण, येशू ख्रिस्त यांस सिद्धींची अनुकूलता निसर्गतःच होती, चांगदेवासारख्यांनीं ती योगबलानें प्राप्त करून घेतली होती, व ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि ज्ञानीभक्तांस, त्यांच्या उत्कट उपासनेच्या योगानें सहज साध्य झाली होती."

शेवटीं, ज्या पदांत श्रीसोहिरोबांनीं प्रतिपादन केलें आहे कीं, नामच तारक आहे आणि तें रात्रंदिवस गाइलें असतां मुमुक्षूंना—मग ते पुण्यवान् असोत किंवा पापी असोत—वैराग्य आपोआप उपजतें, त्यांची चित्तशुद्धि होते व तेणेंकरून त्यांना सद्गुरूपासून व्यतिरेकान्वयबोध प्राप्त होतो. तदनंतर अव्यभिचारी भक्तियोग केल्यानें जीवन्मुक्तिसुख व वैकुंठवास यांचा त्यांना अखंड लाभ होतो, तें पद आपण सर्वजण मिळून म्हणूं.

**पद.**

**" श्रीराम जय राम जयजय राम ॥ ध्रु० ॥ ऐसें निशिदिनीं नाम गातां। प्रेम स्वयेंचि येईल हातां। निजपदीं पावावें आराम ॥ १ ॥ विषयापासूनि सुटेल। केवळ संसारासि विटेल। मन हें होइल निष्काम ॥२॥ देहिंचि चाळककळा गमेल। सर्वरूपीं समरंगीं रमेल। चित्सुख परात्पर निजधाम ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे शिव स्मरतो। वाल्मिक पतीत पावन होतो। ऐसें सकळां तारक नाम ॥ ४ ॥"**

**॥ श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ॥**

॥ श्रीसद्‌गुरुभ्यो नमः ॥

# योगिराज श्रीसोहिरोबानाथ आंबिये



## यांचें संक्षिप्त चरित्र.

१. **पूर्ववृत्तांतः**—श्रीसोहिरोबानाथ हे जातीचे गौड सारस्वत ब्राह्मण असून यांचा जन्म बांदें ऊर्फ एलिदाबाद येथें शके १६३६ म्हणजे इ. स. १७१४ या वर्षाच्या सुमारास झाला. बांदें हें गांव सावंतवाडीपासून चार कोस आहे. वाडी प्रांत हा अगदीं रानटी प्रदेश असून केवळ योगीजनांस योगसाधन करण्यास योग्य असा होय. उत्तर हिंदुस्थानांतील एका फिरस्त्या गृहस्थानें या प्रदेशाचें चटकदार वर्णन केलें आहे, तें असें:—

### श्लोक.

**" वाडी विस्तीर्ण झाडी हय रथ न चले जेथ गाडा न गाडी ॥**
**देवांची थोर आडी प्रतिगृहिं असते जाण ते जाण घाडी ॥**
**सिंधूलागोनि खाडी तडिस थडकती पोफळी ताडमाडी ॥**
**ऐसी देखीयली मीं सहजचि फिरतां खेम-सावंतवाडी ॥ १ ॥ "**

योगभ्रष्टांच्या किंवा अवतारिक पुरुषांच्या योगक्षेमाची तजवीज भगवंतानें असे पुरुष अवतीर्ण होण्याच्या पूर्वींच करून ठेवलेली असते. तेव्हां अर्थात् भगवद्गीतेंतील "**योगक्षेमं वहाम्यहम्**" या वाक्याचा अर्थ देहनिर्वाहादि प्रापंचिक धर्माकडे लावा-वयाचा नसून तो केवळ परमार्थाकडेच घ्यावयाचा आहे. सारांश, श्रीसोहिरोबानाथांच्या "**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि**" ह्या वैराग्यशील मनोवृत्तीस साजेल अशाच योग्य भूमींत ते जन्मास आल्यामुळें प्रभु स्वभक्तांचा योगक्षेम कसा वाहातो हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

२. **वैराग्य अथवा मुमुक्षाः**—श्रीसोहिरोबानाथ हे जन्मतःच वैराग्यशील असल्यामुळें ते आपला बहुतेक काळ संस्कृत व प्राकृत अध्यात्मपर ग्रंथांच्या अवलोकनांत

घालवीत असत. त्यांच्या आयुष्याचा पूर्वार्ध सुमारें २० वर्षें कुळकर्ण्याचें काम करण्यांत गेला. असें सांगतात कीं, त्यावेळचे सावंतवाडीचे राजे श्रीमंत खेमसावंत हे अल्पवयी असल्यामुळें त्यांचे चुलते सोमसावंत ऊर्फ आबासाहेब राज्य कारभार पाहात असत. आबासाहेबांचा स्वभाव अतिशय दुष्ट असून ते आपला सर्वकाळ मद्यपानादि दुर्व्यसनांत घालवीत असत. त्यांनीं आपल्या हाताखालच्या लोकांचा नाना प्रकारें छळ करावा. श्रीसोहिरोबानाथांनाही ह्या निर्दय पुरुषानें परोपरीनें गांजलें. एका प्रसंगीं तर श्रीसोहिरोबानाथांना कांहीं निमित्तानें वाड्यांत बोलावून नेलें आणि '**देव दाखीव नाहीं तर ठार करतों**' अशी त्यांस धमकी दिली. श्रीसोहिरोबानाथांना या बिकट प्रसंगी आपल्या पाठिराख्याचा धांवा करण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. इतक्यांत असा चमत्कार झाला म्हणतात कीं, त्या खोलीच्या भितींतून अकस्मात् एक ज्वाला उत्पन्न झाली. तिचें तेज एवढें होतें कीं, तेणेंकरून आबासाहेबांचे डोळे दिपून गेले. ह्या बहिर्प्रकाशानें त्यांचा अंतःप्रकाश प्रज्वलित झाला, व तेणेंकरून श्रीसोहिरोबानाथांच्या साधुत्वाबद्दल आतां त्यांच्या मनांत मुळींच किंतु उरला नाहीं. श्रीसोहिरोबानाथांच्या मुखांतून प्रभूस विनाकारण त्रास झाल्याबद्दल त्यावेळीं असे उद्गार निघाले कीं, '**ही प्रचंड ज्वाला एखादा तरी बळी घेतल्याशिवाय शांत होणार नाहीं!**' पुढें थोड्याच दिवसांनीं श्रीसोहिरोबानाथांनीं वर्तविलेलें हें भविष्य खरें झालें. कांहीं कारणामुळें आबासाहेबांचें मन अति उद्विग्न होऊन ते एका तोफेच्या दारुच्या पिपावर बसले व त्यास स्वतःच आग लावून देऊन त्यांनीं प्राणत्याग केला. श्रीसोहिरोबानाथांच्या अंगीभूत असलेली वैराग्यशीलता व भगवन्निष्ठता या दोन्ही गुणांस पुष्टि आणण्यास त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून वर वर्णिल्याप्रकारचा छळ हा बहुतांशीं कारणीभूत झाला.

**३. सद्गुरुभेटी व आत्मसाक्षात्कारः**—पराधीनतेची अंतःकरणापासून नावड व स्वच्छंदतेची तितकीच आवड उपजतच श्रीसोहिरोबानाथांच्या अंगीं वास करीत असल्यामुळें त्यांत वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून वारंवार झालेल्या छळाची भर पडली. त्याचा परिणाम असा झाला कीं, एके दिवशीं ते स्नान करून पूजार्चनांत निमग्न झाले आहेत अशावेळीं सावंतवाडीच्या राजेसाहेबांकडून एक शिपाई त्यांस कांहीं जरूरीच्या कामाकरितां एकदम घेऊन जाण्यास आला. राजाज्ञेस मान देऊन श्रीसोहिरोबानाथ भोजन न करतां तसेच निघाले. क्षुधाशमनार्थ वाटेंत सेवन करण्यासाठीं घरांत पिकलेला एक फणस मात्र त्यांनीं बरोबर घेतला होता. मार्ग आक्रमण करीत असतां भक्ति-वैराग्यानें अतिशुद्ध झालेल्या श्रीसोहिरोबांच्या अंतःकरणांत सुविचारांच्या अशा लाटा उठूं लागल्या कीं, देवा ! ह्या राजेसाहेबांची नोकरी पत्करल्यामुळें आज तुझी सेवा बाजूस ठेवून त्यांच्या सेवेस भोजन न करतांही जावें लागत आहे. तूं अनेक जन्मांचा माझा धनी असून तुला सोडून राजे-

साहेबांची गुलामगिरी करावी लागत आहे, हें किती लांछनास्पद आहे. आज २० वर्षें कुळकर्ण्याचें काम एकनिष्ठपणें केलें. आतां या नोकरीचा मला अंतःकरणापासून वीट आला आहे. यापुढें हे प्रभो ! सर्वकाळ तुझ्याच सेवेंत घालवावा असें मला वाटतें. तूं कल्पवृक्ष-स्वभाव आहेस तरी हा माझा हेतु सत्वर सिद्धीस ने. असो. बांदें व सावंतवाडी या दोन शहरांत ३ कोसांचें अंतर आहे. सुमारें अर्धा रस्ता आक्रमण केल्यावर चालून थकवा आल्यामुळें वाटेंत ‘ **इनसुली** ’ नामक जें गांव आहे त्या गांवच्या दाट जंगलांतून वहाणाऱ्या एका ओढ्याच्या कांठीं ते विश्रांति घेण्यास बसले. क्षुधेची थोडी बहुत तरी शांति व्हावी एतदर्थ त्यांनीं बरोबर आणलेला फणस फोडला व खावयास प्रारंभ करणार तोंच “**बाबु हमकू कुछ देता है ?**” असा अति गंभीर पण मधुर ध्वनि अकस्मात् त्यांच्या कानीं पडला. ह्या निर्जन वनीं हा ध्वनि कोठून आला म्हणून मागें वळून पाहतात तोंच एक तेजस्वी व भव्य सिद्ध-पुरुष त्यांच्या दृष्टीस पडला. परस्परांची दृष्टिभेट होतांच सूर्योदयाबरोबर जशीं कमळें फुलतात त्याप्रमाणें हा सच्चिदानंदरूपी भानू प्रगट होतांच श्रीसोहिरोबानाथांचें हृत्कमळ विकास पावलें, व चंद्रदर्शनाबरोबर चकोरास जसें आनंदाचें भरतें येतें तशा श्रीसोहि-रोबानाथांच्या अंतःकरणांत एकसारख्या प्रेमलहरी उठूं लागल्या.

श्रीसोहिरोबानाथांनीं त्या दिव्य पुरुषास साष्टांग प्रणिपात करून तो फोडलेला फणस त्यास सादर केला. फणस भक्षण करून त्यांतील पांच गरे प्रसाद म्हणून त्या सिद्धपुरुषानें श्रीसोहिरोबानाथांना खावयास दिले, व त्यांजकडे कृपादृष्टीनें पाहिलें. तोंच ते नखशिखांत प्रेमानें भरून गेले, व त्यांच्या अंगीं अष्ट सात्त्विकभाव प्रगट झाले आहेत व ज्ञानबीज पेरण्यास त्यांची मनोभूमिका तयार झाली आहे असें पाहून त्या महात्म्यानें आपला वरदहस्त श्रीसोहिरोबानाथांच्या मस्तकावर ठेवतांच “**पलखमें अलख**” या न्यायानें ते परब्रह्मस्वरूपीं लीन झाले. हे सत्पुरुष आदिनाथ मच्छेंद्रनाथ आदिकरून नाथसंप्रदायांतील गैबिनाथ* नामक सत्पुरुष होत. ज्याप्रमाणें बाबाजी चैतन्याच्या वेषानें श्रीतुकाराममहाराजांस स्वप्नांत व यतिवेषानें श्रीवामनपंडितांस मलयाचलावर त्याचप्रमाणें गैबीवेषानें श्रीसोहिरोबानाथांस इनसुली येथील गर्द झाडींत

---

* श्रीगैबीनाथ किंवा गहिनीनाथ यांचें चरित्र महाराष्ट्र-भाषाभूषण श्रीयुत जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांनीं आपल्या ‘ महाराष्ट्रकविचरित्रांत ’ संक्षेपरूपानें दिलें आहे, तें असें:—

“ प्रसिद्ध नऊ नाथांपैकीं मच्छिंद्रनाथ यांनीं आपले शिष्य गोरखनाथ यांस एके दिवशीं ‘ संजीवनी ’ मंत्राची संथा देऊन, ‘ हा मंत्र एकांतीं पठत जा ’ अशी त्यांस आज्ञा केली. त्याप्रमाणें गोरखनाथ मंत्र पठण करीत बसले असतां गांवचीं मुलें तेथें

भगवतानें मुद्दाम अवतार घेऊन अनुग्रह केला. यावरून श्रीसोहिरोबानाथ हे श्रीतुकाराममहाराज व श्रीवामनपंडित यांच्याच तोडीचे अवतारीक पुरुष होते यांत मुळींच संशय नाहीं. असो. श्रीसोहिरोबानाथांची समाधि कांहीं काळानें उतरून ते देहावर आल्यानंतर त्यांनीं राजेसाहेबांस भेटण्याचा जो आपला पूर्वसंकल्प होता तो पुरा करण्याच्या हेतूनें सावंतवाडीचा मार्ग धरला.

**४. राजेसाहेबांची भेट व नोकरीचा राजिनामाः**---वाडीस आल्यावर त्यांनीं लगेच राजेसाहेबांची भेट घेतली व आपली लेखणी राजेसाहेबांच्या पुढें ठेऊन मजकडून यापुढें आपली सेवा होणें शक्य नाहीं असें त्यांस स्पष्टपणें सांगितलें.

---

येऊन त्यांनीं आपणांस एक मातीचें चित्र करून देण्याविषयीं त्यांस विनंति केली. गोरखनाथांनीं त्यांच्या विनंतीस मान देऊन मातीचें चित्र करावयास आरंभ केला. चित्र तयार करीत असतांना त्यांचें संजीवनी मंत्राचें पठण चालूच होतें. चित्र तयार होतांच असा चमत्कार झाला कीं, संजीवनी मंत्राच्या योगानें त्यांत जीवनतत्त्व उत्पन्न होऊन तें माणसासारख्या चेष्टा करूं लागलें. हा विलक्षण प्रकार पाहतांच तीं सर्व मुलें "भूत भूत" म्हणून ओरडत वाट फुटेल तिकडे पळूं लागलीं व गोरखनाथही भयानें अगदीं गांगरून गेले. ही झालेली गडबड कशाची आहे याची मच्छिंद्रनाथ यांनी चौकशी केली तों झालेला प्रकार त्यांच्या ध्यानांत आला. संजीवनी मंत्राचा हा परिणाम असून भूत नव्हे असें सांगून त्या मुलांची व गोरखनाथांची त्यांनीं समजूत केली व तें उत्पन्न झालेलें बालक घेऊन ते आपल्या मठांत आले. तेथें त्या बालकास नाथांनीं दूध पाजून त्याची योग्य व्यवस्था ठेविली. ही हकीगत गांवांतील सर्व लोकांस समजतांच ते मच्छिंद्रनाथांच्या मठांत आले व 'बालक कोणाचें' असें त्यांनीं नाथांस विचारलें. झालेली इत्थंभूत हकीकत मच्छिंद्रनाथांनीं त्यांस निवेदन केली, त्यावेळीं नाथांच्या सामर्थ्याचें लोकांस फार आश्चर्य वाटलें. मग त्यांतील कांहीं लोक नाथांस म्हणाले कीं, हें बालक '**गैबीनंदन**' आहे. (गैबीनंदन म्हणजे ज्यास आईबाप नाहींत तो. गैबी—गहाळ झालेला.) याचें योग्य संगोपन आपल्यासारख्या विरक्त पुरुषांकडून होणें कठीण आहे. याकरितां जीस कांहीं मूल बाळ नाहीं अशा एकाद्या स्त्रीस हें मूल दिल्यास ती त्याचा चांगला प्रतिपाळ करील. ही सूचना नाथांस पसंत पडल्यावरून त्यांनीं तें बालक, त्या गांवांत मधु या नांवाचा एक ब्राह्मण रहात होता त्याच्या स्त्रीस अर्पण केलें. तिनें तो मुलगा लहानाचा मोठा केल्यावर त्यास मच्छिंद्रनाथांनीं मंत्रोपदेश केला. तेच हे सोहिरोबांचे गुरु '**गहिनीनाथ किंवा गैबीनाथ**' होत. यांची समाधि गर्भागिरी नामक पर्वतावर असून हिंदु लोक यांना '**गैबीनाथ**' व मुसलमान '**गैबीपीर**' असें म्हणतात."

सद्गुरुभेटीनंतर श्रीसोहिरोबानाथांचे विचार श्रीवामनपंडितांनीं—

"एक शरीर अहंममतास्पद तें विकलें तुजलागिं हरी ।
आत्मसुवर्ण चराचर मुद्रित घेतलें वित्त दिगंतभरी ॥
त्याचें जिणें, मरणें, सुखदुःखही चिंतन कां मग या उपरी ।
आपण घोडें जसें विकलें मग एक बसोत कां चौघे वरी ॥ १ ॥"

या सवाईत व्यक्त केलेल्या विचारांसारखेच झाले असल्याकारणानें राजेसाहेबांपुढें त्यांनीं ते निर्भीडपणें तसेच मांडले.

श्रीसोहिरोबानाथांची अशाप्रकारची विरक्त स्थिति व त्यांचें तें दिव्य आत्मतेज अवलोकन करून राजेसाहेबांस मोठाच विस्मय वाटला व ते गहिंवरून श्रीसोहिरोबानाथांस म्हणाले, "**महाराज ! आमच्यावर आपला राग नसावा.**" त्यावर श्रीसोहिरोबानाथ म्हणाले, "**राग कशाचा? आपल्या राज्यांत यापुढें दारूचे मक्ते देऊन लोकांस मद्यपी बनवूं नये, एवढीच विनंति आहे.**" या विनंतीचें कारण राजेसाहेबांचे चुलते सोमसावंत ऊर्फ आबासाहेब यांच्या हातून मद्यपानाच्या निषेंत श्रीसोहिरोबानाथांच्या स्वतःचा व आबासाहेबांच्या हाताखालील इतर मंडळीचा छळ झाला हें होय. असो. यानंतर श्रीसोहिरोबानाथ परत बांदें मुक्कामीं आले.

**५. कवित्वस्फूर्ति व ग्रंथलेखनः**—बांदें मुक्कामीं श्रीसोहिरोबानाथ आपला काळ भगवद्भजनांत, व भक्ति-ज्ञान-वैराग्यपर निरूपणांत घालवीत असत. परंतु त्यांना मधून मधून कवित्वस्फूर्तिही होत असे. त्यांनीं केलेले सर्व ग्रंथ, पदें इत्यादि वाङ्मय त्यांनीं आपल्या लेखणीस श्रीमंत राजेसाहेबांच्या चरणीं अखंड स्थान दिल्यामुळें दुसऱ्या लोकांकडून लिहविलेलें आहे. याकरितां त्यांच्या कवितेंत जीं अशुद्धें आढळतात त्याबद्दल ते दोषास मुळींच पात्र नाहींत.

श्रीसोहिरोबानाथांच्या कवितेचा बराचसा भाग त्यांच्या बहिणीच्या हातचा आहे. योग्यांच्या कुलांत जन्मास आलेले स्त्रीपुरुष असामान्यच असावयाचे. या बाईला लिहितां वाचतां येत असे व तिच्या पूर्वसंस्कारानें तिला कविता वाचण्याची विशेष आवड असे. श्रीसोहिरोबानाथ ब्रह्मानंदांत स्वयंस्फूर्तीनें ज्या कविता रचीत त्या सर्व ही बाई लिहून ठेवी. श्रीसोहिरोबानाथांची आज जी कविता उपलब्ध आहे तिचें श्रेय सर्वस्वी या बाईसच आहे. बाईनें महाराष्ट्रास या बाबतींत कायमचें ऋणी करून ठेविलें आहे. असें जरी आहे तथापि श्रीसोहिरोबानाथांची बरीचशी कविता नष्टही झाली आहे. याचीं अनेक कारणें आहेत. असें सांगतात कीं, त्यावेळीं कागद फार महाग असल्यामुळें श्रीसोहिरोबानाथ ते विकत घ्यावयास असमर्थ होते. त्यामुळें त्यांच्या भगिनीनें कांहीं कविता

झाडांच्या पानांवर लिहून तीं पानें एकत्र रचून ठेविलीं असतां त्यांच्या वृद्ध मातोश्रीनें तीं सर्व कचरा समजून जाळून टाकलीं ! या विचित्र योगानें श्रीसोहिरोबानाथांची बरीचशी कविता भस्मीभूत झाली, ही अत्यंत दुःखाची गोष्ट होय ! दुसरें असें कीं, श्रीसोहिरोबा-नाथांचें वास्तव्य स्वगृहीं फारच थोडा वेळ होत असे. ते एकाच ठिकाणीं फार वेळ रहात नसत. गोमांतकांत त्यांचें जाणें वरचेवर होत असे व त्यामुळें त्यांची कविता तेथील लोक टिपून ठेवीत. अशारीतीनें ती सर्वत्र पसरली गेल्यामुळें ती सारी आतां उपलब्ध होणें कठीण झालें आहे. त्यांचें एकंदर वाङ्मय भक्ति–ज्ञान–वैराग्य इत्यादि पारमार्थिक विषयांनीं परिपूर्ण असून त्यांच्या पद्यांत आत्मस्वरूपाचा अनुभव जसा स्पष्टपणें वर्णन केलेला आढळतो तसा इतरत्र क्वचितच पहावयास मिळतो. त्यांनीं ( १ ) **अक्षयबोध** ( २ ) **महदनुभवेश्वरी**, ( ३ ) **पूर्णाक्षरी**, ( ४ ) **अद्वयानंद** आणि ( ५ ) **सिद्धांतसंहिता** असे पांच वेदांतपर ओंवीबद्ध ग्रंथ लिहिले आहेत. यांतील **पहिला** ग्रंथ "**अक्षयबोध**" श्रीसोहिरोबानाथांनीं शके १६७१ त सावंतवाडी येथें रचिला. या ग्रंथांत त्यांनीं पूर्णज्ञाना-नुभव वर्णिलेला आहे. हें प्रस्तुत ग्रंथाच्या शेवटीं लिहिलेल्या "**अज्ञानाचिये वाचे करवी । बोलविलें पूर्ण ज्ञान अनुभवी ॥ एकी एक सोहिरा नांवीं । लेखन केलें** ||१||" ह्या ओंवीवरून स्पष्ट होतें. या ग्रंथांत "**समाधीराजयोग, अद्वैतयोग, वैराग्ययोग, ज्ञानयोग, सद्विवेकयोग, विवेकयोग, बोधलक्षणयोग व मुक्तलक्षणयोग**" या आठ विषयांचें विवेचन आठ प्रकरणांत अनुक्रमानें केलें आहे. ओंवीसंख्या ४८० आहे. **दुसरा ग्रंथ** "**महदनु-भवेश्वरी**" हा प्रचंड ग्रंथ शके १६७२ या वर्षी रचिला हा ज्ञानेश्वरीच्या धर्तीवर लिहिलेला असून याचे अध्याय १८ व ग्रंथसंख्या सुमारें ९०२२ आहे. **तिसरा ग्रंथ** "**पूर्णाक्षरी**" हा शके १६७३ या वर्षी रचिला. यांत सिद्धांचीं किंवा प्राप्तपुरुषांचीं लक्षणें विस्तारपूर्वक सांगितलीं असून याची ओंवीसंख्या ५०० आहे. **चौथा** ग्रंथ "**अद्वयानंद**" हा शके १६७५ त रचिला. या वेदांतपर ग्रंथाचीं १० प्रकरणें असून याची ग्रंथसंख्या १००० आहे. **पांचवा** ग्रंथ "**सिद्धांतसंहिता**" हा शके १६७८ या वर्षी लिहिला. याचे अध्याय १८ आहेत व ओंवीसंख्या ५००० आहे. यांत मूळ संहितेचे संस्कृत श्लोक दिले असून त्यावर मराठी ओंवीबद्ध टीका आहे. श्रीसोहिरोबानाथांच्या सर्व ग्रंथांत हा ग्रंथ अधिक प्रसिद्ध आहे. याशिवाय यांची भक्ति-ज्ञान-वैराग्यपर अभंग, पदें, कटिबंध, सवाया, श्लोक, आरत्या वगैरे प्रासंगिक कविता पांच हजारांवर होतील असें म्हणतात. श्रीसोहिरोबा-नाथांना गाण्याची उत्कृष्ट माहिती होती. यामुळें यांचीं पदें रागरागिण्यांत बसविलेलीं आहेत, व तीं कीर्तनकारांच्या व गवयांच्या तोंडून पुष्कळदां ऐकावयास मिळतात. श्रीसोहिरोबा-नाथांनीं देहाचे रचनेवर एक उत्कृष्ट बखर लिहिली आहे. ती "**सोहिरोबांची बखर**" या नांवानें प्रसिद्ध आहे. "**योगिराज सोहिरोबानाथ**" या नांवाचें एक त्रैमासिक पुस्तक कै. **भगवंत बाळकृष्ण पै (रायकर)** हे प्रसिद्ध करीत असत. यांतून श्रीसोहिरोबा-

नाथांची सर्व उपलब्ध कविता छापून काढल्यामुळें कै. पै यांचे महाराष्ट्रावर मोठेच उपकार झाले आहेत.

**६. तीर्थाटन व जनोद्धारः**—वाडी मुक्कामीं अशाप्रकारें भगवद्भजनांत, भक्ति-ज्ञान-वैराग्यपर निरूपणांत व ग्रंथलेखनांत वगैरे कांहीं काळ घालविल्यानंतर उत्तर हिंदुस्थानांतील पुण्यक्षेत्रें पहावीं या उद्देशानें वयाच्या ६० व्या वर्षी श्रीसोहिरोबानाथ आपल्या दोघां मुलांना बरोबर घेऊन निघाले. असें सांगतात कीं, त्यावेळीं त्यांची विधवा सून—जिचें त्यांच्यावर अत्यंत प्रेम होतें, व जी त्यांची सेवा एकनिष्ठपणें करीत असे—व तिचा मरणोन्मुख झालेला एकुलता एक मुलगा हीं दोनच माणसें घरांत होतीं. श्री-सोहिरोबानाथ जातात हें पाहून त्या प्रेमळ बाईनें रडून आकांत केला. ती म्हणाली, "**मुलगा मरणोन्मुख व घरांत मी एकटी याची काय वाट ?**" त्या बाईची ही केविलवाणी स्थिति पाहून श्रीसोहिरोबानाथांचें कोमल अंतःकरण कळवळलें व त्यांचा कंठ भरून आला. ते म्हणाले, "**देवा ! आजपर्यंत तुझ्यापाशीं मी कांहींच मागितलें नाहीं. परंतु आज नाइलाज होऊन तुला तसदी देण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे व त्याबद्दल मला अत्यंत दुःख होतें; तर या मुलाला सत्वर आरोग्य देऊन त्याचें सर्वस्वी कल्याण कर.**" असें म्हणून त्या मुलाच्या पाठीवरून आपला वरदहस्त फिरवितांच तो अगदीं चांगला झाला. मग सुनेची समजूत करून ते निघाले.

श्रीज्ञानेश्वरमहाराज, नामदेवराय, गौरांगप्रभु आदिकरून बहुतेक संतांनीं तीर्थयात्रा केल्याचें त्यांच्या चरित्रांतून प्रसिद्ध झालें आहे. वास्तविक पाहतां—( १ ) "**हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥**" या संतशिरोमणी श्रीतुकाराममहाराजांच्या, ( २ ) "**विचारितां सहज कोणी नव्हे माझें । म्हणोनि चरण तुझे दृढ धरिले ॥ हेंचि माझें ज्ञान हाचि गुरुमंत्र । व्रत तप तीर्थ चरण तुझे ॥**" या परम विठ्ठलभक्त श्रीनामदेवरायांच्या, ( ३ ) "**न जाये जपासी न जाये तपासी । न जायेचि काशी न जाये गयेसी ॥ गुरुचिंतनेवीण कोठें न जाये । त्रिकाळीं सदा पाय तुझेचि पाहें ॥**" या परम रामभक्त श्रीरामदासस्वामींच्या व ( ४ ) "**सद्‌गुरूचे पाय हेचि माझी यात्रा । तयावीण क्षेत्रा नेणें मीं हो ॥**" या परम गुरुभक्त श्रीरमावल्लभदासांच्या स्पष्टोद्गारांवरून असें उघड दिसून येतें कीं, अशा संतविभूतींस तीर्थयात्रा, तपानुष्ठान वगैरे करण्याची मुळींच जरूरी नाहीं. तर मग असे प्राप्तपुरुष तीर्थाटनास कां जातात ? असा सहजच प्रश्न उभा रहातो. त्याचें उत्तर येणेंप्रमाणें आहेः—

संतांना तीर्थयात्रेस जाण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं ही तर गोष्ट निर्विवाद आहे व ते तीर्थाटनें करतात हेंही तेवढेंच सत्य आहे. या दोन्ही विरोधी गोष्टींचा आप-

र्णास आतां मेळ घालावयाचा आहे. श्रीतुकाराममहाराजांच्या "**जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती**" या वचनाप्रमाणें संत हे केवळ लोकोद्धाराकरितांच अवतीर्ण झालेले असतात. तीर्थांच्या ठिकाणीं वैराग्यशील लोक आत्मोद्धारार्थ नेहमीं वास करीत असल्यामुळें अशा मुमुक्षुजनांचा उद्धार व्हावा एतदर्थ दयाघन प्रभु संताच्या तीर्थयात्रेचा योग घडवून आणतो. यांत नारायणाचा दुसरा एक हेतु असतो तो हा कीं, जगताचें सर्व पाप घेऊन या पवित्र तीर्थांवर जो मळ चढतो, तो संतचरणस्पर्शनानें क्षालन व्हावा; कारण, तो अन्य उपायांनीं होणें शक्य नाहीं. म्हणून श्रीवामनपंडितांच्या "**सार्धत्रिहस्त जरि वामन दीसती ते । विष्णु स्वयें तनुही देवनदी सती ते ॥**" या वचनाप्रमाणें संतांची तनु सामान्य जीवांच्या चर्मचक्षूंस जरी साडेतीन हातांची दिसली तरी संत हे विष्णुप्रमाणें विश्वव्यापक चैतन्य होत, व त्यांची तनु ही गंगेची वडील बहीण होय. फार कशाला, प्रत्यक्ष श्रीभागीरथीनें वैष्णवचरणरजांचें माहात्म्य एके प्रसंगीं वर्णन केलें आहे, तें असें:—

एकदां श्रीरंगनाथस्वामी कांहीं संतमंडळी बरोबर घेऊन तीर्थयात्रेस निघाले. देहू क्षेत्रीं आल्यावर स्वामींनीं श्रीतुकाराममहाराजांस आपल्याबरोबर काशीस येण्यास सांगितलें. त्यावर महाराज म्हणाले, आपला आतां वृद्धापकाळ झाला असल्यामुळें आपल्या संगतीचा लाभ घेतां येत नाहीं; परंतु महाराजांनीं स्वामींकडे श्रीभागीरथीस समर्पण करण्यास पुढील अभंग लिहून दिला:—

> "**चारी वर्ण झाले जेथुनी निर्माण । तो हा नारायण बाप माझा ॥**
> **मुखीं ते ब्राह्मण बाहुनि राजन्य । जानु जन्म जाण वैश्यवर्ग ॥**
> **चरणींचा वास आहे त्या शूद्रासी । तेथें मी जळराशी भागीरथी ॥**
> **तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठवीलें ॥**"

स्वामींनीं भागीरथीस अभंग समर्पण करून तिची प्रार्थना करतांच तिनें अलंकारयुक्त हस्तानें पत्रिकेचें सुंदर उत्तर दिलें, तें येणेंप्रमाणें:—

> "**आजीचा दिवस धन्य मज जाहला । सद्गुरू भेटला पत्रास्तव ॥**
> **मजमाजी प्राणी पवित्र जे होती । ते दोष लागती माझे अंगीं ॥**
> **माझिये आंगींचा मळ काढील कोण । एका तुम्हांवांचून विष्णूदासा ॥**
> **ऐका रंगमूर्ती सांगावें निरोपा । नमस्कार बापा तुकोबासी ॥ १ ॥**

जान्हवीनें अशाप्रकारें सद्गदित अंतःकरणानें पत्रिका श्रीरंगनाथस्वामींच्या हातांत दिली व त्यांस सप्रेम वंदन केलें. असो.

सारांश, श्रीसोहिरोबानाथ हेही इतर संतांप्रमाणें लोकोद्धारार्थ उत्तर हिंदुस्थानांतील प्रसिद्ध स्थळें व पुण्यक्षेत्रें पहावयास निघाले.

**७. जिवबादादांचा परिचय व महादजी-अहंताहरणः**-उज्जनी, दिल्ली, प्रयाग, काशी वगैरे स्थळें पाहून सुमारें चार पांच वर्षांनीं म्हणजे १७०१ चे सुमारास श्रीसोहिरोबानाथ ग्वाल्हेर मुक्कामीं येऊन पोहोंचले. त्यावेळीं तेथील गादीवर महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबुवा हे महान् पराक्रमी व राजकारणी मुत्सद्दी होते. हे गादीवर बसल्यावर यांनीं आपल्या फौजेस फ्रेंचांकडून कवाईत शिकवून तरबेज केलें होतें, त्यामुळें त्यांना निजाम, टिपु, इंग्रज यांजबरोबर झालेल्या लढायांत मोठा पराक्रम गाजवितां आला. पुढें पुढें तर मराठे व इंग्रज यांमधील सूत्रें महादजींच्याच मार्फत हालत असत. त्यांचे पदरीं गोमांतकांतील प्रख्यात केरी गांवचे जिवाजी बल्लाळ ऊर्फ जिवबादादा बक्षी हे प्रतापी पुरुष मुख्य सेनापति होते. हे जातीचे गौड सारस्वत ब्राह्मण असून फार शूर, पराक्रमी, धाडसी व राजकारणी सेनापति असल्यामुळें यांचे शिंद्याचे दरबारीं फार वजन असे. यांनीं गोहदवाला राणा याजकडून ग्वाल्हेर लढून घेतल्यामुळें शिंद्यानें त्यांस बक्षीसगिरी दिली. यावरून यांचें आडनांव बक्षी असें पडलें. आपल्या गांवचे सत्पुरुष श्रीसोहिरोबानाथ ग्वाल्हेरांत आले आहेत ही बातमी जिवबादादांस समजतांच ते लगेच त्यांच्या दर्शनास गेले. श्रीसोहिरोबानाथांची एकंदर वृत्ति पाहून जिवबादादांस अत्यंत समाधान झालें, व आपणास सत्समागमाचा व सेवेचा लाभ व्हावा म्हणून त्यांनीं श्रीसोहिरोबानाथांस आपल्या घरीं सत्कारपूर्वक आणून ठेविलें. पुढें जिवबादादांच्या येथें कोणी सत्पुरुष आले आहेत व ते कविता वगैरे करतात असें महादजींस समजतांच त्यांनीं श्रीसोहिरोबानाथांस आपल्या दरबारीं आणण्याविषयीं जिवबादादांस सांगितलें. जिवबादादांनीही श्रीसोहिरोबानाथांची व महादजींची भेट करून देऊन त्यांच्याकडून यांची संभावना करावी असें ठरविलें होतें, पण आतां तर महादजींकडूनच आमंत्रण आल्यामुळें त्यांनीं श्रीसोहिरोबानाथांना मोठ्या आग्रहानें शिंद्यांचे दरबारीं नेलें. जातांना वाटेंत त्यांस अशी नम्र सूचना केली कीं, "**महादजी हे कविताप्रिय असून त्यांनीं स्वतःही कांहीं कविता केली आहे. तुम्हांस त्यांनीं दाखविली तर ती चांगली आहे असें म्हणा.**" श्रीसोहिरोबानाथ त्यावर म्हणाले, "**चांगली असली तरच चांगली म्हणेन.**" दरबारांत गेल्यावर शिंद्यांनीं सन्मानपूर्वक त्यांचें स्वागत करून त्यांना आपल्या सिंहासनावर बसावयास सांगितलें. परंतु श्रीसोहिरोबानाथ हे अत्यंत वैराग्यशील असून त्यांना सन्मानाचा विशेष तिटकारा असल्यामुळें ते दरबारची इतर मंडळी बसली होती तींत जाऊन बसले. त्यांचें व महादजींचें कांहीं वेळ भाषण झाल्यावर महादजींनीं आपल्या कवितांची वही आणवून ती श्रीसोहिरोबानाथांपाशीं दिली व त्यांस विनंति केली कीं, "**कविता वाचून**

पहाठ ।। व त्या कशा काय आहेत तें कृपा करून सांगावें. " श्रीसोहिरोबानाथांनीं कांहीं कविता वाचून पाहिल्या व म्हणाले, " कविता आहेत खऱ्या परंतु त्यांत प्रसाद नाहीं. अप्रासादिक * कविता कितीही चांगल्या असल्या तरी त्यांचा उपयोग काय ? एखादी स्त्री सुंदर आहे, तिनें अलंकारही पुष्कळ घातले आहेत पण तिच्या भाळीं सौभाग्यतिलक मात्र नाहीं तर त्या सर्वांचा उपयोग काय ? " भर दरबारांत आपल्या कवितांवर झालेली ही टीका शिंद्यांस रुचली नाहीं असें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसून आलें. परंतु श्रीसोहिरोबानाथ हे श्रीवामनपंडितांसारखे निस्पृह, निष्कपटी व सत्यप्रिय असल्यामुळें त्यांना राजा व रंक हे श्रीतुकाराममहाराजांच्या " मुंगी आणि राव । आम्हां सारखाची जीव ॥ " ह्या उक्तीप्रमाणें दोन्ही समानच होते. श्रीसोहिरोबानाथ व श्रीवामनपंडित हे दोघेही स्पष्टवक्ते असल्यामुळें त्यांची मान्यता जशी व्हावी तशी झाली नाहीं. ही खरोखरच मोठी दुर्दैवाची गोष्ट होय! वास्तविक पाहतां त्यांना स्वतःला तर ती नकोच होती. पण या उभयतांचा योग्य तो सत्कार झाला असता तर महाराष्ट्राला

---

* सद्गुरु श्रीनारायणमहाराज जालवणकर आपल्या एका पत्रांत कवित्वासबंधीं लिहितातः— " मत्यनुसार करून अगत्य प्रभूस आळवावें. त्यास चातुर्य, गद्य-पद्यरचना प्रिय नाहीं. वेदस्तुतीपरी सज्जनांचे अभंग गोड झाले. " यथामतीनें प्रभूची करुणा अवश्य भाकावी. परंतु केवळ विद्वत्ता दाखविण्याकरितांच मोठ्या कुशल-तेनें गद्यांत किंवा पद्यांत केलेलें स्तवन भगवंताला आवडत नाहीं. यासंबंधीं 'मुमुक्षु'-कर्ते असें म्हणतातः—" समर्थांनीं चार प्रकारचे कवि सांगितले आहेत (दास. द. १४ स. ३) धीट कवि, पाठ कवि, धीटपाठ कवि व प्रासादिक कवि. ' जें आपल्या मनासि आलें । बळेंचि कवित्व रचिलें ॥ ' अशा हठ कवींना धीट कवि म्हणतात. पाठ कवि कोणते ? ' पाठ म्हणजे पाठांतर । बहुत पाहिलें ग्रंथांतर । तयासारिखा उतार । आपणहि केला ॥ ' पाठांतराच्या व शब्दपांडित्याच्या बळावर कविता करणारे ते पाठ कवि. ' शीघ्रचि कवित्व केलें । दृष्टीं पडिलें तेंचि वर्णिलें । भक्तीवांचून जें केलें । या नांव धीटपाठ ॥ ' बहुतेक कवि या तीन वर्गांत पडतात. संतवाङ्मयांत रमलेल्या रसिकांस असें भक्तिहीन कवित्व मनापासून आवडत नाहीं.

" जो भगवद्भजनेंवीण । जाऊं नेदी एक क्षण ।
सर्वकाळ अंतःकरण । भक्तिरंगें रंगलें ॥ "

अशा भगवद्भक्ताच्या कवितेस समर्थांनीं ' प्रासादिक कविता ' असें म्हटलें आहे. भगवत्प्रसादाची वाणी ती प्रासादिक कविता होय व तीच संत-भाविकांना पसंत पडते."



शूर सरदार महादजी शिंदे.



मुत्सद्दी सेनापति जिवाजी बल्लाळ

ऊर्फ

जिवबादादा केरकर बक्षीबहादर फत्तेजंग.

## श्रीसोहिरोबानाथांचें



स्वभगिनीद्वारा कवितालेखन.



रहातें घर.

पारमार्थिक दृष्टया बराच फायदा झाला असता यांत मुळींच संशय नाहीं. असो. महादजींच्या अंतःकरणांत उसळत असलेल्या क्रोधोर्मि श्रीसोहिरोबानाथांच्या अंतःचक्षूस स्पष्ट दिसूं लागल्या, व त्यांचा हा अभिमानजनित तमोगुण नाहींसा व्हावा म्हणून त्यांना उद्देशून— **( १ ) "अवधूत नहीं गरज तेरी । हम बेपर्वा फकीरी ॥ ध्रु० ॥"; ( २ ) "दौलत देख दिवानी मेरी । अपना मौज न करना फेरी ॥ ध्रु० ॥"** व **( ३ ) "स्वरुपीं मजरा लावीं ठीक । उदरा मागुनि खाणें भीक ॥ ध्रु० ॥"** त्यांनी अशी तीन पदें तेथल्या तेथेंच रचून म्हटलीं व ते लगेच दरबारांतून चालते झाले. दरबारांतील मंडळीस हा सर्व प्रकार पाहून श्रीसोहिरोबानाथांच्या साधुत्वाबद्दल मोठेंच आश्चर्य वाटलें.

**८. शांततेची पराकाष्ठाः**—श्रीसोहिरोबानाथ ग्वाल्हेर येथें आपल्या बिऱ्हाडीं भगवद्भजन करीत बसले असतां एक थट्टेखोर इसम गुडगुडी घेऊन त्यांच्याकडे येऊन बसला व निर्लज्जपणें तबाखूचा धूर त्यांच्या मुखाकडे सोडून त्यांना चिडविण्याचा प्रयत्न करूं लागला. श्रीसोहिरोबानाथ मुळीच चिडले नाहींत व शांतपणानें त्यांनी पुढील पद म्हटलें:—

> **"तुम् अच्छा हुक्का पीना ॥ ध्रु० ॥ ब्रह्मरंध्रमें त्रिकूट चिलिम । प्रान अपानसें दमपर दम लेना ॥ १ ॥ अलख तमाखू ग्यान अगनसें । जलकर, मायाधूर छोड देना ॥ २ ॥ कहत सोहिरा सतसंग धरना । अहंमलीसें नळी खलील कर देना ॥ ३ ॥"**

आपल्या दुष्कृतीनें श्रीसोहिरोबानाथांवर कांहींच परिणाम न झालेला पाहून तो हुक्केवाला इसम खजील झाला व त्यानें त्यांची माफी मागितली.

**९. उज्जनींत मठस्थापनाः**—ग्वाल्हेरींत बरेच दिवस वास झाल्यावर श्रीसोहिरोबानाथ उज्जनीस आले. उज्जनी हें माळव्यांतील एक प्रख्यात पवित्र स्थान असून तेथील हवामानही उत्तम असल्याकारणानें श्रीसोहिरोबानाथांनीं तेथें कायमचें रहाण्याचें निश्चित करून तेथें ते मठ बांधून राहिले. श्रीसोहिरोबानाथ हे उज्जनीस आले त्यावेळीं ते प्रथम एका धर्मशाळेंत उतरले होते. त्याच धर्मशाळेंत रात्रौ गांवचे '**विठ्ठलाचार्य**' नामक एक विषयासक्त इसम '**चंपा**' नामक स्त्रीशीं एकांत साधून पापाचरण करीत असे. ही गोष्ट श्रीसोहिरोबानाथांच्या लक्षांत येऊन त्यांनीं त्या उभयतांना उपरती व्हावी व त्यांनीं ह्या कुमार्गापासून परावृत्त होऊन ईश्वरभक्तीला लागावें व जन्ममरणापासून मुक्त व्हावें एतदर्थ उपदेशपर पांच पदें रचिलीं. पण त्यांचा त्या पामरांच्या अंतःकरणांवर मुळींच परिणाम झाला नाहीं. उलटपक्षीं, त्यांस श्रीसोहिरोबानाथांचा राग आला व त्या निष्ठुर अधमांनीं आपल्या मार्गाची ही उपाधि कायमची नाहींशी व्हावी या उद्देशानें श्रीसोहिरोबानाथांस जवळच असलेल्या एका विहिरींत

लोटून दिलें. चमत्कार असा कीं, श्रीसोहिरोबानाथ योगबलानें वर आले. विहिरींतील आपल्या स्थितीचें वर्णन त्यांनीं " **स्थान बरें जलवास । जेथें स्वप्नीं नसे खलत्रास ॥ ध्रु० ॥** " या पदांत केलें आहे. श्रीसोहिरोबानाथ धर्मशाळेंत पूर्ववत् आनंदांत बसलेले पाहून विठ्ठलाचार्य फार खजील झाले.

**१०. महाप्रयाणः**—उज्जनींत श्रीसोहिरोबानाथ सुमारें १० वर्षें होते. इतक्या अवधींत त्यांजपाशीं शिष्यसमुदाय बराच जमला होता. त्यांचे दोन मुलगेही त्यांच्या जवळच होते. शके १७१४ म्हणजे इ. स. १७९२ या वर्षी चैत्र शुद्ध नवमीस श्रीसोहिरोबानाथ मटांतून एकटेच बाहेर पडले ते फिरून कोणाच्या दृष्टीस पडले नाहींत. त्यांच्या मुलांनीं व शिष्यमंडळींनीं त्यांच्या शोधार्थ हरएक प्रयत्न केले पण ते सारे निष्फळ झाले. त्यांचा कांहींच पत्ता लागला नाहीं. ते ज्या दिवशीं गुप्त झाले त्या दिवशीं त्यांच्या बिछान्यावर त्यांच्या शिष्यमंडळीस पुढील पद मिळालें, जें त्यांच्या गुप्तप्रयाणावर बराचसा प्रकाश पाडतें:—

> **" दिसणें हें सरलें । अवघें प्राक्तन हें मुरलें ॥ ध्रु० ॥ आलों नाहीं गेलों नाहीं । मध्यें दिसणें हे भ्रांती । जागृत होतां स्वप्नचि हरपे । कर्पुरन्यायें जग हरलें ॥ १ ॥ दिसणें हाचि जन्म योगियां । ना दिसणें हा मृत्यु म्हणा । गैबिप्रसादें गैबचि झालें । आपआपणा-मध्यें लपलें ॥ २ ॥ मच्छिंदर गोरख जालंधर हे । न्याया आले स्वस्वरूपीं । जातां जातां गमनग्राम तें । समूळ कोठें ना गमलें ॥३॥ म्हणे सोहिरा सत्रा चौदा । मधुमासाच्या नवमदिनीं । सगुण स्वरूपीं निर्गुण ठेलें । अनुभव हरले स्वरूप कळे ॥ ४ ॥"**

संतशिरोमणी श्रीतुकाराममहाराज यांच्या प्रयाणासंबंधीं श्रीरंगनाथस्वामींनीं " **या बोला साराचि कथितों । दिसणें तें हाचि जन्म ॥ अदृश्य मरण योग्याचें । निजरंगीं अघटित धर्म** " हे जे उद्गार काढले आहेत तेच श्रीसोहिरोबानाथांना तंतोतंत लागू पडतात. असो. श्रीरामनवमीसारख्या शुभदिनीं श्रीसोहिरोबानाथ आपलें अवतारकार्य संपवून निजधामाला गेले. त्यावेळीं त्यांचें वय सुमारें ८० वर्षांचें होतें. त्यांच्या दोन्ही मुलांनीं पुढें आपले देह उज्जनींतच ठेवले.

**११. पश्चात्समागमः**—श्रीएकनाथमहाराजांनीं श्रीमद्भागवताच्या एकादश-स्कंधावरील टीकेच्या शेवटीं श्रीकृष्णपरमात्म्याच्या अवतारकार्यसमाप्ति-प्रसंगविशेषसंबंधानें " **कृष्णें देह नेला ना त्यागिला । तो लीलाविग्रहें संचला । निजभक्तध्यानीं प्रतिष्ठिला । स्वयें निजधामा गेला निजात्मयोगें ॥** ३१-१५५ ॥ " असे महत्त्वाचे उद्गार काढले आहेत, व ज्याप्रमाणें श्रीकृष्णभगवंतांनीं आपला देह कोठें नेला नाहीं किंवा

श्रीसोहिरोबानाथांची बांदें येथील जीर्ण समाधि.



श्लोक.

समाधीतें ऐशा निरखुनि अती जीर्ण स्वरुपीं ।
सखेदाश्चर्याच्या उठति लहरी मद्हृदकुपीं ॥
तरी पादूकांतें करुनि नमना प्रार्थित असें ।
करोनी ते,सोई जन निववि जे भक्तिसुरसें ॥



श्रीसोहिरोबानाथांच्या बांदें येथील पादुका.

टाकला नाहीं; तो केवळ त्यांच्या लीलाविग्रहेंकरून त्यांच्या भक्तांच्या ध्यानीं प्रतिष्ठित झाला, त्याचप्रमाणें संत ह्या भगवंताच्याच मूर्ति असल्यामुळें तेही तसेच स्वभक्तांच्या बुद्धींत व वाङ्मयांत प्रतिष्ठित होत असतात. म्हणून अशा वाङ्मयाचें भक्तिभावानें पारायण करणाऱ्या स्वभक्तास ते नेहमी प्रगटच रहातात. असो. श्रीसोहिरोबानाथांनी या बाबतींत तर आपल्या शिष्यवर्गास आपल्या पश्चात् कोणत्याच प्रकारची वाण पडूं नये म्हणून वाङ्मय-सामुग्री अगदीं भरपूर करून ठेविली आहे. याबद्दलची सविस्तर माहिती प्रस्तुत चरित्राच्या "**कवित्वस्फूर्ति व ग्रंथलेखन**" या ५ व्या मथळ्याखालीं मागेंच आली आहे. याशिवाय या योगिराजाच्या पुनीत करणाऱ्या पादुकांची व ज्या घरांत त्यांचें पूजार्चन सांप्रत चालू आहे त्या घराची आणि ह्या घराच्या बाजूस असलेल्या त्यांच्या समाधीची त्रोटक हकीगत देऊन व ह्या एकादश-वाक्सुमनमालेंतील हें शेवटचें पुष्प गुंफून ही माला अर्थात् ही पवित्र चरित्रकथा श्रीसमर्थांच्या आज्ञेनुरूप "**श्रीराम-कर्ता**" या दृढ भावनेनें श्रीसद्गुरुचरणीं सप्रेम समर्पण करतों.

**( १ ) रहातें घरः**—बांदे मुक्कामीं श्रीसोहिरोबानाथांचा ज्या घरांत जन्म झाला त्या घरांतूनच ते तीर्थाटनास शेवटचे निघून गेले. हें घर आतां सुधारलेलें असून त्यांत श्रीयुत सीताराम लक्ष्मण आंबिये—श्रीसोहिरोबा-नाथांपासून सहावे पुरुष—रहात असतात. या घराचें छायाचित्र अन्यत्र दिलें आहे.

**( २ ) पायींच्या पादुका व बसण्याचा पाटः**—श्रीसोहिरोबानाथ नेहमीं वापरीत असलेल्या पादुका त्यांच्या घरांतच त्यांच्या नेहमी बसा-वयाच्या पाटावर प्रस्थापित केलेल्या असून त्यांचें पूजार्चन वगैरे तेथें अद्याप त्यांचे वंशज त्यांच्या कृपेनें नित्यनेमानें चालवीत आहेत. पादुकांचें व पाटाचें छायाचित्र अन्यत्र दिलें आहे.

**( ३ ) समाधिः**—ही समाधि श्रीसोहिरोबानाथांच्या वंशांतील एका भाविक पुरुषानें सुमारें १२५ वर्षांपूर्वी बांधावयास घेतली होती व ती तयार होतांच त्यांच्या संग्रहीं असलेल्या श्रीसोहिरोबानाथांच्या वर उल्लेख केलेल्या पादुका प्रस्थापित करावयाच्या होत्या. पुढें सभामंडप वगैरे बांधून तेथें भजनपूजनादि सेवाक्रम सतत चालू रहावा अशी त्यांची इच्छा होती. पण दुर्दैवानें या समाधीचें काम पुरें होण्यापूर्वींच हा पुरुष परलोकवासी होऊन काम बंद पडलें, तें अद्यापपर्यंत त्याच स्थितींत आहे. ही मोठी दुःखाची गोष्ट होय! इतकेंच नव्हे तर कांहीं काळ लोटल्यावर योगिराजांप्रीत्यर्थ उभारलेल्या या समाधीपुढें कचरा वगैरे पडू

लागला; परंतु तेथें सर्प निघूं लागल्यामुळें कचरा टाकण्याचें आतां बंद झालें आहे, असें समजतें.

या समाधीचें अपुरें राहिलेलें काम श्रीसोहिरोबानाथांबद्दल आदर व प्रेम असलेले वाडीप्रांतांतील भाविक जन हातांत घेऊन ज्या पुण्यपुरुषानें ह्या पवित्र कामास सुरवात केली त्याचा सत्यसंकल्प सत्वर शेवटास नेतील अशी आशा आहे. आम्हीही वाडींतील कांहीं प्रमुख सज्जनांबरोबर या बाबतींत पत्रव्यवहार चालू केला असून प्रभुकृपेनें त्यांत पूर्ण यश मिळेल अशी आशा करतों. समाधीच्या अन्यत्र छापलेल्या छायाचित्रावरून समाधि सध्यां कोणत्या स्थितींत आहे, याची बरोबर कल्पना होण्यासारखी आहे. श्रीसोहिरोबानाथांची समाधि या स्थितींत असणें हें नवल, कीं श्रीवामनपंडितांसारख्या महाराष्ट्रांतील प्रख्यात संतकवींची समाधि वाईपासून फक्त ३।४ मैलांवर असलेल्या भोगांवी—कृष्णातटाकीं—जीर्णावस्थेंत असणें हें नवल ? तथापि आनंदाची गोष्ट ही की, गुरुवर्य श्रीरामचंद्र शंकर टाकीमहाराज ऊर्फ श्रीभाई यांनी इ. स. १९२१ सालीं कांहीं भक्त-मंडळीसह तेथें जाऊन समाधीचा जीर्णोद्धार केला. त्या वर्षापासून पुढें प्रतिवर्षी पंडितांच्या पुण्यतिथिदिनीं म्हणजे वैशाख शुद्ध ६ स तेथें महोत्सव साजरा करण्यांत येत असतो. त्याचप्रमाणें श्रीसोहिरोबानाथांच्या या समाधीचा जीर्णोद्धार करून नंतर तेथें त्यांच्या पुण्य-तिथीस वाडीप्रांतांतील भाविक मंडळीनें जमून उत्सव मोठ्या थाटानें साजरा करावा अशी त्यांस आमची प्रेमाची सूचना आहे. असो. “**अक्कलकोट, सुरत व उज्जनी या ठिकाणीं श्रीसोहिरोबानाथांचे मठ अद्याप असून, त्यांची स्थिति चांगली आहे असें समजतें,**” असें श्रीयुत आजगांवकर आपल्या ‘महाराष्ट्रकविचरित्रां’त म्हणतात.

## प्रार्थना.

**करी वामन प्रार्थना श्रीमुकुंदा ! तुझ्या भक्तपायांचिया धूलिवृंदा ।**
**हरी ! घालिं माझे शिरीं सर्वकाळीं, वहातोसि अंगेंचि ज्या पायधूळी ॥**

**॥ श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ॥**

# योगिराज श्रीसोहिरोबानाथ आंबिये

## यांचें श्रीराजाराम प्रासादिकृत

# पद्यात्मक चरित्र.

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ जयसद्गुरु पुराणपुरुषा । षड्शास्त्राची सौरसा । वेदमूर्ति तूं परेशा । श्रीसिद्धेशा कृपाराशी ॥ १ ॥ भक्तचरित्रें नानाकथा । आवडती तुम्हां पंढरिनाथा । बहु आख्यान भारत-गीता । प्रिय सर्वथा ते तुज हरी ॥ २ ॥ जयजय आदि निरंजना । निर्गुण निरामय आत्मारमणा । स्वानुभूती मोदसदना । चिद्घना श्रीस्वयं-जोती ॥ ३ ॥ स्वात्मप्रकाशदिनकरा । ज्ञानाज्ञान सकळविकारा । दिनरज-नीशी आधारा । तूंचि खरा सर्वत्र ॥ ४ ॥ भूमिपासुनी आकाशांत । स्वय-मेवाचि वर्तत । जडअजडा चेववीत । लीळा अनंत रघुराया ॥ ५ ॥ आवधि-यासी चाळक । अलिप्तपणें वसशी देख । वर्णावया सहस्रमुख । वाणी निःशंक न पुरे ती ॥ ६ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण । चौथे जे महाकारण । तयाशी ते अधिष्ठान । निखील परीपूर्ण तूं आत्मया ॥ ७ ॥ तुजविणें पाहातां कांहींच न घडे । राहाशी कर्तुत्वा पैलीकडे । अक्रिय आरूप कानडे । ठावे न पडे शब्दाशी ॥ ८ ॥ यालागिं बरें हेचि आतां । मौनें चरणीं ठेविजे माथा । बोलवा स्वामी संतकथा । सिद्धनाथा गुरुवर्या ॥ ९ ॥ चरित्ररूप सरीतापति । कल्पतरू कथामूर्ति । नाना आख्यानकीर्णे गभस्ति । अवतरला जगतीं तो शौनक ॥ १० ॥ आतां गहिनीनाथ गोरक्षशिष्य । तयाचा अव-तार जाहाला विशेष । ते कथा ऐकतां सुरस । हरे निशेष पातक पैं ॥ ११ ॥ प्रेमज्ञान ज्या अंतरीं । ब्राह्मण गौड सदाच्यारी । जन्म घेतला तया उदरीं । पाहिली बरी सोय भक्तीची ॥ १२ ॥ भक्त अळंकार जानकीवरा । तयामध्यें गहिनी हिरा । यालागी म्हणती जगा सोइरा । अवतार खरा नाथाचा ॥ १३ ॥ सावताचे वाडीजवळ । ग्राम (बांदें) ते प्रांजळ । योगनिष्ठ ते जन्मले । सौंदर्य भले तेजस्वी ॥ १४ ॥ उपजतांचि नैनी मुद्रा । ब्रह्मस्थीती जेंवि कपेंद्रा । ते काय कळे जना क्षुद्रा । नाहीं निद्रा म्हणती तया ॥ १५ ॥ नासिकाग्रीं सदा दृष्टी । वसे आंगीं ज्याचे पुष्टी । वासनेची अखंड तुष्टी । नेणती गोष्टी इतर ते ॥ १६ ॥ भूतबाधा जाली वाटे । जनकजननीसी होती

कष्ट । आंगारे लाविती तया स्पष्ट । संशय वरीष्ट शिरला मनीं ॥ १७ ॥ तव अकस्मात अवधूतवेश । आला सिद्ध तद्दर्शनास । सांगीतलें सर्वांस । मायबापास तेवेळे ॥ १८ ॥ जन्मला उदरीं योगीराणा । आशंका चित्तीं कांही नाणा । सांगुनी पुढील कर्तृत्व खुणा । तेथें चि जाणा अदृश्य जाहाला ॥ १९ ॥ मग दचकले सारे मनीं । न विसंबे बाळा कदा जननी । दाटला पान्हा सहजी स्तनीं । उतरी वरुनी लोण ते ॥ २० ॥ सोहिरा न पाहातां क्षणेक । वेडी होये माता देख । बाळलीळा करी कौतुक । संतनायक योगि तो ॥ २१ ॥ आठवर्षे होती जाहाली । मुंजीबंधन तयेवेळीं । योगसिद्धी माळ घाली । लोका दाविली ख्रियाते ॥ २२ ॥ कृषिकर्म करणें उत्तम । सात्विकाचार वर्तती धर्म । परी अंतरीं वैराग्य परम । भाव निःशीम श्रीगुरुपदीं ॥ २३ ॥ उपनाम आंबे शोभायमान । उतरीती भवाब्धी पार करून । नातरी अच्युतवृक्षाशी जाण । नामाभिधान आंबे ते ॥ २४ ॥ स्वरुपापासून नव्हे च्यूत । यालागी आंबे नामे अच्युत । सोहिरोबा आंबे धन्य संत । अवतार दिसत गहीनीचा ॥ २५ ॥ अत्यंत ज्ञान गहन ज्याचें । भक्ति वैराग्य पूर्ण साचें । नेणति तया नर काचे । नरकाचे आंदणें तें ॥ २६ ॥ साधुविण नाहीं जगती । जगा न कळे त्याची स्थीती । ढोंग पाहुनी पाठी लागती । मनीं इच्छिती चमत्कार ॥ २७ ॥ इतर जन नारीनर । तैसे दिसती योगेश्वर । परी तयाचें अंतर । भगवत्पर सर्वदा ॥ २८ ॥ जटा असो अथवा नसो । निरंतर प्रेम चित्तीं वसो । आत्मानुभवीं मन कसो । बोलणें सोसो जगाचें ॥ २९ ॥ नाहीं माळमुद्रेचें काम । अंतरीं पूर्ण ज्याचा राम । तया कैचे उरलें कर्म । जाहाला निष्कर्म योगी तो ॥ ३० ॥ सहजस्थीति ज्याचे वर्तणें । न देखे डोळां पातक पूर्ण । सर्वाभूतीं येक आपण । द्वैत निर्शन जालें तें ॥ ३१ ॥ ऐसे प्रकारें ब्रह्मनिष्ट । सोहीरोबा आंबे साधु श्रेष्ठ । जगरीति वर्तती स्पष्ट । भावनिष्ट सद्गुरुपदा ॥ ३२ ॥ नित्य शेतांकडे जावे । येईल त्याचे आतिथ्य करावें । सर्वाभूती आत्मत्व पाहावे । भोजन द्यावे क्षुदार्था ॥ ३३ ॥ कोणे येके दिनीं आरण्यांत । बैसले येकावृक्षाखालते । जवळी असती शेते भाते । उदक वाहत निर्मळ पै ॥ ३४ ॥ प्राप्तीवेळसमय आला । अद्भुत वर्तली तेथें लीळा । योगीयाचा स्वामी पातला । गोरक्ष ज्याला म्हणती पै ॥ ३५ ॥ आकाशपंथे दैदीप्यमान । नाथजीचे जाले गमन । मूर्ति पाहातां झाकले नैन । तेज पूर्ण दाटलें ॥ ३६ ॥ सडपातळ

दिव्य पुरुष । भस्मोधूलित आंगीं प्रकाश । प्रसन्नवदन मुद्रा विलसे । आले योगेश त्या ठाया ॥ ३७ ॥ येकत्र होता उभय दृष्टी । हारपोनी गेली सहजी त्रिपुटी । मंत्रोपदेश कर्णपुटी । कृपादृष्टी नाथजीची ॥ ३८ ॥ पद्मकर तो पडतां शिरीं । देहभान कैचें शरीरीं । ताटस्ता वरीली बरी । नाही सरी दुजी तया ॥ ३९ ॥ घेरीला सोयरा महद्भुतानें । अचेतन पडला सहजीं जाण । आलक्ष मूद्रा बाणली पूर्ण । कोण जाणे तया सुखे ॥ ४० ॥ जेथें प्रत्यक्ष गोरक्षाचा । अनुग्रह जाला तयासा साचा । ते कोण वर्णी ग्रंथीं वाचा । दृष्टांताचा तर्क न चले ॥ ४१ ॥ झडपण जाहाली ब्रह्मग्रहाची । तेथें शुद्धि उरेल कैची । धावुनि आली समग्र घरची । देवऋष्याची घरें फिरती ॥ ४२ ॥ नानाप्रकारें करीती उपाय । वोवाळुनी टाकिती द्विपाद चतुष्पाद । परी तो सोहिरा कोणा न पाहे । जाला अकाय काय आसोनी ॥ ४३ ॥ विदेह स्वरूपी जडली विवशी । तन्मय जाहाला आत्म-रूपाशी । रमली वृत्ति स्वानंदाशीं । जाल्या दाशी मुक्ति त्या ॥ ४४ ॥ असो कांहीं काळानंतर । सावरोनी प्रेमा स्वरूपकार । विचरती महिवर योगेश्वर । बोलती उद्गार ब्रह्मीचे ॥ ४५ ॥ भोजनाची होता तृप्ती । ढेकर बाहीर जेवि येति । जना शब्द ते नकळती । धिःकारीती वेडा म्हणुनी ॥४६॥ परापेक्षा स्नानभोजन । आपला अपण देवार्चन । सोहीरोबा संत योगी पूर्ण । शिष्य जाण गोरक्षाचा ॥ ४७ ॥ ऐशा प्रकारे स्वगृही । खुळयासारीखे रतती दही । प्रपंच कार्थ करणें नाहीं । निमग्न ठाई चिदाकाशी ॥ ४८ ॥ जगदोद्धार तया दर्शनीं । हें जाणुनी गोरक्ष मनीं । आज्ञापिती शिष्या-लागुनी । भ्रमण मेदीनी करावया ॥ ४९ ॥ गुप्तरूपें देउनी भेटी । सांगि-तली दुजी गोष्टी । टीका करी शुद्ध म्हराठी । आत्मराहाटी लावी जगा ॥५०॥ छपन्न भाषा गीतेवर । योजिल्या श्रीज्ञानेश्वरें । अडचणती नारीनर । दावी सत्वर मार्ग तया ॥ ५१ ॥ आधार धरुनी ज्ञानेश्वरीचा । अनुभवेश्वरी बोलीजे वाचा । प्रसाद होता गोरक्षाचा । सोहिरा साचा आनंदला ॥ ५२ ॥ ज्ञानदेवाचें करुनी स्मरण । वंदिला भावें बादरायण । आठवी श्रीकृष्ण । अंतःकर्ण कृष्णरूप ॥ ५३ ॥ देहबुद्धी नसतां कांहीं । कृष्णस्वरूप तो चि पाही । ज्ञानेश्वरीशी द्वैत नाहीं । रचिला ठाई ग्रंथ सुंदर ॥ ५४ ॥ अनुभवे-श्वरी म्हणती जन । ज्ञानदेवीची प्रतिमा पूर्ण । अनुभव होये श्रवणपठणें । अवलोकन करीती संत ॥ ५५ ॥ धन्य सोहिरोबासाधु समर्थ । श्रीगहिनीचा

अवतार सत्य । तारावया जडजीवातें । जन्मले नाथ भूठाई ॥ ५६ ॥ स्वइच्छे फिरती अवनीवरी । मुद्रा नैनीं शोभती बरी । गृहस्थापरी वस्त्रें शरीरीं । घातिले शिरीं पागोटें ॥ ५७ ॥ मुळीचा बाणा करावा प्रघट । तरी लोक सारे लोभाविष्ट । द्रव्यदारा इच्छीती स्पष्ट । सांडीली वरिष्ट आत्मस्थीति ॥ ५८ ॥ यालागी वोळख न देता । जगांत हिंडणें तया नाथा । सोइ दावी जना समस्ता । सोइरा तत्वता नाम शोभे ॥ ५९ ॥ अनुभवनिष्ट ज्याचीं पदें । श्रवणपठणें भेटे मुकुंद । प्राप्त होये निजात्मपद । धरीतां छंद श्रीगुरुपदीं ॥ ६० ॥ अनेक देश फिरोन । जगदोद्धार केला पूर्ण । पंढरीसी येतां जाण । श्रीभगवान आले सामोरे ॥ ६१ ॥ धरिला हातीं तो सोहीरा । म्हणती माझा तूं सोईरा । भेटलाशी मज योगेंद्रा । सुदिन खरा जाला पै ॥ ६२ ॥ आजी घडली पर्वें सकळ । ऐसे बोले श्रीविठ्ठल । देवभक्तासी आलिंगन जालें । नाहीं उरले द्वैत तया ॥ ६३ ॥ रंगशीळेवरी भजन । सोहिरोबा ते करीती पूर्ण । विटेवरी जगजीवन । आनंदानें डोलतसे ॥ ६४ ॥ कांहीं दिवस राहुनि तेथें । तोषविला रुक्मिणीकांत । समर्थ अवतार गहीनी-नाथ । सोहीरा म्हणत जन त्याशी ॥ ६५ ॥ नाना तऱ्हेचीं करुनी पदें । पुजीली जेणें भगवत्पदें । उद्धरोनी जग विविध । स्वात्मपद सेविले पै ॥ ६६ ॥ शेवटीं तो संत सोईरा । पांडुरंगमुगुटी जडला हिरा । तेणें कीरीट दिसे साजीरा । लाजवी दिनकरा स्वप्रकाशें ॥ ६७ ॥ हे सोहिरोबा-संत आख्यान । भक्तमालिके गुंफीता जाण । ढाळ देतसे ज्ञानतेजानें । शोभे पूर्ण विठलगळा ॥ ६८ ॥ पुढें कथा बनखंडीची । श्रीगुरुमाय वदवी साची । श्रवणमननें श्रोतयाची । पुरवी मनाची मनकामना ॥ ६९ ॥ मन ते सुखसींधूचा आंश । स्वसुख पाहिजे त्या अविनाश । स्वामी समर्थ श्री सिद्धेश । देती तयास तेचि तया ॥ ७० ॥ राजारामीं स्वतसिद्ध । दिधलें स्वयें निजात्मपद । उदार तोचि सद्गुरूसिद्ध । केले शुद्ध सनाथ पै ॥ ७१ ॥ भक्तमंजिरीमालाग्रंथ । श्रवणें चि पुरती मनोरथ । त्रिविध-लीला संतकथे । अध्याय समाप्त येक चि ॥ ७२ ॥ अध्याय ॥ १ ॥ समाप्त अनु० अ० ॥ ९४ ॥ समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीसीतारामचंद्रार्पण-मस्तु ॥ शुभंभवतु ॥

# श्रीसोहिरोबानाथ-कवितासंग्रह.

## (१) नामपर पदें.

पद १ लें.

अरे रे ! प्राण्या ! वदनीं वद कां रे ! हरिनाम ॥ ध्रु० ॥ भजनीं निजमानस देईं । त्यजनीं वैराग्य नेईं । विजनीं जनसमता घेईं । पूर्ण होईल निजसुखकाम ॥ अरे रे० ॥ १ ॥ धरिं कां दृढनिश्चय भक्ति । हरीं कां भवताप व्यक्ति । वरिं कां निजवैभव मुक्ति । हरीं कां जननमरण धाम ॥ अरे रे० ॥ २ ॥ उघडे निजज्ञानज्योति । विघडे अज्ञानपाती । सुघडे निजचक्षु होती । सोहिरा निजनामीं सुख विश्राम ॥ अरे रे० ॥ ३ ॥

पद २ रें.

घे हरघडीं हरिचें नाम । येणें पाव परात्पर निजसुखधाम ॥ ध्रु० ॥ सकलहि इंद्रियें-चाळक कवण हा । ओळख तूं आत्माराम ॥ घे हर० ॥ १ ॥ निरंजन वनीं रंजवुनी मन । करिं तूं हें हृदय आराम ॥ घे हर० ॥ २ ॥ म्हणे सोहिरा आयुष्य सरतें, हें तुला न स्मरतें । राहुं नको बेकाम ॥ घे हर० ॥ ३ ॥

पद ३ रें.

तूं राम राम स्मर रे ! । अगम अगोचर अनादिसिद्ध । अच्युत करुणाकर रे ! ॥ ध्रु० ॥ असोनि न दिसे, देहीं कसा

असे । चाळवी हें अंतर रे ! । साधुसमागम करोनि पुस हें । भवसागर हा तर रे ! ॥ तूं० ॥ १ ॥ अंतवंत हें शरीर यास्तव त्वरित सार्थक कर रे ! विष शमुनि संतोष पावला । जपतां शिवशंकर रे ! ॥ तूं० ॥ २ ॥ पूर्णब्रह्म वैकुंठपती । अवतार रमावर नर रे ! । लीलाधारी पदीं शिळा तारली, बहु उद्धरले वानर रे ! तूं० ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा रघुनंदन हा वंदुनि निरसीं मायामय दुर्धर रे! । लंकापतिसह दानव वधिले हा महाधनुर्धर रे ! ॥ तूं० ॥ ४ ॥

पद ४ थें.

नाम तुझें मी घेतां निशिदिनीं, विसरें हें भवदुःख ॥ ध्रु० ॥ राम-कृष्ण-विठ्ठल वदतां वाटे, सहजींचाची हरीख ॥ नाम० ॥ १ ॥ पराप्रेम प्रमेय होवरियेंत भोगीं शांतिसूख ॥ नाम० ॥ २ ॥ निरंजनिं निजल्या हें मन उन्मन, असतां नाहींच देख ॥ नाम० ॥ ३ ॥ अधोभास हा सोडुनि आपण, करवीं तें ऊर्ध्वमूख ॥ नाम० ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे हें अनादि भेटे, मजमाजीच पियूख ॥ नाम० ॥ ५ ॥

पद ५ वें.

नाम हरीचें जपतां गोड ॥ ध्रु० ॥ प्रेमोल्हासें ज्योति प्रकाशे । पुरतें निजसुख कोड ॥ नाम० ॥ १ ॥ नित्य निजरंगीं ज्ञान अनंगीं । नलगे इंद्रिय चाड ॥ नाम० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग निजसंजीवनीं । न धरे संशय आड ॥ नाम० ॥ ३ ॥

पद ६ वें.

नारायण चतुरक्षरीं जपतां प्रकटे स्वस्वरूप । सज्जनिं भजनीं विजनीं जनिं या रूपातीत रूप ॥ ध्रु० ॥ नाना छंदें नाना लीला खेळतसे जना । नाम ज्याचें घेतां सकळहि पुरवी कामना । नाना शास्त्रें न लगति कांहीं आणिक साधना ॥ नारायण० ॥ १ ॥

रासक्रीडा खेळत असतो यमुनेच्या तीरा । राधिका समवेत संगें अनेक सुंदरा । राजा रंक समान ज्यासी स्वरुपीं निर्धारा ॥ नारायण० ॥ २ ॥ यशवंत जाणुनि ज्याचा यम धरी भय । एकचि निश्चय भावी त्यातें सुख अप्रमेय । येणें जाणें नाहीं पुनरपि निर्गुण निर्भय ॥ नारायण० ॥ ३ ॥ णकार स्मरतां नित्य होय निजनाद-श्रवण । जेथ गेल्या नुरेचि मग हें माझें मीपण । म्हणे सोहिरा मग हें चुकतें भवदुःखभ्रमण ॥ नारायण० ॥ ४ ॥

पद ७ वें.

बोल रे नाम गोविंदाचें ॥ ध्रु० ॥ तनुमनधन तें जाणुनि अंतरीं । घोष करीं कां निशिदिनीं वाचे ॥ बोल० ॥ १ ॥ नाम-स्मरणीं भवभयहरणीं । विजयप्रद निजसुखाचें ॥ बोल० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे नाहीं मीतूंपण । हरेल भान हें विषयसुखाचें ॥ बोल० ॥ ३ ॥

पद ८ वें.

मुखें राम राम, बोल निजनाम ॥ ध्रु० ॥ नामामृत हें सेवुनियां रत । निजपदीं पावोनि विसरीं श्रम ॥ मुखें० ॥ १ ॥ भक्तिनेंच मुक्ति हे जोडे विरक्ति । सर्वांचि मन हें होय निष्काम ॥ मुखें० ॥ २ ॥ निष्कामपणें ओळखीं निजखुण । पावोनि अंतरीं होसी आराम ॥ मुखें० ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मग आरामपणें । आपेआपणची निजधाम ॥ मुखें० ॥ ४ ॥

पद ९ वें.

श्रीराम जयराम जयजयराम ॥ ध्रु० ॥ ऐसें निशिदिनीं नाम गातां । प्रेम स्वयेंचि येईल हातां । निजपदीं पावावें आराम ॥

श्रीराम० ॥ १ ॥ विषयापासूनि सुटेल । केवळ संसारासि विटेल । मन हें होइल निष्काम ॥ श्रीराम० ॥ २ ॥ देहिंचि चाळककळा गमेल । सर्वरूपीं समरंगीं रमेल । चित्सुख परात्पर निजधाम ॥ श्रीराम० ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे शिव स्मरतो । वाल्मिक पतीत पावन होतो । ऐसें सकळां तारक नाम ॥ श्रीराम० ॥ ४ ॥

पद १० वें.

हरि हरि म्हणतां रे ! अपार सुख तें ॥ ध्रु० ॥ स्मरणीं निमग्न स्वरुपीं संलग्न । सगुणींच निर्गुण सुख तें ॥ हरि० ॥ १ ॥ अंतरिक्ष जपणें अलक्ष । सर्वे निवारी दुःखातें ॥ हरि० ॥ २ ॥ मनोविलास हा होय निराश । विषयसुख मग दुःखचि तें ॥ हरि० ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निजानंदीं । पावोनि सेवीं पीयुष तें ॥ हरि० ॥ ४ ॥

पद ११ वें.

हरिनाम सुधारस हा नित्य सेवुनियां धावें ॥ ध्रु० ॥ आपेंचि आपण घेउनि हे खुण । मोक्षसुख साधावें ॥ हरिनाम० ॥ १ ॥ अलक्ष लक्षुनी सहज समाधी हे । चित्स्वरुपीं वेधावें ॥ हरिनाम० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे सकळांसि गणी तें । मीपण हें शोधावें ॥ हरिनाम० ॥ ३ ॥

पद १२ वें.

हे घनशाम गाऊं निजनामसुधा ॥ ध्रु० ॥ निजसुख एकचि, मानुनि साचचि; हरूं हा भास विविधा ॥ हे घनशाम० ॥ १ ॥ नित्य ध्यान हें गोड निदान; नाहीं मग हा भवबाधा ॥ हे घनशाम० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निजदिठी लागोनि, देखें स्वरुप अगाधा ॥ हे घनशाम० ॥ ३ ॥

# ( २ ) करुणापर पदें.

पद १ लें.

अरे! कां रे! दया न करिसी जगज्जीवना ॥ ध्रु० ॥ विकल्प उपजविसी, सर्वे नश्वर या जीवासी; निश्चय एकचि होइना ॥ अरे० ॥ १ ॥ वृत्ति हे डळमळी, माझी प्रवृत्ति कळवळी, येती विकार नाना ॥ अरे० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निजतत्त्वचि किर, येर हें मृगनीर; ऐसें दावीं निरंजना ॥ अरे० ॥ ३ ॥

पद २ रें.

ऐसी करीं हो! दया। परतोनि मन न धरी, या देहाची माया ॥ ध्रु० ॥ कवणे ठाया कवण गेलें। कवणें काय भेटविलें ॥ अवचटेंची काय झालें। उमज ना जया ॥ १ ॥ पाहों जातां जया आदि। अंतीं लागली समाधि ॥ गेलियाची नाहीं शुद्धि। आपुलिया ठाया ॥ २ ॥ मी मजला पावुनि। स्थिर तेथें राहुनि ॥ कल्पनाहि जाय जंव। आपआपें लया ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निरामया। झालीच ना हेचि काया ॥ मिठि पडली चिन्मयासी। मिनली तन्मया ॥ ४ ॥

पद ३ रें.

कां रे! सत्त्व पाहसी हृषिकेशी!। प्रकट न करितां अंतरीं आपैसी। पाडिसी मिथ्या अविचार मायाविवशी। अजुनि करुणा तुजला नये रे कैशी ॥ कां रे० ॥ १ ॥ मज या देहीं देउनी जीवपण। विषयविलासीं लावुनियां भ्रमण। माझें मज न दावुनी निजउगाण। ऐसें तुझें हें काय बरवेंपण ॥ कां रे० ॥ २ ॥ जगप्रसिद्ध तूं कीं दीनदयाळ। तुजला उपजे निजभक्तांची कळवळ।

त्याकारणें परमामृतकल्लोळ । सेवविसी तूं अंतरींच घननीळ ॥ कां रे० ॥ ३ ॥ सत्वर नवजाई मी या विकल्पाच्या काजा । ऐसें करि कां जगज्जीवन अधोक्षजा । कारण कार्यीं प्रकटोनियां सहजा । हेंचि भावोनी अभाव निर्जीं निजा ॥ कां रे० ॥ ४ ॥ सोहिरा तुजला शरण येतो भावें । भावातित ते परब्रह्माचि आघवें । बोलों जातां तें शब्दासी न ठावें । पूर्णज्ञान आपणापेंचि घ्यावें ॥ कां रे० ॥ ५ ॥

पद ४ थें.

करुणा करीं कां रे ! स्वामी ! ॥ ध्रु० ॥ चिदानंदचिंतन सन्मनरंजन । दे सुख सज्जन तव नामीं ॥ करुणा० ॥ १ ॥ पूर्ण दया करीं ताप समूळ हरीं । दे सुख अंतरीं निरिच्छ परधामीं ॥ करुणा० ॥ २ ॥ करिं अवलोकन भवविच्छेदन । सोहिरा शरण तवपदपद्मीं ॥ करुणा० ॥ ३ ॥

पद ५ वें.

ऐसा जन्म नको हा मला । देवा ! शरण येतों मी तुला ॥ ध्रु० ॥ देह हें जाण जिवाला मोट । बांधुनि केलासे कडेलोट । तेथ श्रमतों भरतां पोट । दुःखें भोगिलीं कोटिनकोट ॥ ऐसा० ॥ १ ॥ जन्मांतरिंचें पुण्यपाप । प्राप्त जाहले त्रिविध ताप । आयुष्याचें भरतें माप । डोळां पडलि मोहाचि झोंप ॥ ऐसा० ॥ २ ॥ आपण पडला असतां बंदीं । आणिक लोकांलाही निंदी । दुष्ट दुरात्मा हा द्वंद्वधी । करोनि होत समंधी ॥ ऐसा० ॥ ३ ॥ ज्याला सुचेनाची सुटका । धरितो अभिमान हा लटका । अडला देहबुद्धिच्या अटका । ईश्वर स्मरेना एक घटका ॥ ऐसा० ॥ ४ ॥ न रुचे संतांची सोबत । पाठीं धांवेना लोंबत । नाहीं योगाला झोंबत । नायके अनाहत नौबत ॥ ऐसा० ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे

यांतुनि सोडीं । आवरीं मानसाच्या ओढी । दहाही इंद्रियांतें कोंडीं । लावीं आत्मस्वरूपीं गोडी ॥ ऐसा० ॥ ६ ॥

पद ६ वें.

जगजीवनजी दीनोद्धार! ॥ ध्रु० ॥ आत्मानात्मविवेक सुमति-सुख दावीं हें सारासार । लटिकें देह हें गेह करुनि जीव भोगि-तसे दुःख फार ॥ जग० ॥ १ ॥ मुक्त करुनियां गुप्त स्वरूपीं दे दर्शन उक्त प्रकार । हे विश्वंभर करुणाकर! लवकर भवसिंधु करिं पार ॥ जग० ॥ २ ॥ योगयुक्ति दे शून्यमंडळीं मन हें जाऊं एक-वार । भक्तकाजकल्पद्रुम सद्गुरु दाता परम उदार ॥ जग० ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा कामक्रोध मारुनि मदमत्सर दानवां उतरणें भार । युगायुगीं तूं धरिसी नानारूप लीलावतार ॥ जग० ॥ ४ ॥

पद ७ वें.

तुजविण आणिक नाहीं काम ॥ ध्रु० ॥ कार्यीं कारण निरसु-नियां जहीं । पाविजे निजस्वरूपीं आराम ॥ तुजविण० ॥ १ ॥ काजें काज हें जाणुनियां निकें । सर्वहि देखतां आत्माराम ॥ तुजविण० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग नगरूप हारोनी । निवटिजे एक सकळीं हेम ॥ तुजविण० ॥ ३ ॥

पद ८ वें.

तुजविण आणिक नाहीं रे! मज । कळोनि आलें हें आजि सहज ॥ ध्रु० ॥ अनेक रूपीं एका नगरनायका ॥ १ ॥ अलख निरंजना । दत्त चिद्धना ॥ २ ॥ जगदखिलपालना । हे लीला-लालना ॥ ३ ॥ भक्तजनतत्परा । प्रेम परात्परा ॥ ४ ॥ जयजया विशुद्धा । देव अनादिसिद्धा ॥ ५ ॥ सदयहृद्रता । हृदयनिवा-सिता ॥ ६ ॥ दिसे तें पावेल अस्तु । तूं अविनाश वस्तु ॥ ७ ॥

जगनगनगरा । हे करुणासागरा ॥ ८ ॥ सुख नाहीं हो कोठें । संसारीं दुःख मोठें ॥ ९ ॥ किती वोखें हे कूड । प्रत्यक्ष लांकूड ॥ १० ॥ देह हें जांयाचें । अंतीं हें जायाचें ॥ ११ ॥ जळो परतें हें पोट । आणि जळो तें चिरगूट ॥ १२ ॥ मासा करी चळवळ । परि केधवां नेणों पडेल जाळ ॥ १३ ॥ संसारिया सुख तैसें । केव्हां नेणों न्हेसिल कैसें ॥ १४ ॥ विषयसुखीं अनावडी । लागो तुझी पुरती गोडी ॥ १५ ॥ सोहिरा म्हणे मागतसों । बोलासारिखें आंगीं असो ॥ १६ ॥

पद ९ वें.

तुजविण न गमे, न गमे मज हे घडि रे ॥ ध्रु० ॥ निष्कामाची, निजधामाची, आरामाची, भवसागरीं कामाची, या हरिनामाची सांगडि रे ॥ तुज० ॥ १ ॥ मायिक संसार, असार हा जाणुनि, जे कां भजती तुज, ते पावती परंपरथडि रे ॥ तुज० ॥ २ ॥ महानंद समुद्र, पौर्णिमेचा पूर्णचंद्र, जो कां भवनत्रय नरेंद्र, तो तूं संताचा संवगडि रे ॥ तुज० ॥ ३ ॥ अज्ञानबेडी, सर्वेचि तोडी, पांच पांचाठायीं विघडी, मनाला आपणापाशीं ओढी, मोक्षपदाचा दरवाजा उघडी रे ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा निकट निरंजनीं रंजुनियां, परिपूर्ण सदोदित ब्रह्मरूप निज नित्य निवासी, टाकुनि सकळिक प्रापंचिक परवडि रे ॥ तुज० ॥ ५ ॥

पद १० वें.

तुजविण रे ! दाता, तारी कोण मज आतां ॥ ध्रु० ॥ या त्रिविधपणें मज वेढुनि केला बहुसाळ वेडा । येथ न चाले ममसत्ता ॥ तुजवि० ॥ १ ॥ विदेहता नाठवुनि झाली देहत्व सिद्धता । अज्ञानें आकळुनी पृष्ठीं लागली ममता ॥ तुज० ॥ २ ॥ विकल्प उदधींत पडोनी बुडतों समूळ मी पाहीं । काढी कोण तरी

वरुता ॥ तुजविण० ॥ ३ ॥ जाणोनियां मानसीं वरी तूं अकल्पित देसी। वंदी सोहिरा देहातीता ॥ तुजविण० ॥ ४ ॥

पद ११ वें.

तुजविण रे भगवान्! कोठेंचि मन हें न जडो ॥ ध्रु० ॥ मिथ्या ऐसें दिसोनि सकळहि विषयसौख्य नावडो। प्रारब्धास्तव जे जे समयीं घडेल तें सुखें घडो ॥ १ ॥ योगलक्ष निजधैर्य जड-जीवां मोहांत ना सांपडो। आयुष्य पुरल्या देह तरी कोठें पडेल तेथें पडो ॥ २ ॥ प्रपंचरहाटीं वर्तत असतां कोणीकडे ना अडो। वैराग्यअग्निनें प्रचंड होउनि अखंडीत कडकडो ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा विपरित बुद्धीचा कुसंग हा विघडो। मुमुक्षु होउनि केवळब्रह्मिचें मोक्षद्वार उघडो ॥ ४ ॥

पद १२ वें.

तुझा तूंचि राखें जी! हें निजब्रीद ॥ ध्रु० ॥ निष्काम निर्द्वंद्व निःसंग निर्मळ। जितेंद्रिय तूं ब्रह्मविद् ॥ तुझा० ॥ १ ॥ तुजला देखतां आपेंचि तत्त्वतां। आनंदती नयनारविंद ॥ तुझा० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निशिदिनीं भाविता। हृदयींच तूं गोविंद ॥ तुझा० ॥ ३ ॥

पद १३ वें.

दावीं वदन हरि! हरीं हा मदन ॥ ध्रु० ॥ याविषयीं मज देई विवसी। येउनि पावे तें निजसुखसदन ॥ दावीं० ॥ १ ॥ सकळही इंद्रियें नेई निजालयीं। सर्वेचिं आटुनि करिं कां कदन ॥ दावीं० ॥ २ ॥ सोहिरा म्हणे परात्पररूपीं। जीवपण हारोनि करिं कां तपन ॥ दावीं० ॥ ३ ॥

पद १४ वें. ✓

देशिल जरि तरि हें देणें ॥ ध्रु० ॥ मीपण मावळे, दिठी पुंजाळे, कल्पना गळे, जग जळे हें तेणें ॥ देशिल० ॥ १ ॥ विषयां-

वेगळें सुख, 'नाहीं रूप रेख,' सहज समाधान होय जेणें ॥ देशिल० ॥ २ ॥ जळीं मिळालें लवण, जळचि झालें तेवीं, मनासि नाहीं येणें ॥ देशिल० ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे जया, काया नाहीं माया, पवन गगनीं लयासि नेणें ॥ देशिल० ॥ ४ ॥

पद १५ वें.

भगवंता ! तुझी गोडी लाव रे ! । परमानंद परात्पर पूर्ण । स्वरूप तुझें कीं दाव रे ! ॥ ध्रु० ॥ जेणेंकरोनि हे निघोनि जातिल । रज तम दुष्ट स्वभाव रे ! । चिद्घन सहज अनंतरुपीं या । उपजो हा सद्भाव रे ! ॥ भगवंता० ॥ १ ॥ दृश्यभास हा मिथ्या यांतिल । कशास धरणें हांव रे ! ॥ जन वन कोठें कांहिंच नाहीं । दिसे हे तितुकी माव रे ! ॥ भगवंता० ॥ २ ॥ संन्यास म्हणणें हा यांताचि होतो । चित्त हें शून्यीं स्थिरावे रे ! । बाह्यात्कारें कशासि घालणें । शुभ्र वसनाला काव रे ! ॥ भगवंता० ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा आत्मस्मरण हें । मोठा कीं मोक्ष उपाव रे ! ॥ सदैव कीर्तन करणें हें । भवसिंधु तराया नाव रे ! ॥ भगवंता० ॥ ४ ॥

पद १६ वें.

भगवंता ! तुझेंचि निरंतर स्मरण ध्यान लागो ॥ ध्रु० ॥ अनन्यभावें तुजला ध्यावें । रूपिं रिझावें । तद्रुप व्हावें । सदैव कीर्तन नर्तन करुनी । परमानंदीं निमग्न होणें । हेंचि तुजप्रती मागों ॥ भगवंता० ॥ १ ॥ पोटासाठीं करितां सेवा । समूळ याचा वीटचि यावा । देहबुद्धिचा उबग द्यावा । भाषण दूषण नलगे हेवा । विषयसुख विषाचा मेवा । त्रिविधतापें अनुतापुनी । मन केवळचि वितरागो ॥ भगवंता० ॥ २ ॥ म्हणे सोहिरा पंच-भुतांची फिरते काया । यांत चालक त्रिगूण माया । छाया तव

हा प्रपंच वायां । अजरामर तूंचि एक राया । तरणोपाया । प्रत्यक्ष ऐसा अनुभव जागो ॥ भगवंता० ॥ ३ ॥

पद १७ वें.

भगवंता ! दर्शन देई रे ! ॥ ध्रु० ॥ मी कोण मज येऊं दे कळोनी । तेथ मन हें वळोनी । जाउं दे अभिमान गळोनी । निशिदिनीं निर्गुणवनीं लय हें लावीं रे ! ॥ भगवंता० ॥ १ ॥ काना ऐकवी । नयना दाखवी । त्वचेला कळवी । रसने चाखवी । परिमळ लेववी । शेवटीं कोण हा कोठें तूं नाहीं रे ! ॥ भगवंता० ॥ २ ॥ म्हणे सोहिरा संसार । दिसोनि विषयसुख असार । मृगजळवत निःसार । किमपि मजला रुचों देउं नको कांहीं रे ! ॥ भगवंता० ॥ ३ ॥

पद १८ वें.

भजन तुझें आवडो । मजला विषयसुख नावडो ॥ ध्रु० ॥ अविनाश आत्मारामा । भक्तकाजकल्पद्रुमा ॥ १ ॥ गैब चराचरा । अगम अगोचरा ॥ २ ॥ सज्जनरंजना । अलख निरंजना ॥ ३ ॥ असोनि लक्षा । प्रत्यक्ष अलक्ष्या ॥ ४ ॥ मौन महाशून्या । अखंड चैतन्या ॥ ५ ॥ पाहतां अरूपा । आनंदसत्तारूपा ॥ ६ ॥ टाकुनियां सगुणा । गुणातीत निर्गुणा ॥ ७ ॥ वृत्ति लागो एका । नगरनायका ॥ ८ ॥ सकळमूळबिंबा । विकास निरालंबा ॥ ९ ॥ जगदभ्रअंबरा । दिव्य दिगंबरा ॥ १० ॥ कानावीण ऐकत्या । डोळ्यांवीण देखत्या ॥ ११ ॥ अज्ञान नेणत्या । अंतर जाणत्या ॥ १२ ॥ मागत्याचें मागणें । तुझें हेंचि देणें ॥ १३ ॥ सोहिरा म्हणे 'मी' मोड । दे अवीट आणि गोड ॥ १४ ॥

पद १९ वें.

भेट देई रे ! जगज्जीवना । आजि सज्जनरंजना ॥ विराज राजयोगी । जोगी अलख निरंजना ॥ ध्रु० ॥ सहजनिजनिर्भरू ।

देवा ! भक्तां कल्पतरू ॥ १ ॥ निजधामअंबरा । देवा ! दत्त दिगंबरा ॥ २ ॥ कनकनानानगनगरा । देवा ! जगतरंगसागरा ॥ ३ ॥ कायादर्पणप्रतिबिंबा । देवा ! अतीत निरालंबा ॥ ४ ॥ आनंद-वधुवल्लभा । देवा ! आरंभरंभस्तंभा ॥ ५ ॥ अद्वयकुमुदिनीचंद्रा । देवा ! क्षमाशांतिसमुद्रा ॥ ६ ॥ विषद्‌बोधविदाता । देवा ! सकळ-भूतहृद्गता ॥ ७ ॥ विवेकवैराग्यसागरा । देवा ! सुहृद्वनवसुंधरा ॥ ८ ॥ चिन्मात्रउदासीना । देवा ! तन्मात्रविनाशना ॥ ९ ॥ सारथी मनोरथीं माझ्या । हो तूं देवा ! आत्मारामराजा ॥ १० ॥ गैब चराचरा । देवा ! अगम अगोचरा ॥ ११ ॥ काया ना माया । तुझी देवा ! निर्गुण निरामया ॥ १२ ॥ सोहिरा म्हणे प्रतीति जैसा । देवा ! अवकाश आकाशा तैसा ॥ १३ ॥

पद २० वें.

मजवरि तूं कृपा करीं । हरि देवराया रे ! ॥ ध्रु० ॥ प्रपंच जडला कधींच न सुटे । यावरि सहसा मन हें न विटे । मिथ्या पडली भ्रांति न तुटे । दुर्घट हा भवसिंधु तराया रे ! ॥ मजवरी० ॥ १ ॥ जीव हा गुंतला पोट भराया । चित्त हें नलगे भक्ति कराया ॥ स्वल्प दिन उरले मराया । आयुष्य गेलें आलें सराया रे ! ॥ मजवरी० ॥ २ ॥ जैसा माशीस प्रियकर गूळ । तैसें लागे स्त्रियेचें खूळ ॥ अंगीं मदनाचा हुळहुळ । हेंचि कारण तुज विस-राया रे ! ॥ मजवरी० ॥ ३ ॥ योगाभ्यासें त्रिकूटगडा या । पुरता मजला शिकवीं चढाया । विक्षेप न करीं फिरुनि पडाया । उपाधीं-तूनि उतराया रे ! ॥ मजवरी० ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा मागें वरा या । हाचि निश्चय हृदयीं धराया । परम प्रसाद देईं नरा या । सदैव तुजला स्मराया रे ! ॥ मजवरी० ॥ ५ ॥

पद २१ वें.

मजवरि तूं दया करीं रे ! ॥ ध्रु० ॥ रूपरेखविना तूं एक पालक चालक सकळ चराचरीं रे ! ॥ मजवरि० ॥ १ ॥ अखंड अनंत अपार अरूपा तूं दे अलभ्य हा लाभ आम्हांला अभ्यंतरीं रे ! ॥ मजवरि० ॥ २ ॥ चित्सुखसिंधु आनंदकंदु परमामृतबिंदु मनइंदु नेई अजरामरपद परात्परीं रे ! ॥ मजवरि० ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे स्वरूप दावीं लय हें लावीं निर्गुण निरंजन निरामय विदंबरीं रे ! ॥ मजवरि० ॥ ४ ॥

पद २२ वें.

ये देवा ! भवसिंधु तारणारा ॥ ध्रु० ॥ आवृत्त ही निवृत्त मोहावर्त तूं कीं या मनीं । कैवर्तकः केशवा तूं जन्ममरण वारणारा ॥ ये देवा० ॥ १ ॥ देह ना विदेह हें संदेह गेह नाशुनि । ग्रासुनि हे सहाही अनुजदनुज मारणारा ॥ ये देवा० ॥ २ ॥ गोपिका त्या ओपिती, जीवत्व कीं निरोपिती, वृत्तांत तुज श्रीपती, तूं नंदसुत तुजप्रति, वंदुनिया आनंदति, त्या गोपपति गोकुळीं तूं अवतरणारा ॥ ये देवा० ॥ ३ ॥ कलत्र-पुत्रवित्त हें चरित्र कीं समानसूत्र, कीं खेळ हा विचित्र बहु, दाविसि कीं विश्वचित्र हें चितारणारा ॥ ये देवा० ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे बसला, ना उभा तूं हें प्रभा, तुझी नभावरि स्वभाव ना दुभाव हे निभावुनि अभाव, लावीं शुद्धभाव, स्मरणिं दुरित हर-णारा ॥ ये देवा० ॥ ५ ॥

पद २३ वें.

ये हरि ! ये हरि ! अंतरनिष्ठ जरि मी तरि ॥ ध्रु० ॥ हिरोनि संपत्ति कौरव नृपक्षि योजित विपत्ति देखुनि भूपति चिंत्ति

विलपति नयन लिंपिती पांडवपति हे तुल्लंघति शपथेप्रति मनींचि तपती कर्ण शकुनि दुःशासन कुमति कृत्रिमें जपति जाण तूं श्रीपति पाव मला लौकरी ॥ ये हरि० ॥ १ ॥ मोरमुकुट-पीतांबरधारी गोकुळवृंदावनविहारी गोपपति गोवर्धनधारी मुरलि मनोहर धेनू चारी विस्मित नारी कंसकाळ तो तूं पुतनारी महा-विष्णू तूं पूर्णब्रह्म अवतारी ॥ ये हरि० ॥ २ ॥ म्हणे सोहिरा चिदानंदघन चिद्भुवना तूं चित्तचालका सकळ पालका या आकांता कमळाकांता पाव अनंता भगवंता तूं अनाथनाथा गुणरूप लावण्य पद्मिणी पतिव्रता ते द्रौपदी संकटीं स्मरी ॥ ये हरि० ॥ ३ ॥

पद २४ वें.

लागो रे ! आवडी तुझीच अखंड आत्मारामा ॥ ध्रु० ॥ आजी मजमाजी भक्तकाजकल्पद्रुमा ॥ लागो रे० ॥ १ ॥ जीवींचें हें गुज सोहंबीज निजधामा ॥ लागो रे० ॥ २ ॥ कल्पना हे टळो मीपण गळो मिळो निरंतर आत्मारामा ॥ लागो रे० ॥ ३ ॥ निराकार निराधार निःसंग निष्कामा ॥ लागो रे० ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे आकार सांडुनियां तदाकार सदा सुख आम्हां ॥ लागो रे० ॥ ५ ॥

पद २५ वें.

लागो रे ! ध्यान तुझें परब्रह्मा ॥ ध्रु० ॥ व्यक्ति ना वर्ण आनंद-पूर्ण । तेथ हें अंतःकरण ॥ लागो रे० ॥ १ ॥ आत्म आवडिये निर्गुण चाडिये । अवीट गोडिये मन ॥ लागो रे० ॥२॥ घेऊं जातां शुद्धि विराली हे बुद्धि । निरंतर समाधी ॥ लागो रे० ॥३॥ सर्व सदोदित दिवस ना रात ॥ अचिंत्यचिंतनीं चित्त ॥ लागो रे० ॥ ४ ॥

नाम न पवन गगन लगन सर्वां निराळा । ब्रह्मांड गोळा तेथचि कीं हा डोळा ॥ लागो रे० ॥ ५ ॥ सृष्टीचें बीज सत्ता सहज हें उन्मनि निज । सोहिरा म्हणे निजधामा अनामा अखंड आत्मा-रामा ॥ लागो रे० ॥ ६ ॥

पद २६ वें.

वासना हे विषयांची बुडविल आम्हां । यास्तव तुझें स्मरण करावें सदैव परब्रह्मा ॥ ध्रु० ॥ पदार्थ अवघे अनुकूल झाल्या, गर्वा चढविल आम्हां । काळें करोनि प्रतिकूळ झाल्या फुकट रड-विल आम्हां ॥ वासना० ॥ १ ॥ कोठील कोण मी पाहूं जातां, मध्येंचि अडविल आम्हां । जन्ममरण या दुर्घट गर्भवाशीं, अखंड पाडिल आम्हां ॥ वासना० ॥ २ ॥ मृगजलवत संसार यांतील, सुखदुःख घडविल आम्हां । घडि घडि तजविज करितां चिंतेखालिंच सडविल आम्हां ॥ वासना० ॥ ३ ॥ दृष्टी पडल्या दृश्यभास हा, मोहचि जडविल आम्हां । देहीं असोनि सर्व प्रकाशक आत्मा दडविल आम्हां ॥ वासना० ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा त्रिविधतापीं अखंड कढविल आम्हां । मोक्षपदाचा मार्ग निरोधुनि, आंतचि तुडविल आम्हां ॥ वासना० ॥ ५ ॥

पद २७ वें.

सार्थक माझें हें करिं तूं ॥ ध्रु० ॥ अच्युत केशव परमा-नंदा । गोविंदा ये मुकुंदा । काया सुमनांतिल मकरंदा । जगद्व्या-पका श्रीहरि तूं ॥ सार्थक० ॥ १ ॥ ज्ञानसुख या अमला पाजुनी । मजला पूर्ण समाधी लावुनि । अद्वयकमला विकास करुनी । मोहांतुनि उद्धरिं तूं ॥ सार्थक० ॥ २ ॥ लय हें लागो हेंचि

मागों । चित्तचि हें वीतरागो । नित्य निरंजन जागो । मनिंचा जाउं नये क्षणभरि तूं ॥ सार्थक० ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा पापपुण्य हीं दोन्हीं । घडती कर्मबीजापासोनी । तें बीजचि कीं नासोनी । मजवरी कृपा करिं लवकरिं तूं ॥ सार्थक० ॥ ४ ॥

पद २८ वें.

हरिं हो ! अभिमान दयाब्धिघना ! ॥ ध्रु० ॥ देईं अखंड स्मरण तुजविण आन नसे कांहीं । जैसें गंगाजळ समता आणि मना ॥ हरिं० ॥ १ ॥ नित्य अनुरक्त करीं मन उन्मन । निरसीं विकारिक छंद नाना ॥ हरिं० ॥ २ ॥ तनुमनरंजन दे सुखसज्जन । संगत सोहिरा समसदना ॥ हरिं० ॥ ३ ॥

# (३) उपदेशपर पदें.

पद १ लें.

अखंड भगवद्भजन करी, तोचि येथें धन्य ॥ ध्रु० ॥ गगन व्यापक जैसें । जयाचें मनचि झालें तैसें । जयानें पाहिलें एकचि ऐसें । सर्व घटीं चैतन्य ॥ १ ॥ जयाला वेद म्हणती 'नेती'। तें काय मिळेल वाचल्या पोथी । येथ न चाले आपुली मति । ऐसें समजुनियां चित्तीं । उगेंचि घेतलें मौन्य ॥ २ ॥ स्वप्नीं जें जें दिसे । तें तें जागृतिला नासे । तैसें जगद्रूप आभासे । बाणलें प्रतीतीस ऐसें । नित्य निरंजन शून्य ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा ब्रह्मरसायन प्याला । त्याला जन हें निंदो वन्दो देहाला । आपण सोडुनियां मोहाला । झाला भगवंतासी मान्य ॥ ४ ॥

पद २ रें.

अजुनि तरि उमगा । नव्हे हें सौख्य पहा शिमगा ॥ ध्रु० ॥ ज्या सौख्यातें आदि अंतीं । स्थितींतही होती क्लेश जगा । उडियेवरि उडी मारित मृगजल । प्याया कष्ट मृगा ॥ १ ॥ दुःखी भोगी दुःखी त्यागी । दुःखी सोंगी ढोंगी रे ! । दुःखी यांचित दुःखी लुंचित । दुःखिया चित्त सरळ बघा ॥ २ ॥ खोटें मन हें खोटि कल्पना । खोटे विषय कुरंगा । अनुभव मोठा समूळचि खोटा । रंक स्वप्निच्या या भागा ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा जें कल्पावें । तेंचि पावे सुख रंगा । निर्विकल्प जें सत्य सौख्य तूं । दुःख इतर ते करिं भंगा ॥ ४ ॥

### पद ३ रें.

अजुनी समजुनि काय बसलासी ? ॥ ध्रु० ॥ संतसमागम किमपी न रुचे । इंद्रियवर्ग हे मिळवुनी लुचे । परिणामाचें हित हें न सुचे । नरदेहीं येउनि तूं फसलासी ॥ १ ॥ वंध्येचें संतान प्रपंच । एकाचि जागा मिळती पांच । मिथ्या लागलि तुज हे आंच । मोहचिकाला तूं डसलासि ॥ २ ॥ भ्रमलासी हाचि ध्यास वाहातां । पाहिला ना कधिं स्वस्थ राहातां । लाज न वाटे हें दुःख सहातां । कुसंगींच तूं वसलासी ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मूळ नसलासी । चुकलासी परब्रह्म अस्सलासी । अन्यथाज्ञानें कसलासी । केवळ मूर्ख तूं मज दिसलासी ॥ ४ ॥

### पद ४ थें.

अरे ! कां रे ? विसरलासी आपणिया तूं ॥ ध्रु० ॥ नाशिवंत जाणुनियां । मग निजसुख नेणुनियां । धरिसी भवबंधहेतु ॥ १ ॥ एक अनेक विरूढलासी । या चराचरीं तूंचि असशी । विश्वपटीं चित्तंतु ॥ २ ॥ फिराफिरत असशी । कष्टें बहुत श्रमलासी । मिथ्या जन्ममरणा तूं ॥ ३ ॥ निज मुळींचा । जाणुनियां तूं आपणापें साचा । सोहिरा निजपदीं रम तूं ॥ ४ ॥

### पद ५ वें.

अरे ! तूं धरूं नको, धरूं नको, लटिका हा अभिमान । शाश्वत नाहीं रे ! संसारीं, देहा कोण जुमान । जेथुनि आलासी जन्माला, तेथ धरीं इमान । सहसा होउं नको होउं नको भगवंतीं बेइमान ॥ ध्रु० ॥ हें तूं जाण रे ! सुजाणा, दों दिवसांचें बखत । आयुष्य कितुकें हें कळेना, कसा येतसे वखत । कांहीं

गुरुमुखें समजुनि घे, पाव निरंजन तखत् । याला दिरंग तूं करूं नको शेवट पडसिल फकत ॥ १ ॥ पुरता पहावा तनुचा चालक हा कोठें । अनुभवीं पाहतां पाहतां, मन होय थोटें । सहसा नयेचि रे ! दाखवितां हा म्हणुनि बोटें । रूप-रेखविण देख अगोचर, हेंचि गूढ मोठें ॥ २ ॥ सावध करितां रे ! घरबार । भजनांचा करभार । देउनि सोडूं नको दरबार । मुळिंचा वारंवार ॥ ३ ॥ स्वरूपसागरिंचे तरंग । विचित्र नानारंग । आवरिं पवनाचा तुरंग । अंबरीं चाल तूं अंत-रंग ॥ ४ ॥ गुप्त हे सत्ता कैसी तरज । करुनि कामक्रोध हे वर्ज । करणें देवापाशीं अर्ज । ठेउं नको जनांशीं गरज ॥ ५ ॥ नको साधुंचि हे हरकत । ययानें नाहिंच रे बरखत । निंद्य वाद्याचें बहुखत । पुनर्बधिर मुका जन्मत ॥ ६ ॥ आतां जीवत्व हें उद्धारीं । चित्त देईं जगदुद्धारीं । गुंतुं देउं नको आकारीं । सतत रम तूं निराकारीं ॥ ७ ॥ सांडीं विष-यांचा विलाप । अवघा कर्मक्रिया कलाप । भगवद्गुणानुवाद आलाप । महदानंदीं होइं मिलाफ ॥ ८ ॥ भव हा दोराचा रे ! साप । कवणा असे पुण्यपाप । भ्रांति व्हावी हे निःपाप । अरुपीं मिळोनि आपेंआप ॥ ९ ॥ भेदुनि त्रिवेणिचा संगम । अद्भुत मन हा सारंगम । सहस्रदळीं पावावा सुगम । खरा मार्ग हा विहंगम ॥ १० ॥ जेथ वेदांध न चलती तर्क । तेथ मावळले चंद्रार्क । महा अद्वैत पिउनियां अर्क । सोहिरा म्हणे हो गर्क ॥ ११ ॥

पद ६ वें.

अरे ! हा लाभ घ्या रे ! । परमामृत हें प्या रे ! ॥ ध्रु० ॥ ऐशी हे नरयोनी दुर्लभ । साधूं न मिळे असा कीं सुलभ । सदैव

नसतो काळ वल्लभ । मीनला एक समया रे ! ॥ १ ॥ लागला भवभ्रम हा मागें । भगवंतीं चित्त कैंवि लागे । उघडुनि ऐसें कोण सांगे । अवघेंचि टाकुनि या रे ! ॥ २ ॥ ब्रह्मप्राप्तीची प्रीति असावी । संशय भ्रांति कांहिं नसावी । वैराग्याची कळा असावी । विवेक हृदयीं हा न्या रे ! ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा नाश जाणुनी । चराचराला ध्यानीं आणुनि । अर्थ ज्ञान हें अंतरिं बाणूनी । लागा परमार्थाचे तया रे ॥ ४ ॥

पद ७ वें.

अशाचि खालीं गेला प्राण्या जन्म तुझा व्यर्थ । कवण मी हा कोठिल तुजला नकळे परमार्थ ॥ ध्रु० ॥ अरूप आत्मा ब्रह्म-स्वरूपीं नलगे लक्षांश । अनेक शास्त्राभ्यासें तुजला प्रियकर वाच्यांश ॥ जितुकी विद्या तितुका वृत्तिचा आढळतसे अंश । परतुनि दृष्टि न पाहे नाथ संकेती चिदंश ॥ १ ॥ ऋद्धिसिद्धि गारूड पाहतां लाभ काय तुजला । प्रमाण मानुनि देह केवळ भुलसी धातूला ॥ अंतरीं ज्ञानप्रवेश न होय नाशचि हा तुला । अमुक ऐसा नकळे तुजला चालक आंतुला ॥ २ ॥ गगनवनाचे ठायीं न होय मन हें विश्राम । संकट वाटे मोठें सोडितां इंद्रीयग्राम ॥ तीर्थव्रतें दानधर्म हीं तितुकीं सकाम । निरालंब हें निर्गुण येणें न मिळे निजधाम ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा कणासि टाकुनि उपणीसी कोंडा । आत्मज्ञानीं अनावडि जसी अवरुची तोंडा ॥ मायानदिचा हा तुजवरि आलासे लोंढा । वाहत वाहत जासिल तेथें प्राप्त नव्हे धोंडा ॥ ४ ॥

पद ८ वें.

आतां तरि सोडिं रे ! हा संग । जनिं वनिं हो निःसंग ॥ ध्रु० ॥ विषयसंयोगें धरिसी सोंग । दुःखेंचि होसी दंग । अभ्र

सावुलीं जेविं बाहुली। बेगडिचा हा रंग ॥ १ ॥ परनारीशीं करुनि उपरती। आवरिं हा कीं अनंग। ब्रह्मरसाचे भावनेविण। रजतमें होय जीव वंग ॥ २ ॥ योगाभ्यासें करुनी साधीं। बैठक पवन तुरंग। धांवे जेथ कीं तेथ धरावा। हा मन चपल कुरंग ॥ ३ ॥ नसोनि दिसतें केवळ जग हें। मृगजळिंचे किं तरंग। चिद्भानु हा कारण आत्मा। पहा तूं कीं अंतरंग ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा निर्गुण ध्यानीं नये तरि,। स्मरिं सांवळि मूर्ति सुरंग। वैकुंठपति हा व्यापक विष्णु। अवघाचि कीं श्रीरंग ॥ ५ ॥

पद ९ वें.

आण ध्यानीं त्या मनमोहन गहनाला ॥ ध्रु० ॥ निशिदिनीं गा, राहोनि उगा। निजरूपीं उमगा आनंदघनाला ॥ १ ॥ सेवीं सज्जनाला, ज्ञानयजनज्ञाला। सोडूनि जनाला, वेगीं लाग भजनाला ॥ २ ॥ इंद्रियें निरोधीं, कवण मी शोधीं। त्रिकुटीं बंद करीं, पवनाला ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे जा, निजधामीं निजाला। मिळोनीच जा गगनाला ॥ ४ ॥

पद १० वें.

आनंदकंदा। स्मर त्या निज गोविंदा रे ! ॥ ध्रु० ॥ ज्याचें स्वरूप अमूप झालें वेदा रे !। तेथ कासया धरणें भेदवादा रे ! । त्वरित टाकीं हा सकामबुद्धि धंदा रे !। एकीं एक जाणपां निज-नंदा रे ! आनंदा रे ! ॥ १ ॥ जीवपण हें टाकुनियां निजपदा रे ! । निर्गुणा तूं सगुणा ब्रह्मविदा रे ! । विरूढलासी पावोनि नादबिंदा रे !। योगियांसी आकळसी मूळबंदा रे ! ॥ २ ॥ कृपाघना जगज्जीवना मेघःशामा रे ! । वचनमात्रें पावविलीं निजधामा रे !। चुकविलें या संसारमहाभ्रमा रे !। वदनीं नित्य

दिधलेंसी निजनामा रे ! ॥ ३ ॥ सनकादिकां पूज्य त्या नित्य वंदा रे ! । प्रकटण झालें अंतरींचिया मुकुंदा रे ! । कायाकमळीं घेतलें त्या मकरंदा रे ! । सोहिरा म्हणे चुकविली जन्मआपदा रे ! ॥ ४ ॥

पद ११ वें.

करिं बा ! कांहिं तरी सार्थक या जीवाचें ॥ ध्रु० ॥ ज्ञानांजनेंचि भ्रमभंजन करीं । निरंजनीं लय लावुनि अंतरीं । मानसपूजन सदाशिवाचें ॥ १ ॥ संतसमागम सदैव करिं कां । आगम निगम वर्णिति जें कां । त्रिवेणिसंगम स्वानुभवाचें ॥ २ ॥ कर्ण श्रवण बलविकर्ण गुण । हे वर्णव्यक्तितीत अर्थ मनन । करी येणेंचि निष्कृंतन हें भवाचें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे हें सुफळ वारी । हे जन्म निवारी, बद्ध न पावें इंद्रियव्यापारीं । अजप जपणें प्रणवाचें ॥ ४ ॥

पद १२ वें.

कवण कवणाचे नये हो संगातीं ॥ ध्रु० ॥ माता पिता बहिणी बंधु । दारा सुत वृथाचि वेधु । जाण हा स्वप्नींचा आनंदु । ममतापाशीं लाविती गोंदु । तुझा परिणाम नसे त्यांच्या हातीं ॥१॥ संसारीं तुझें मन हें विकळे । परि मी कोण हें तुजला न कळे । विषयविलासीं झांकूनि डोळे । चंद्रोदयींचे जसे कावळे । शेवटीं तुजला काय मिळेल पहा ! मातिसी मिळेल या माती ॥ २ ॥ म्हणे सोहिरा संतसमागम । सुगम करोनि निजउगम । चित्सागरीं मिळे त्रिवेणीसंगम । जयाला वर्णितां आगम निगम । कुंठित जये भुवनीं तो दीपक लावीं निवातीं ॥ ३ ॥

पद १३ वें.

काहीं मोक्षाची तरतुज करणारे हो काळ हरणारे! सार्थक करणारे मनबुद्धि आवरणारे हो ! ॥ १ ॥ कर्म हें कसुटें। सहसा न सुटे यावत फिरणारे । जावत देह तावत पोट भरणारे हो ! ॥ २ ॥ निजसुख उगम पावुनि सुगम आगमनिगम मौनावति रे ! । तें पद पावा तुम्ही भवनदी पार उतरणारे हो ! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे अहंकृती न म्हणा रे ! । नाथ दत्त संकेत सतत सुखीं जीवरूप उद्धारणारे ॥ ४ ॥

पद १४ वें.

कांहीं सार्थक करीं तूं प्राण्या लौकर रे ! ॥ ध्रु० ॥ देह हें स्थूळ भ्रमाचें मूळ । प्रपंच म्हणणें अवघें खूळ । शेवटिं तुजला हें प्रतिकूळ । अंतीं कांहीं नाहीं, हें तंव दिसे क्षणभर रे ! ॥ १ ॥ सोडुनि स्वार्थ धरीं परमार्थ । आत्महिताविण फिरणें व्यर्थ । गुरुमुखें समजुनि घ्यावा अर्थ । सांगितलें तुज तें तें कांहीं चित्तीं धर रे ! ॥ २ ॥ शरिरीं कवण हा साक्षी पाहा । त्याला पाहुनि तेथचि रहा । ध्यास निरंतर तोचि वाहा । विश्वातीत परमात्मा तो हा । तद्रूपची होउनियां जीव उद्धर रे ! ॥ ३ ॥ अनंतरूपीं हा अनंत वसतो । दृष्टीविण हा सदैव दिसतो । कांहिंच नाहीं त्या रूपीं असतो । सर्वगतचि कीं, व्यापक हा विश्वंभर रे ! ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा निश्चय व्हावा । तरीच तुजला पडेल ठावा । केवळ मिळसी जरि सद्भावा । स्तवि वेद वदनीं नित्य वदावा । महा दुस्तरची भवनदि कीं हे माया तर रे ! ॥ ५ ॥

पद १५ वें.

कां हो ! क्षणभरि हरि गाना ॥ ध्रु० ॥ अशाश्वतावरि विटोनि शाश्वत मोक्ष कां हो ! मागाना । श्रवण मनननिदिध्यासें

ईश्वरछंदीं या लागाना ॥ १ ॥ गुणानुवादीं सतसंवादीं तृप्त कराना कां काना । गोकुळिं गोविंद अवतरला गिरिवरधारी यदुपति हा कान्हा ॥ २ ॥ आदिपुरुष हा विसरोनि तुम्हीं दैवत स्मरूं नका आना । सुर नर उरग स्थिरचर ज्यानें निर्मियलें नाना ॥ ३ ॥ भक्तसंकटीं धांवत बैसुनि वैनतेयवाहना । तो हृदयस्थ हा अंतरीं पहावा चिंता हे वहाना ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा सारासार विचार करुनियां भवभ्रम कां त्यजाना । कोठिल कोण मी जन्मा आलों अंतीं काय या मुळावरि जाना ॥ ५ ॥

पद १६ वें.

केवळ विस्मृति हा प्राणी । ईश्वरीं लय लाविना ॥ ध्रु० ॥ वितंड पाखंड स्थापी । आचरणें महापापी । निंदाद्वेषें सदां दापी । भरेना कीं अनुतापीं । अद्यापीही विषयीं वीट येईना ॥ १ ॥ आत्मशुद्धि नाहीं ज्याला । उद्योगाखालींच गेला । संसार हा सत्यचि केला । निवांत होउनि न ठेला । अद्यापीहि समजुनि उमजुनि । दुष्टबुद्धि जाईना ॥ २ ॥ बहुत जन्म फिरला मागां । अद्यापी जो नव्हे जागा । ज्याला पुढें नरकीं जागा । त्याला तुम्ही कितीहि सांगा । नायकेच तो येतो रागा । वृत्ति कांहीं साहीना ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे संतांचे । भेटिला जो कधीं न वचे । श्रवण मनन कीर्तन न रुचे । मत्सर द्वेष बहुत सुचे । विश्वव्यापक हृदयस्थाचे । नित्य गुण गाईना ॥ ४ ॥

पद १७ वें.

केशव अच्युत परमानंदा स्मर त्या गोविंदा । सर्व त्यागुनि अंतरिं स्मर त्या तूं याचि लाग छंदा ॥ ध्रु० ॥ केशि मारिला प्रताप केला दैत्य सकळ जिंके । केवढी ज्याची माहिमा वर्णन वेद

करूं न शके । केले जेवढे खेळ तयानें क्षणभंगुर असके । केवळ ब्रह्म हें जाणुनि बैस विमानाचिये बसके ॥ १ ॥ शरणागतवत्सल हा स्वामी सर्वांचा ईश । षड्गुणैश्वर्य ज्यापाशीं तें पावसि तूं यश । षण्णष्ट हे काम क्रोध कीं पावतील नाश । शशी सूर्य ज्या तेजें झांकति अनादि अविनाश ॥ २ ॥ वर्जित दृश्य पदार्थहि ऐसा देतो अनुभव । वरचिल मत हें नचले जेथ आहे स्वयमेव । वश भक्तीला होय निपट हा वेडा कीं देव । वरद सोयिरा वदे किं ऐसा एकचि जीव शिव ॥ ३ ॥

पद १८ वें.

कृपा कशानें करील तो हरी ॥ ध्रु० ॥ कर्ता हर्ता ईश्वर भर्ता । क्रियमाणें हें आयुष्य सर्ता । पर्वा नाहीं इंद्रियचर्ता । विपरित अर्था भुलुनि जीव हा उगेंचि गर्व हें धरी ॥ १ ॥ परद्वार हें पातक आहे । वेदपुराणीं ऐकत जाये । नरक नयनिं हा प्रत्यक्ष पाहे । बिभत्स अवघें सुखेंचि साहे । अतिलुब्ध जो कामिनीवरी ॥ २ ॥ प्रतिपाळ करी कीं मदाचा । मार्ग न कळे ब्रह्मपदाचा । करी आट विवेकनदाचा । प्राणी जाणला हा न कदांचा । जो असत्यवादी सदांचा । ज्याची वाचाचि नाहीं हे खरी ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा हा वर्तो । नेणें आत्मस्वरुपीं परतों । कीं कोण संग मी धरितों । आणि काय मी हें करितों । नित्य कोणाला मी स्मरतों । हें नकळोनि तृष्णा उठवी नानापरी ॥ ४ ॥

पद १९ वें.

क्रम परमेश्वर-भजनीं काळ ॥ ध्रु० ॥ विषयविलासीं भुकाळ अससी । मूर्खपणेंचि हा काळ । हरिनामाचा सुकाळ न करिसी । दंडिल यम हा सकाळ ॥ १ ॥ इतर कल्पना गाळ । भावें संतचरण

चोगाळ । होउनिया प्रेमाळ । अंतरीं हेचि धारि तूं जपमाळ ॥ २ ॥ ज्ञानाग्नीची ज्वाळ । वरी हा घालिं मनोगत राळ । उडत अंबरीं मराळ । तेवीं लय लावीं अंतराळ ॥ ३ ॥ आत्माराम नृपाळ । तुजवरि होईल पूर्ण कृपाळ । मग पिटणें नलगे कपाळ । सद्गुरु उपदेशवचन पाळ ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा देख टिसाळ । तो महानदिसिंधु रसाळ । उगेंचि शिणवुनि काय शिसाळ । ते इतर देव नदिव्हाळ ॥ ५ ॥

पद २० वें.

गुरुजी जोगी ऑलख ऑलख ऑलख जागे रे ! ॥ ध्रु० ॥ विरक्तरंगें, ज्ञानगंगें स्नान तृप्त वैराग्यें, विभूति अंगें, निपट नागे रे ! नागे रे ! नागे रे ! ॥ १ ॥ संसार न ठावा, शून्य विसावा, रूप अभावाचे रिघावा, नाहीं अनावा, गोसांवी मौनि बावा रे ! बावा रे ! बावा रे ! ॥ २ ॥ आनंद छोटा, प्रेमाच्या जटा, त्रिवेणी वाटा, निघे गोल्हाटा, अवधूत मोठा रे ! मोठा रे ! मोठा रे ! ॥ ३ ॥ वीतरागी अनुरागी, भोगी ना त्यागी, अंतरिं निःसंगी, विराजे राजयोगी रे ! योगी रे ! योगी रे ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे या अंधाला, न पाहतां गेला, ऊर्ध्वपंथें आला, प्रेमपुरीं न्हाला, जीवनकळाबीज प्याला रे ! प्याला रे ! प्याला रे ! ॥ ५ ॥

पद २१ वें.

गोपिनाथ गोवर्धनधरणा करिं याचि स्मरणा । अनन्यगतिनें शरणागत हो चुकवि भवभ्रमणा ॥ ध्रु० ॥ गोधनें चारी वेषधारी छंद मना लागो गोकुळीं कान्हा नाना लीला करोनि निस्पृह गो । गोळा भक्षित नवनीताचा चोरि लग न लागो । गोडी लावित गोप स्त्रियांला विलसत रसरंगो ॥ १ ॥ पिष्ट पाडितो दानव मर्दुनि

पाळितो अनुतापी । पिडा निवारित संसाराची कामक्रोध शापी । पिशाच उन्मत्त बाळ वृत्तिनें पाहति कुप वापी । पिकलें सुख हें समाधिचें जो कधिंना उत्थापी ॥ २ ॥ नामरूपातीत चिंतुनि लावुनियां ध्याना । नारि नव्हे ही पुरुष नव्हे जो तर्काला येईना । नारायण अवतार वसंत हा यदुवंशराना । नाहीं आहे म्हणतां नये वेदस्तुति रिघेना ॥ ३ ॥ थरारित हें पातक ज्याचा स्मरतांचि पंथ । थकित चकित हे साधक सिद्ध कथितीही ग्रंथ । थराथरानें त्रिभुवन भरलें जिव हे अनाथ । थयथय सोडुन म्हणे सोहिरा पावत परमार्थ ॥ ४ ॥

पद २२ वें.

जग हें तरंगरंगसंग ॥ ध्रु० ॥ क्षणेक भास, विषयविलास । अवघा त्रास, अंतीं पावे नाश ॥ १ ॥ उना योगें उखरासंगें । देखोनी गंगे, ठकलीं जैसीं मृगें ॥ २ ॥ गळां शेळीचे स्तन, कीं हें आरशांतील धन । जैसा जळावरिल फेण, जैसें निद्रिस्थाचें स्वप्न ॥ ३ ॥ शरीर असे जंव, सकळ भासे तंव । विकारविंचूचें हें पेंव, लटिके चिंतेचा हा गांव ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे कीं नेमीं, जड हें शरीर नोहे मी । अजीं राहतो निजधामीं, यांचा समुद्र तो कीं मी ॥ ५ ॥

पद २३ वें.

जा मिळावया स्वामीला । निजधामीं निर्विकल्पाला ॥ ध्रु० ॥ स्वहितीं चुकसी, भजनीं लखसी, उगाच चकसी, विषयां ठकसी, मानिंचा आकसी, विवाद शिकसी, विद्या विकसी, निदानिं ठकसी, कशासि भकसी । वृथा वाग्जल्पाला ॥ १ ॥ मोड मी तूं हें, दवड वासना खोड हृदयींची तोड, वल्गना, कोंड इंद्रियें वोढ, पवना

शून्य मंडळीं फोड, त्रिकुट हें सोड, जाणिवीं गोड सुख हें जोड। लाभ हा न वचे कोटि कल्पाला ॥ २ ॥ घोंक, अंतरीं रोंक लाउनी, मोख मनाला मेख मारुनि, रूपरेखविण देख, ब्रह्म हें ठोक, ज्ञान हें रोख, नाणें आधिं जोख, गुरुकडे चोख, करुनि घे। स्थूलदृष्टिनें भुलूं नको या शरीरसुखअल्पाला ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा बूज, त्या सुखिं रीज, लावुनि तीज त्या रशीं, भिजवुनि मन थीज, पुरतें मुजरा करिं हुजरातिला, गुज जाण हें गुज, गुरुचें बीज, अनादि निज। तेथ उघड झांक नसे डोळ्यांच्या मलपांला ॥ ४ ॥

### पद २४ वें.

तरि होय काय येउनियां जन्मासी। विषयीं जडला गुळावरि जैसी माशी। परिणामाच्या नलगे हो कामासी। ओळखेना भूतहृद्गत या रामासी ॥ १ ॥ चंचळ चित्त हें परब्रह्मीं लाहेना। सहज समाधि स्थीर हे राहेना। व्यापक चैतन्य सर्वत्र आहे ना। मी हा कवण ऐसें जरि पाहेना ॥ २ ॥ चित्सूर्य हा उदेला उमगेना। अद्वयाब्जिनी जरि कां अनुरागेना। सद्गुरु कानीं बीज हें सांगेना। निर्गुण निरंजनीं। छेद हा लागेना ॥ ३ ॥ मनासहित इंद्रियें न निरोधी। निमग्न राहेना जंव या ब्रह्मबोधीं। भृंगवत् नलगे या आमोदीं। मोक्षाची वाट कवण ते न शोधी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे अविनाश सुख कैंचें त्याला। गंगा टाकुनि मृगजळीं जो न्हाला। अमृत म्हणुनि जो कां कांजी प्याला। आपुले छायेसी आपण भ्याला ॥ ५ ॥

### पद २५ वें.

तसा तूं भज रे! आपुल्या मुळाला ॥ ध्रु० ॥ न दावितां गोडी। गुंतुनियां चाडी। शोधूनि काढी जसि मुंगी गुळाला ॥ १ ॥

कोठें तें वन, कोठें जीवन। धांवत कोरी भ्रमर जैसा कमळाला ॥ २ ॥ चंदन अंग, उमजुनि चांग। जडला तो नाग जसा कीं परिमळाला ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा, देव भक्त एकचि होती। ज्योतीला ज्योति मिळोनि जाय। जसें लवण जळाला ॥ ४ ॥

पद २६ वें.

तुजविण वो ! कैंचा लाभ जनीं या लोकांला ॥ ध्रु० ॥ माझें माझें म्हणुनी लटक्या मृगजळाला भुलुनी। केवळ देखतांचि जाणोनी। उगे पडले शोकाला ॥ १ ॥ अविद्या लागली पाठीं। चालती ते आडवाटीं। केवळ विषयांसाठीं। मरती मारोनि एकमेकांला ॥ २ ॥ अर्थावीण तो जपतां। अंतरिंचा कीर रिता। शिकविली तो बोले गीता-वाक्य श्लोकांला ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे हेतुला। नासोनियां आंतुला। वोळखिला नाहीं कीं तुला। अनेकीं एकाला ॥ ४ ॥

पद २७ वें.

तुम्ही अचलपदीं राहोन सदोदित अद्वयसुख कां घ्या ना ? ॥ ध्रु० ॥ प्रथमहि वाटत गोड विषयसुख, अंतीं विषवत् भाना। श्रवण मनन अध्यात्मनिरूपण क्षणभरि चित्त कां द्या ना ? ॥ १ ॥ मायामोहें भ्रमतां रमतां, चेष्टा करितां नाना। ध्यानीं भजनीं मनची नसतां, व्यर्थचि करितां तनाना ॥ २ ॥ जागृति, स्वप्न, सुषुप्तित साक्षी कवण तो आणुनि ध्याना। कमलदलिं जसें अलिवत् मन हें, आत्मस्वरूपीं कां न्या ना ? ॥ ३ ॥ अभिप्राय गुरुगम्य हें दुर्लभ जाणुनि आत्मज्ञाना। म्हणे सोहिरा ब्रह्मभुवनिचें परमामृत कां प्या ना ? ॥ ४ ॥

पद २८ वें.

तुम्हीं वंदा । सकळहि साधुवृंदा, न करावी हे निंदा, सोडुनि सकळहि धंदा । संगति सद्गति पावे जीव हा अक्षय परमानंदा ॥१॥ ते संत, वृत्ति ज्यांची संत, विषयांची घस्त, ती जे कां न करिती पसंत । जेथें जाती तेथें चित्सुखज्ञानवनींचे वसंत ॥ २ ॥ ते गाती, स्वरूपाच्या सांगाती, देह हें जाणती माती, मिथ्या हे कुळयाति । अजरामर स्वरूपीं तद्रूप झाले हारपली दिनराती ॥ ३ ॥ तें मन, झालें कीं उन्मन, होउनी इंद्रियां दमन, नाहीं पुनरपी आगमन । खेचरी मुद्रा लाधुनि ज्यांहीं निर्गुणिं केलें गमन ॥ ४ ॥ त्या संतांला, शरण यावें त्यांला, नको मानूं भलत्याला, द्वेषी वितंड मत्यांला, अपरसुखीं भुरत्यांला । म्हणे सोहिरा भाषण करणें पाहुनियां पुरत्याला ॥ ५ ॥

पद २९ वें.

तूं कसा रे ! तरसिल प्राणिया । या हरिभजनावांचुनी ॥ध्रु०॥ तुझें चंचळ हें बहु चित्त । घडी नससी सावचित्त । असे चिंता हे डंवचित । नसे आत्मसुखाची प्रचीत । असे मृत्यु हा अवचित । जीवित काय करिसि सांचुनी ॥ १ ॥ केवळ बुद्धीचा तूं हीण । होसी शब्दज्ञानें प्रवीण । उपदेशउदकीं तूं पाषाण । सुख नेणसी विषयावीण । वैराग्य न धरिसी एक क्षण । काय करिसि ग्रंथ वाचुनी ॥ २ ॥ सदैव तुझिये वदनीं निंदा । आन नसेचि दुसरा धंदा । रे तूं ! अजाण दुर्मति मंदा । केवळ विषयमदमदांधा । रे तूं ! स्वभावें बेबंदा । साधुसंतांला जाचुनी ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे तूं मूढ रे ! । परमार्थ तुला हा गूढ रे ! । बाहेर लौकिक करिसि रूढ रे ! । ये पुढें यम घेईल सूड रे ! । तुझ्या जिण्या लागो चूड रे ! । अंतिं इंद्रियां लासुनी ॥ ४ ॥

पद ३० वें.

तूं कोठुनि कवण आलासी ? प्राणिया स्मरण नसे ॥ ध्रु० ॥ कर्म लागलें पाठीं । तेव्हां देहाशीं पडली गांठी । येथ गुंतसी भोगासाठीं । जड हें शरीर मानुनि मीच असें ॥ १ ॥ निर्मियला तुज ज्यानें । सर्व हें विश्व चाळितसे त्यानें । त्यातें तुज नाहीं पाहणें । जो कां समग्र आत्मा हृदयीं वसे ॥ २ ॥ नाशवंत हें पाहसी । याच्या विश्वासें तूं राहासी । अवघा ध्यास तोचि वाहासी । परि नेणसि हें मुद्दल कसें ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा कांहीं । तुजला संतसमागम नाहीं । यास्तव पाहीं केवळ मोहीं । भवविभ्रम हा नयनिं बसे ॥ ४ ॥

पद ३१ वें.

तूं राजी मन करी । प्राणिया ईश्वरभजनावरी । नियत धरीं अंतरीं स्मरीं ॥ ध्रु० ॥ सज्जनरंजनीं निधि निरंजन । ज्ञानांजन निजदिठीं भरीं ॥ १ ॥ म्हणे सोहिरा नरतनु दुर्लभ । आत्मलाभ हा संकटें नाना परिहरी ॥ २ ॥

पद ३२ वें.

तो काय प्राणी ? विसरला हरिला जन्मापासून ॥ ध्रु० ॥ करितां संसारधंदा, आठविना गोविंदा । नित्य करि द्वेषनिंदा, सांपडला भवबंधा । चिंतेनें चूर केला ग्रासून ॥ १ ॥ भुलला जो शब्दनादीं, संतोषला शास्त्रवादीं । कीर्तिसाठीं विद्या साधी, त्याला अभिमान बाधी नानाछंदीं । बुद्धि गेलि नासून ॥ २ ॥ देहाला मी ऐसें मानी, निरंतर आपणा वानी । पडला संशयाचे रानीं, विचार हा न घे कानीं । डुल्लतसे मोहमदिरा प्राशून ॥ ३ ॥ अवकाश जाहल्या वेळे । भलताचि खेळ खेळे । जो गर्वमदें सदा घोळे, अन्यथा सुखांत लोळे ।

सांगूं जातां बोले, डोळे त्रासून ॥ ४ ॥ लटकें खरें करी बासून, संसारीं जो घेतो घांसून । नक्कल करी मारी हांसून, त्रिविधतापें घेतो लासून । दुःखशोकें दांत वासून ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे व्यर्थ जन्म, निष्फळ त्याचें क्रियाकर्म । पांघुरला शरीरचर्म, जो कां नेणें मुक्तिचें वर्म । कोण्या कामाचा हा काय असून ? ॥ ६ ॥

पद ३३ वें.

तो धन्य प्राणी । हरिगुण अतिरस वर्णित वाणी ॥ ध्रु० ॥ नरदेहीं सावध जाहला । विवेक हा हृदयीं आला । नित्य निजबोधें धाला । ब्रह्मानंदें निमाला ॥ आत्महित पुरतें ध्यानीं आणी ॥ १ ॥ नामरूप मिथ्या भास । म्हणुनियां धरिना आस । वैराग्यें हा उपजे त्रास । करी निरंजनीं वास ॥ संकल्पविकल्प चित्तिं न आणी ॥२॥ अविनाशीं घेतो गोडी । नाशवंत संग सोडी । कल्पना हे समूळ मोडी । मनाच्या अनेक ओढी ॥ पुनरपि न पडे ताणाताणी ॥ ३ ॥ भ्रमभेद ज्याचा गेला । निश्चय हा ज्याणें केला । तन्मय होउनि ठेला । जितांचि असतां कीं मेला ॥ अंतीं गति पावला निर्वाणीं ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे सारांश । शोधियला शुद्धांश । ज्याणें उद्धरिला वंश । जैसा कीं तो राजहंस ॥ निवडितो दूध आणि पाणी ॥ ५ ॥

पद ३४ वें.

तंव तुला देव भेटेना ॥ ध्रु० ॥ पांचाचे पंचवीस गुण । सत्त्व रज तम त्याचें कारण । चळती प्रारब्धा प्रमाण । आत्माराम तो अलिप्त जाण । ऐसें समजुनी जोंवरि तुजला । देहाभिमान सुटेना ॥ १ ॥ पहिला दुर्घट गर्भवास । उपरि संसाराचा पाश । पडतां पडला नाना त्रास । राहणें मज कितुके दिवस । अधीक मी

कां चढवूं आस । परतुनि कां येऊं जन्मास । ऐसें उदास होउनि मन हें जोंवरि विषयविलासीं विटेना ॥ २ ॥ म्हणे सोहिरा काय तें साधूं । कवण रितीचा करणें शोधु । निरोधनीं तो कवण निरोधु । सकळांमाजी कवण तो साधु । बोधामध्यें कवण तो बोधु । आनंदीं कवण तो परमानंदु । ऐसें उमजुनि चित्तीं जोंवरि विवेक हा उमटेना ॥ ३ ॥

पद ३५ वें.

त्या देवाचें तूं दर्शन घे ॥ संसार मोहांतुनि त्वरित निघे ॥ ध्रु० ॥ आदि मध्य ना अंत जयाला । 'नेति नेति' म्हणती वेद तयाला । ज्यापासुनि हा ॐकारहि जाहला । ब्रह्मा विष्णु हर हे तिघे ॥ १ ॥ अगम्य अगोचर सत्ता ज्याची । सहज लीला हे त्याची । जारज स्वेदज अंडज उद्भिज्ज । ज्यापासुनि हे सहज निघे ॥ २ ॥ दृश्य सकळही टाकुनि जातां । निरालंबिं राहातां । प्राणापान ऊर्ध्वहि वाहतां । आनंदभुवनीं मन हें रिघे ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा शून्याकार । रूप नाहीं आकार । परब्रह्मचि निर्विकार । आंत बाहेर अवघें ॥ ४ ॥

पद ३६ वें.

देउनि तनु मन, घे निजधन तें ॥ ध्रु० ॥ जन हें सांडुनि, विकल्प मोडुनि । देख एकांत विजन तें ॥ १ ॥ चित्तवृत्ति तेथचि रमती । सर्वेचि होय अमन तें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग प्रेम-सुखामृत । सेवुनि पावे शमन तें ॥ ३ ॥

पद ३७ वें.

धरीं हरिस्मरणाची आवडी । अपूर्व आहे गोडी ॥ ध्रु० ॥ देई संसारासी सोडी । सवें निजसुख जोडे जोडी ॥ १ ॥ नलगे

विषयसुखाची चाडी । तोडीं लिंगदेह बेडी ॥ २ ॥ काडीं कल्पनेची आडी । पुरते निवृत्तिची कोडी ॥ ३ ॥ निरसीं देहभास काडी । सोहिरा ऊर्ध्वमूळातें धुंडी ॥ ४ ॥

पद ३८ वें.

नाहीं म्हणाया काय हरिविण । कासया करिसी फार भ्रमण ॥ ध्रु० ॥ आपुलिया काजया खेळ करितया । भूषण नाणि तें काय दूषण ? ॥ १ ॥ प्रयोजी कृतांती, आहार निराहारी । लक्षणीं असोनि जो विलक्षण ॥ २ ॥ मेदिनीं देखणें, आकाशीं लेखणें । सर्वेंचि ठावुकी होय निजखुण ॥ ३ ॥ व्यक्तिसि हारोनि, अव्यक्त घेउनी । मानिजे मग तें प्रमाण ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे जें हें कल्पूं जातां । निर्हेतुवीण न लाभे तें निर्गुण ॥ ५ ॥

पद ३९ वें.

पहा हो ! नर भला नर भला । हरिभजनीं तोषला ॥ ध्रु० ॥ करितो परनरपूजनातें । देखे सज्जन सद्रुप निरुतें ॥ १ ॥ मानी मायरूपि परजाया । करितो कल्पतरू जीववाया ॥ २ ॥ शब्द बोले सद्भावाचा । हरघडी घोष करी नामाचा ॥ ३ ॥ परधन देखुनि झांकी नयन । करितो आत्महित अवलोकन ॥ ४ ॥ सोहिरा सद्गुरुचरणीं शरण । करितो ऐशा नररूपीं वंदन ॥ ५ ॥

पद ४० वें.

पाव ज्ञान दाव ध्यान लावि या मना ॥ ध्रु० ॥ याच देहीं याच डोळां मुक्तिचा सोहळा । भोग राजयोग वश करोनि सांडी कामना ॥ १ ॥ दिसतें तें हें नासतें कीं हें । अविनाश असतें कीं हें । वसतें तुझे हृदयीं असोनी । तुजला काम ना ॥ २ ॥ सद्गुरुसी

शरण जावें हम्मेशा भजावें । निज गुज हें बुझावें जावें होउनि गगन गा मना! । सोहिरा म्हणे आहे नाहीं पाहीं तूं सबाह्य ब्रह्म । आद्यंत अनंतरूप निजधाम ना? ॥ ३ ॥

पद ४१ वें.

पावेनासी घुर्का कसा रे! तूं मूर्खा । जीवाचा हा धणी आण वेगीं तर्का ॥ ध्रु० ॥ नानापरी संसारींचा बसतो तुला चर्का । लाज सोडुनि काज करिसी फुकट पडसी नर्का ॥ १ ॥ रसनेवीण कसा घ्यावा ब्रह्मरसभुर्का । कसा द्यावा मनावरी गगनाचा हा बुर्खा ॥ २ ॥ पाखांड लंड बंड द्वेषी स्पर्श होतां सर्का । ब्रह्मबीज हाचि द्वीज सहज देखुनियां गुर्का ॥ ३ ॥ आला वेळ तूर्त घ्यावा साधुनियां हुर्का । बिनलज्जा बोध गांजा गैब मार झुर्का ॥ ४ ॥ वातपित्त देहांतीं कफाचा हा बर्का । सोहिरा म्हणे जे रीतिनें मोक्षकाज उर्का ॥ ५ ॥

पद ४२ वें.

पाहा हो ! नर पापी नर पापी । हरिभजनातें लोपी ॥ ध्रु० ॥ परनर मत्सर करितो । दशमुख नरसभे हा पण देतो ॥ १ ॥ मुखें दोष पराचे बोले । रामनामीं अरिपण केलें ॥ २ ॥ निपुण परनारीसंगातें । केलें कल्पतरू भंगातें ॥ ३ ॥ परधन देखुनि उघडी लोचन । नेणें आत्महित देह मोचन ॥ ४ ॥ सोहिरा सद्गुरुचरणीं शरण । देई ज्ञान हरि हे गुण ॥ ५ ॥

पद ४३ वें.

प्राणी हो सदां सुखी रहा ॥ ध्रु० ॥ स्थूलदेह हें कोठुनि चाले, कवण यांतुनि बोले ।,विषयसुखांत कोण डोले, द्रष्टा कोण

कसा मी पहा ॥ १ ॥ पंचभूतसंयोगें सकळिक, सुखदुःख हें सहा। जीव होत्साता शिवरूप मी, कधीं सोडूं नको धीर हा ॥ २ ॥ म्हणे सोहिरा बुद्धियोगें हीं इंद्रियें आकळी दाहा। सहजसमाधींत निमग्न होउनि, म्हणोनि घ्या तुम्हि अहा ॥ ३ ॥

पद ४४ वें.

प्राण्या उमजेना हें तूज। याचि तूं न करिसि कां तरतूज ॥ ध्रु० ॥ सुकृत हें निष्काम नसे। वरि ज्ञान उगें लाभेल कसें। हा निश्चय स्वरूपिं केविं बसे। ही उपरमेना दिठी, न कळे कीं हें गूज ॥ १ ॥ शुद्धसत्त्व हे सेना जुडती। सहज हे आकाशीं उडती। भवांश रज-तम यांवरि पडती। अतिशय लागते झूज ॥ २ ॥ निरहंकृतिनें अद्वयभावें। जेथुनि आलें तेथ समावे। ब्रह्मीं नलगे हें अर्पावें। वरचेवरि हें कर्मा पडतें पूज्य ॥ ३ ॥ ज्ञानावीण जीव अंध झाला। विषयसुखाला बहु रिझाला। वैराग्याचा अग्नि विझविला। कशानें पडेल हा बूज ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा शरण यावें। अर्धमात्रा औषध प्यावें। व्यतिरेक अनुपान घ्यावें। उतरति हे भवसूज ॥ ५ ॥

पद ४५ वें.

प्राण्या ! कोठुनि आलासी कोण तूं गा ! ॥ ध्रु० ॥ भुललासी देहसोंगा। गुंतलासी विषयभोगा। कुपथ्याचि होय भवरोगा। मृगजळाचिया ओघा ॥ १ ॥ भार वाहिलासी वावुगा। श्रमलासी करितां निगा। पंचभूतांचा हा बिघा। अम्मल झालिया हें तिघां ॥ २ ॥ कर्म आलें तुझिया विभागा। कुरवंडि हे काया काळ कागा। सुखदुःख हें मागोमागा। विश्रांतीसी कोणती जागा ? ॥ ३ ॥ जागृतींत कोण जागा ?। स्वप्नावस्थेंत कोण सांगा ?। लावुनियां देहा थांगा। सुषुप्तींत कोण तो गा ? ॥ ४ ॥

सोहिरा म्हणे सांग बा गा ! । बोलेनासि कां उगा ? । कांहीं नको येऊं रागा । नकळे तरि लया लागा ॥ ५ ॥

पद ४६ वें.

प्राण्या तुझा परिणामीं कठिण प्रकार ॥ ध्रु० ॥ न करिसी भजन, न करिसी पूजन । नाहीं तुला, आत्मज्ञानाचाही अधिकार ॥ १ ॥ तुला संत भेटेल कोठचा, जरि लाभ झाला भेटिचा । शिकविल्या बोला देसी, वेठिचा हुंकार ॥ २ ॥ तुला याद नाहीं आदली, कल्पना हे तुज बाधली । नाहीं योगारण्यीं साधली, मनमृगाची शिकार ॥ ३ ॥ आपणामाजी थोर, परि तूं देवापाशीं चोर । अवघा पदरीं बांधुनि घोर, करिसी लटकी लकार ॥ ४ ॥ ज्याचें तुजपाशीं काज, तुजला म्हणती ते महाराज । म्हणसी तितुलें होय होय, जी जी करुनि करिती जयजयकार ॥ ५ ॥ अधःपाता धाडिल, शेखीं पेंचा पाडिल । दोहींकडे नाडिल, स्थूल-बुद्धिचा अहंकार ॥ ६ ॥ सोहिरा म्हणे झाळकसी । जन्ममरणा आकळसी । जोंवरि अंतरदृष्टि नोळखसी ब्रह्म निराकार ॥ ७ ॥

पद ४७ वें.

प्राण्या देवचि होउनि रहा । तुज अलभ्य लाभ नरा! हा ॥ ध्रु० ॥ नाश आहे कीं शरीर आवारा, हा न पडे उमज मूढ गव्हारा हा ! । श्वास येतो कीं अंगुल्या बारा हा, केव्हां निघेल नेणों कीं वारा हा । तयावीण कोण नाहीं दुसरा हा, स्मरीं मुळ सोहं-बीज विसरा हा ॥ १ ॥ ब्रह्म ईश्वर जीव नाहीं तिसरा हा । अभिमान तुला नसरा हा ॥ २ ॥ सोहिरा म्हणे नको भेद कीं जरा हा । ओलांडी त्या अनाहत गजरा हा । पंचभूतें गुणातीत अज राहा । नित्य पी तूं प्रेमपाझर झरा हा ॥ ३ ॥

पद ४८ वें.

प्राण्या देवदेव भजरे । नित्यानित्य विचार करुनि मग सहजसमाधीं निज रे ॥ ध्रु० ॥ संसार माझा, मीच राजा, म्हणोनी माजा, येउनि भाजा छंदे, लज्जा सांडुनि, काजा अर्थी, पांजापांजी करुनि, भल्यासि गांजागांजी करिसी; दूत दंडिती, यम झडती, गळां किं पडति, कढई कढती, आंत उकडती, प्राणी रडती, आपदा घडती । हें घडिघडि सांगतों तुज रे ॥ १ ॥ अभ्रांची छाया, तैसी काया, लटकी माया, कीं नटजाया, हे नरकाया, जाते वायां लाग उपाया, सद्गुरुराया, भवाब्धिला या, सांग तराया. म्हणोनि पायां, वंदन करोनि बंधन तोडीं, कुसंग सोडीं, सुसंग जोडीं, अखंड गोडी, लावुनि उमज तूं जीविंचें हें निजगुज रे ॥ २ ॥ म्हणे सोहिरा नादबिंद्वातीत मुकुंदा, मूलकंदा, ज्ञानारविंदांतील आमोदा, अमित अमंदा, या गोविंदा, परमानंदा, दृष्टिं व्यष्टि न गमे जो कां सृष्टि-चालक, पालक सकल व्यापक, त्रिभुवनींचा नायक, अमृतबिंदु, पूर्णइंदु, कृपासिंधु । परब्रह्म अनादि तें निजबीज रे ॥ ३ ॥

पद ४९ वें.

प्राण्या दैव कसें उणें झालें ? देवा तुज करुणत्व न आलें ॥ ध्रु० ॥ अमृतामाजीं राहतों, आणि विषयकांजी पितों ॥ १ ॥ जागृतीची नावड, कैसें स्वप्नाचि वाटतें गोड ॥ २ ॥ अनर्घ्य रत्नहारा, टाकुनि पदरीं घेतों गारा ॥ ३ ॥ लटक्याची मृगजळा, देखोनि तृष्णेचा पसरीं ताळा ॥ ४ ॥ तूं गुरुकृपा माउली, सांडुनी ताडाची घेतों साउली ॥ ५ ॥ भवदोराची नागिण खायी, कर्मझा-डणी झाडुनि घेई ॥ ६ ॥ न वचे अविनाशाचे घरीं, वृत्ति धावे दृश्यावरी ॥ ७ ॥ आतां निरसीं हे मायामाव, नांद तूं अंतःक-

रणीं देव ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे मज हें देणें, आतां तूं तो कीं मीं तूं होणें ॥ ९ ॥

पद ५० वें.

प्राण्या सदां सुखी त्वां असावें ॥ ध्रु० ॥ अवचट हें निर्माण होतें । याचि प्रकारें विलया जातें । सखेद होउनि उगीच असतें । तेथें कोणावरि बा रुसावें? ॥१॥ चिंता वाहतो कोण पहातो । अचल अमर येथें कोण राहतो । त्रैलोक्य पोटीं कोण साहतो । स्वरूप तुला तें दिसावें ॥ २ ॥ प्रपंच ही मायेची मात्र । सुखदुःखाचे बसती घाव । एकवेळ निरंजनीं मन लाव । पहा तत्त्व हें पंचविसावें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे स्वस्थ असावें । मन हें संशयभूत नसावें । परब्रह्म हें हृदयीं ठसावें । मग आनंदें स्वस्थ बसावें ॥ ४ ॥

पद ५१ वें.

प्राण्या स्मर तूं भगवान् हरी रे! ॥ ध्रु० ॥ वैकुंठपती मुनि जपति अंतरीं । तपति निरंतरीं हे ॥ विपत्ति नाशित श्रीपति । परम तापसि जन उद्धरी रे! ॥ १ ॥ दातार हा अवतार धरी । उतार करी भवसागरिं रे! ॥ दैत्यमर्दन करी जनार्दन । गिरि गोवर्धनधारी रे! ॥ २ ॥ गरुडगामिनी मदनकामिनी । गोपी यामिनी वरी रे! ॥ परम प्रीति अति रति करी । त्रैलोक्य ज्याचे उदरीं रे! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे जंव देह हें असें तोंवरी । सार्थक कांहींतरी करीं रे! ॥ कमलनयन तो नयनिं पहा तरि । चैन पडों क्षणभरि रे! ॥ ४ ॥

पद ५२ वें.

प्रीति धरीं त्रिभुवनपतिची ॥ ध्रु० ॥ निषिद्ध मार्गी संयमकांटे । लावुनि त्याविण गोड न वाटे । स्मरणचि करितां आनंद

दाटे । पतिव्रतेला जेंवीं प्रीय पतीची ॥ १ ॥ जन्ममरण संसार-भ्रमण । आपण कोण याचें विस्मरण । मूळ अज्ञान दुःखकारण । नासे उपाधि नाना विपत्तीची ॥ २ ॥ जगतरंग सुरंग उठती । उठले जेथुनि तेथचि फुटती । एकमेकांवरि जैसे जुडती । चैतन्य एक आपांपतींची ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे ईश्वरसत्ता । दिसते नासते मालमत्ता । तो तंव आपणियां नियंता । जेवीं नगरीं प्रतिमा नृपतीची ॥ ४ ॥

### पद ५३ वें.

ब्रह्मचि तूं ध्यानीं आण रे ! ॥ प्राण्या ! ॥ ध्रु० ॥ सर्वांसी पाळक, मनाला चाळक । आंतुलीच कळा जाण रे ! ॥ १ ॥ मोहाचें गेह, जीवसहित देह । कोठुनि झालें निर्माण रे ! ॥ २ ॥ नित्य तें पाहतां, तेथेंचि राहतां । कल्पनेची मोडे त्राण रे ! ॥ ३ ॥ आदि मध्य ना, अंत जयाला । विश्रांतीचें हें ठाण रे ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे जाण, होणें जाणें नाहीं तयावीण, निश्चय हाचि प्रमाण रे ! ॥ ५ ॥

### पद ५४ वें.

भगवद्भजनीं हें मन लाव ॥ ध्रु० ॥ ममतामोहें जीव हा विकळे । शरीर जाइल केव्हां नकळे ॥ आपणासंगें न येती सकळें । ऐसें समजुनी त्वरित घे लाव ॥ १ ॥ सर्व घटीं हा आत्माराम । तोंचि आपुलें निजधाम ॥ केवळ तूं निष्काम होईं । टाकूनि द्वेष दुभाव ॥ २ ॥ व्यापूनि चराचर । जंगम स्थावर ॥ अरूप अनावर । त्यावर करणें तलाव ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा कीर बोल । बोले ते सकळ पोल ॥ कांहीं अंतरीं असोंदे ओलाव ॥ ४ ॥

पद ५५ वें.

भगवानजी कसा तो व्यापक पाहत असा ॥ ध्रु० ॥ सद्गुरुसेवा करुनि, निवृत्तिपंथ कवण तो पुसा । ज्ञानकळा ते पावुनि अंतरीं, या संसारीं असुनियां नसा ॥ १ ॥ मूढजनांचा सहवास हा, कधिं नका करुं कीं फारसा । नित्यानित्यविवेकें उजळुनि, अनुभव हा आरसा ॥ २ ॥ ज्ञानकमलदलिं अलिवत् चित्त, सद्बोध आमोदीं डसा । त्याचि उपाया लागुनि, सेवा सतत अद्वयब्रह्मरसा ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा ज्यारीतीनें दर्शन देईल, प्रसन्न होईल जसा । त्याचि प्रकारें स्थिर करोनी, मन सदैव स्वस्थ बसा ॥ ४ ॥

पद ५६ वें.

भगवानजीचें ध्यान धरोनी सदा सुखी रहा । अविनाश सुखभोगीं आनंद हा महा ॥ ध्रु० ॥ देहासंगें त्रिविध ताप मोठा कीं रे बा ! हा । ज्ञानबळें कांहीं हालों नको तूं जरा हा ॥ १ ॥ बहुत योनी भ्रमुनी आला हा नरदेहा । जीवन्मुक्त व्हावें याचा ध्यास मनीं वाहा ॥ २ ॥ विषयबोध राजयोग अभ्यास करा हा । नामरूप जाणतो हा कोठूनि कोण पाहा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे नित्यानित्य स्वानुभव गा हा । प्रगट गुप्त नोहे आत्मारामचि उमगा हा ॥ ४ ॥

पद ५७ वें.

भगवान् तुम्हांला प्रसन्न असो कीं ॥ ध्रु० ॥ अनंतकोटि-ब्रह्मांडनायक । आत्माराम हा स्वसुखदायक । कायिक वाचिक मन अभ्यासें सर्वभुतीं हा तोचि दिसो कीं ॥ १ ॥ अज्ञान समग्र हें विलया जावो । झालें कर्म हें ब्रह्मीं समावो । देहबुद्धिअभिमान

गमावो । किमपी हे भ्रांति नसो कीं ।। २ ।। परतुनि दृष्टी लय हें लागो । प्रपंचाचें बरें न मागो । निरालंबीं सदैव जागो । निश्चय तेथ बसो कीं ।। ३ ।। म्हणे सोहिरा चित्तीं डसो कीं । संतापाशीं हेंचि पुसो कीं । योग्यायोग्य हें न मनुनि हृदयीं भूतदया हे वसो कीं ।। ४ ।।

पद ५८ वें.

भगवानजी निदान । जो नर भजन पूजन न करित । रितीविण वर्ततसे नादान ।। ध्रु० ।। हित विहित कांहीं कधींच न कळे । बद्ध विषयबाधान । समाधान कधीं न होय ज्याला । विचंविला वादान ।। १ ।। अकट विकट हे निकट बोलत । बळकट जो सादान । संकोच होतसे ज्ञानउदयीं । जेवीं जंबुक भर चांदान ।। २ ।। निरहंकृतिनें ईश्वरिं न करी । चित्त वित्त जीवित हें दान । वणवण हिंडत दिवसभरी ही । स्वार्थ साधनान ।। ३ ।। म्हणे सोहिरा जन्मवरी असे । जीवित्व आबादान । मन हा भुजंग खुलेना डुलेना । अनाहत नादान ।। ४ ।।

पद ५९ वें.

भगवानजीला पाहतां प्राण्या । तुज सुखदुःख कांहीं नसे रे ! ।। ध्रु० ।। अदृश्य कळा हे व्यापक सकळा । 'नेति नेति' म्हणतसे वेद नकळा । नेणसि याला जीवा तूं विकळा । शरीर चाळवी जीवनकळा । हा दूर कधीं नाहीं जवळि असे रे ! ।। १ ।। अनन्यभावें, भजन स्वभावें । नाम घ्यावें, अंतरीं ध्यावें । लय लावावें नित्य निरंजनीं, क्षणभरि जरि चित्त बसे रे ! ।। २ ।। पृथ्वी पाहतां, उदकीं वाहतां । तेजीं दाहतां, गगनीं साहतां । सन्निधानीं मनपवन चळण करी । स्थिरचरीं हरि सर्वत्र वसे रे ! ।। ३ ।। जन्मा नाहीं यावें

जावें । देवचि अवघा म्हणुनि भजावें । संघावीण संतोषी व्हावें । गुणत्रय परब्रह्मरसीं रे ! ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा अती ईश्वर पतीतपावन । दीनबंधु हा जगदुद्धारण । सज्जनजनमनमोहनकारण । चिद्धनवनीं आनंदघन वर्षे रे ! ॥ ५ ॥

पद ६० वें.

भगवान् विष्णु स्मर अनंत व्यापक तो ॥ ध्रु० ॥ युगायुगीं जो धर्म स्थापी, पापी सकळही दानव कापी, प्रतिपाळी अनुतापी, अंतरीं काम क्रोध हे चापी, जगनग-तरंग असे ज्या आपीं, तो हा अच्युत मधुसूदन मनमोहन हृषीकेशी, हा हृदयनिवाशी, अशासि टाकुनि कशासि जीव हा आणिकची बघतो ॥ १ ॥ अनन्यभावें, नाम घ्यावें, श्रवण करावें, हृदयीं धरावें, मनीं भरावें, तद्रूप व्हावें, पूर्वार्जित प्रारब्ध स्वभावें, देह हें पावे, ईश्वर देता, अनेक दाता, असें असुनियां पोटासाठीं, आटाआटी, करूनि शरीर हें कशासि हांसकितो ॥ २ ॥ गुरूदास्य हें कांहीं असावें, लटिकें मायिक दृश्य दिसावें, अविनाश तें काय पुसावें, ध्यान करित एकांतीं बसावें, पाखंड तंड वितंडवाद कशासि हा शिकतो ॥ ३ ॥ भक्त-जनांचा धांवा, करितो कृष्णस्वरूपीं पांवा, वाजवी गोपवधूंप्रती नांवा, नांवा उच्चारित रतिरंग, लाल श्रीरंग, विराजित यदुवंशींचा अवतंस हा हरी, शंखसुदर्शनधारी, मोक्ष देऊं शकतो ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा भारतसमरीं, सारथ्य करी, तो भारतमथनीं, नवनीत गीता-अमृतवचनीं; उपवीती उपदेश करुनियां, उद्धरी पलें कीं हा पार्थ; प्रताप अर्थचि परमार्थ, दावी करी आपणा समतुक तो ॥ ५ ॥

पद ६१ वें.

भगवंत ऐशापरिचा ध्यानीं आणा ॥ ध्रु० ॥ व्यापक तो परि दृष्टिस न दिसे । देखत भूल अजाणा । सर्वभूतीं हा अगम्य

अगोचर । संतसमागमीं जाणा ।। १ ।। गृहस्थ नोहे कीं संन्यासी । न धरी कैंचाचि बाणा । शून्य होऊनि शून्य नव्हे जो । चालक पंचहि प्राणा ।। २ ।। म्हणे सोहिरा हृदयनिवासी । त्रैलोक्याचा राणा । भक्तजनासी संकटिं शीघ्रचि । पावत जो निर्वाणा ।। ३ ।।

पद ६२ वें.

भगवंतभजनावीण हें व्यर्थ जिणें रे ! ।। ध्रु० ।। नाम एकाचें न घेती फुकाचें । ते नरकाचे पाहुणे रे ! ।। १ ।। निर्माणकर्ता विसरुनि पुरता । संसारचि करिताहे । तयाचें नाशिब उणें रे ! ।। २ ।। एक आत्मकळा नकळा । प्रपंच सगळा । शिकोनी जसें पोट भरी हें सुणें रे ! ।। ३ ।। म्हणे सोहिरा विवेक करावा । त्वरित वरावा हृदयिं धरावा पाण्याला पाणी रे ! ।। ४ ।।

पद ६३ वें.

भगवंताचे गुण गा रे ! । श्रवणमनननिदिध्यासाविण क्षण एक नको रहूं उगा रे ! ।। ध्रु० ।। सायासें सांपडली हे नरतनु । दुर्लभ काळ हा नको घालवूं वाउगा रे ! ।। १ ।। बलवान मी धनवान मी । कीं विद्वान मी टाकुनि गर्व फुगा रे ! ।।२।। जन्मा आला कवण गेला । कवण मनाला चाळणवाला । आधीं याला उमगा रे ! ।। ३ ।। जैसे जळगारे, ! कनकनगा रे ! । तैसा व्यापक एक अनेक जगा रे ! ।।४।। सोहिरा म्हणे वृत्ति विरागती । तूर्या रांगती । जेथ अनाहत वाजति नित्य नगारे ।। ५ ।।

पद ६४ वें.

भगवंताला स्मराल, तरि हा भवसागर तुम्हीं तराल हो ! ।। ध्रु०।। पापामध्यें न रहाल, शुद्ध हें पुण्यचि करा तराल । आणि योगी व्हाल,

तरि मोहफणीचें विष उतराल हो ! ॥ १ ॥ आत्मा ना विसराल, विषयतृष्णा ना पसराल । भ्रमांतूनी कसराल, आदिपुरुषाला अनुसराल हो ! ॥ २ ॥ विचार हा विवराल, निरंतर भजनीं वावराल । निजशांतीला वराल, चंचळ मानस हें आवराल हो ! ॥ ३ ॥ योगाभ्यासें झराल, अक्षयप्रेमातें पाझराल । निरंजनवनीं ठराल, तेव्हां नित्यानंदें भराल हो ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे कर्म हराल, केंवीं जन्मुनि पुढतीं मराल । चित्त चैतन्यीं सुधराल, तेव्हां उभय कुळें उद्धराल हो ! ॥ ५ ॥

पद ६५ वें.

भजन करीं काहीं सुख दे तें ॥ ध्रु० ॥ कुतर्काचा मार्ग निरोधीं । न जावें आधीं मन विरोधीं । पुनरपि कधीं न करीं निंदेतें ॥ १ ॥ संतांशीं सद्भाव धरावा । योगज्ञानाभ्यास करावा । सांपडेना उगें स्नानसंध्येतें ॥ २ ॥ साधनसंपत्तीला आढळेना । सद्गुरुवांचुनि तें कीं कळेना । करीं आत्मस्वरूप देतें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मोक्षचिंतन । चित्त लागे अलक्ष अचिंतन । पारंगत करी ब्रह्मपद तें ॥ ४ ॥

पद ६६ वें.

मग कांहीं चिंता नाहीं हो ! ॥ ध्रु० ॥ जन्ममरण हरि, शरण जाइं हरि । स्मरण करित हें राहीं हो ! ॥ १ ॥ व्यासवचनीं अभ्यास करुनियां । ध्यास निरंतर वाहीं हो ! ॥ २ ॥ म्हणे सोहिरा गीतावाक्य संगितासि आणोनि । गीत गा हें सबाह्यीं हो ! ॥ ३ ॥

पद ६७ वें.

मग चिंता ते हो कशाची ? । मुळीं सोडिलिया आशाची ॥ ध्रु० ॥ भ्रांति फिटली देहनाशाची, अवघी गेली अवदशाचि ।

चळती कळती दैवदशाची, प्रभा हे अविनाशाची ॥ १ ॥ प्रतीति नलगे हो विषाची, खाउनि विषयांची बा साची । हे लतिका भवपाशाची, समजुनि गुंडाळिल गा साचि ॥ २ ॥ योनी अपूर्व मनुष्याची, सेवा करणें जगदीशाची । संगत करणें सत्पुरुषाची, योगी ज्ञानी अशांची ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा रहाणी जळीं माशाची, तेंवीं समाधि तमाशाची । बाल उन्मत्त जो पिशाचि । कृपा मोद देती निशाची ॥ ४ ॥

पद ६८ वें.

मग्न हें होऊं दे मन त्या देवाचे स्मरणीं हो ! ॥ ध्रु० ॥ देहबाहुलें देहीं दिसे सूत्रधारी न दिसे हो ! । नसेचि म्हणों तरी सर्व प्रकाश हा । ज्याची उमगेना अगम्य करणी हो ! ॥ १ ॥ शेषस्वरूप हें वेष जयाचा । कांहीं नसे लेश जयाचा हो ! । ज्यानें वाहविली मस्तकीं धरणी हो ! ॥ २ ॥ मर्यादेनें हा सागर नुलंघी गिरिवर । वर्षत व्योमीं हो ! आज्ञेनें जलधर । अंतरिक्ष चालत तरणी हो ! ॥ ३ ॥ अर्चन वंदन आत्मनिवेदन । योगाभ्यास कांहीं, गुरु हो ! । सेवा साधन आराधन शुद्ध आचरणी हो ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे मुक्ति तूं पावसी । जेथ जासी तेथ पूज्यमान होसी हो ! । न पडसी जन्ममरणीं हो ! ॥ ५ ॥

पद ६९ वें.

मना ईश्वर-भजनीं तूं रत रे ! ॥ ध्रु० ॥ मृगजलवत् तूं जाण असार । प्रपंचींहुनी परत रे ! ॥ १ ॥ त्वरित तूं घेईं हें परम पीयूष । आयुष्य गेलें सरत रे ! ॥ २ ॥ अलक्ष-लक्षा आणुनि अंतरीं । विलोकन करीं तूं सुरत रे ! ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा पाहे तें पाहणें । स्थिरावतां मुक्ति जैसें लवण जळीं विरत रे ! ॥ ४ ॥

पद ७० वें.

मी कोण कोठुनि आलों । या शरिरीं हें स्मरण धरा रे ! ॥ध्रु०॥ कवण कर्म हें केलें । नरदेह कशानें प्राप्त जाहलें । सुखदुःख हें कळुनि आलें । कैसें हाचि विचार करा रे ! ॥ १ ॥ स्थूलसूक्ष्म पंचभुतांचें । मिथ्या अवघें परि दिसतें साचें । लाघव सकळिक संसाराचें । सत्वर यांतुनि कडे सरा रे ! ॥२॥ ज्ञानाचा अभ्यास करा । निजवस्तूतें ध्यानिं धरा । ध्यानें सर्वहि त्याग करा । मग निर्गुण नित्यानंदें पूर्ण भरा रे ! ॥ ३ ॥ निरसुनियां कामक्रोध । करुनि इंद्रियां दृढ निरोध । जेणें होइल ब्रह्मबोध । हा अंतरिं घ्या शोध बरा रे ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे हेंचि ध्यावें । दृश्यातीत मन हें व्हावें । फिरुनि अपुल्या मुळासि यावें । येणेंचि हा भवसिंधु तरा रे ! ॥ ५ ॥

पद ७१ वें.

मुखीं सत्य बोलणें सत्य बोलणें । निजानंदें डोलणें ॥ ध्रु० ॥ दहावें द्वार उघडलें, मन ब्रह्मीं जडलें । त्याचें इष्टानिष्ट पडलें । लोकांनीं काय करणें ॥ १ ॥ धर्म कीं अधर्म घडो, सुखदुःख गळां पडो । कांहीं असलें तरि, अनुभवबळें तोलणें ॥ २ ॥ आपण तत्त्वींचा जो देखणा । हृदयांतिल मीपणापरतें खोलणें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे आपुलें हित, पहावें हें विहित । ज्याला न कळे आपुली रीत, त्यासी काय बोलणें ॥ ४ ॥

पद ७२ वें.

याचिसाठीं भगवंताला शरण प्राण्या यावें हो ! ॥ ध्रु० ॥ प्राप्त व्हावें ब्रह्मज्ञान । नित्यसुखसमाधान । लागावें कीं तेंचि ध्यान । आत्मानुसंधान । चिंताशोकरहित चित्त स्वस्थ असों द्यावें हो ! ॥ १ ॥ नभीं जातां न भ्यावें । दृश्याभासासी न यावें ।

अंतरिक्ष रहावें । नवल हें पहावें । वर्तोनी कीं याचि देहीं । विदेही हें व्हावें हो ! ॥ २ ॥ धरावा कीं हाचि ध्यास । करावा हा योगाभ्यास । जिंकोनीयां शून्यास । अंतरीं हा संन्यास । पूर्णबोधपरमामृत सिद्धाचि हें प्यावें हो ! ॥ ३ ॥ समबुद्धि जनवन । दिसावा कीं जनार्दन । होउनीयां उन्मन । वर्षो हा आनंदघन । प्रपंचीं गुंतलें मन । निरंजनीं न्यावें हो ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे याचि भावें । चैतन्य हें व्हावें ठावें । अनुभवाला यावें । जन्ममृत्यु सुटोनि जावें । नरदेहीं सार्थक एवढें करोनियां घ्यावें हो ! ॥ ५ ॥

पद ७३ वें.

या बहुरूपीं अरे कां रे ! भुललासी ? ॥ ध्रु० ॥ कोठुनि येणें, कोठें जाणें । काय घेणें, निदानासी ॥ १ ॥ ज्याहीं दिधलें देह, तुज निःसंदेह । तो तूं विदेह, नोळखसी ॥ २ ॥ जीवरूपें शिव वर्तत आहे । प्रळयीं चुकवी पतनासी ॥ ३ ॥ भवशरयुद्धीं आड करोनि जीवा । शिव करीत अविनाशी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे जीवा, ओळखीं शिवरूप । निरसि तूं भवबंधासी ॥ ५ ॥

पद ७४ वें.

या रे ! सज्जन भजन कराया ॥ ध्रु० ॥ तनु मन धन हें अर्पूनि, सदिं सत्संग धराया ॥ १ ॥ आदिअंतीं निजसुखशांति, एकांतीं वराया ॥ २ ॥ विषयां विकलेती, विद्या शिकलेती, पोट भराया ॥ ३ ॥ जन्मा येउनि, उगेंचि गेलेती, व्यर्थ मराया ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे तुम्हांप्रति, मीं सांगतों हेंचि तराया ॥ ५ ॥

पद ७५ वें.

लय हें भगवंतीं जरि लाय । मग हा प्रपंच केला तरि काय ॥ ध्रु० ॥ जैसी अभ्रींची हे छाया । कीं हे जाण नटाची जाया ।

अथवा मृगजळवत् हे माया । तैसी वाटत ज्याला काया । अवघेंचि मिथ्या दिसलें होय ! ॥ १ ॥ देहबुद्धि येतां भ्रांति । हृदयीं न धरे होते वांती । स्वस्थ बैसुनियां एकांतीं । कवण मी आहें आदीं अंतीं । ऐसें अखंड पाहत जाय ॥ २ ॥ जैसे जाण सतीचे भोग । तैसें वरवर दिसतें सोंग । अंतरिं जीवशिवाला योग । नासुनि गेलासे भवरोग । मोह हा मनचाची मनीं खाय ॥ ३ ॥ नयनीं नयेंचि दृश्याभास । समूळ तुटला आशापाश । समग्र विकासलें आकाश । चंद्रसूर्याविण प्रकाश । चित्त हें महाशून्यीं स्थिर होय ॥ ४ ॥ झाला प्रसन्न हा गुरुराय । चुकवी जो कां भवरणघाय । त्याचे कधीं न सोडीं पाय । त्याला तनु मन धन हें वाय । जो कां नित्य निरंजनीं धाय ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे सर्व समाय । विपरित गेले सर्व अपाय । हाता आला तरणोपाय । पिंडब्रह्मांडीं न माय । जन्म-मृत्यु-जरा अपाय । याचा कळला तरणोपाय । आंगीं आहे पुरती कमाय ॥ ६ ॥

### पद ७६ वें.

लय हें लावीं भगवंतीं । हाचि तरणोपाय अंतीं ॥ ध्रु० ॥ ध्यान धारणा मुद्रा आसना परतुनि पाहूं लाग । मार्ग जनांचा सोडुनि स्वइच्छें बैस एकांतीं ॥ १ ॥ पवनमनासह एकवटुनि ब्रह्मरंध्रीं तूं जाईं । नामरूप ज्या नाहीं त्या ठायीं सुख भोगिलें संतीं ॥ २ ॥ म्हणे सोहिरा आदिनाथ गुरु गुप्त निरंजन पायीं । हरि हर ब्रह्मा जेथुनि झाले चित्सुखवनवसंतीं ॥ ३ ॥

### पद ७७ वें.

वारंवार तुम्हीं परब्रह्म आठवा ॥ ध्रु० ॥ तुटली सोय तुमची तुम्हीं, परतोनि गांठवा ॥ १ ॥ महाशून्यीं चैतन्यीं मशालीं

पाठवा ॥ २ ॥ लांब रुंद उंच नीच, नव्हे मोटवा ॥ ३ ॥ जातीचा अजातिया घरीं, नेउनि बाटवा ॥ ४ ॥ निर्विकल्पीं कल्पना ह्या, सकळ आटवा ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे आंगीं पूर्णानंद दाटवा ॥ ६ ॥

पद ७८ वें.

विश्वास ठेवीं प्राणिया नारायण हरिवरी रे ! ॥ ध्रु० ॥ ज्यानें निर्मियलें ब्रह्मांड, येवढी पृथ्वी हे नवखंड । तिन्ही देव त्रिभुवनबंड, यमधर्म जीवाला दंड । भूतिं भूत पिंड उदंड । ज्यानें उदंड चालतसे हें शरीर रे ! ॥ १ ॥ ब्रह्मादि वंदिती ज्याला, 'नेति' वेद म्हणति त्याला । या जगाचिया पित्याला, कीं हें विश्व भरोनि रित्याला । तूं नकोचि विसरों त्याला । क्षण भाग्याचिये भरिं रे! ॥ २ ॥ अवलोकुनियां भाळीं, घाली योगासन हें त्रिकाळीं । दिठी देउं नको आभाळीं, दृश्य पदार्थ या गाभाळीं । कांहीं पातक हें सांभाळीं । महातारुण्य लहरिवरी रे! ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा हा भवतारी, देव युगायुगीं अवतारी । जो पुरुष नव्हे नारी, हा आकारचित्रच्चितारी । नको घालवूं त्याविण काळ । होय व्यर्थ हे वांच्छा नानापरी रे! ॥ ४ ॥

पद ७९ वें.

विसरूं नको तो देव । जो साक्षिभूत स्वयमेव ॥ ध्रु० ॥ तारुण्यकाळीं पुण्यदशेचा, होऊं पाहे चेव । रंगरुपाला भुलूं नको तूं, पाहत स्त्रियेचा ठेव ॥ १ ॥ अंतकाल हा पावे तोंवरि, भवसागर हा पेंव । वैराग्यविवेकें, संगाविरहित, सदैव सुख हें सेव ॥ २ ॥ पराधीनता पावेल तेव्हां, विस्मय पडेल भेव । स्वइच्छ असणें, यास्तव घरघर, भिक्षा मागुनि जेव ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा

त्यावांचुनि हें, शरीर केवळ शव । स्वयंप्रकाशक सत्ता ज्याची, चालवि हे अवयव ॥ ४ ॥

पद ८० वें.

सदसद्विचार कांहीं करूं या रे ! । एक वेळ परम हा दुर्घट, दुस्तर भवसागर तरूं या रे ! ॥ ध्रु० ॥ भक्ति ज्ञान वैराग्य जेणें, निजबोध उपजे हृदया रे ! । संतति संपत्ति न येती कोणी, निर्वाणींच्या समया रे ! ॥ १ ॥ अविद्यात्मक विकार सर्वहि, समूळ जाति लया रे ! । जेणें करुनि हे शीघ्रचि होइल, भगवंताची दया रे ! ॥ २ ॥ नित्यानित्य विवेकें निवडा, जेवीं हंस सलिलपया रे ! । याहुनि आणिक तीर्थें नलगती, तुम्हां हे काशि गया रे ! ॥ ३ ॥ देहसंरक्षण कैसें होइल, टाकुनियां किं भया रे ! । म्हणे सोहिरा निजधामीं रहा, निघावयाचे तया रे ! ॥ ४ ॥

पद ८१ वें.

साधुजन वंद्य ॥ ध्रु० ॥ नित्यानित्य हें जाणुनि सत्य । स्वरूपीं होती स्वसंवेद्य ॥ १ ॥ प्रकृति भुलाइ, सांडुनि लवलाहीं । पाहती अनूतन आद्य ॥ २ ॥ विद्या हे इतरिक, सांडुनियां निज एक । घेती अधात्म सुवेद्य ॥ ३ ॥ विषयसुखीं भेद, मानुनियां अभेद । सोहिरा पूर्णाल्हाद घेतो सुख सद्य ॥ ४ ॥

पद ८२ वें.

सांडा भ्रमा ! हरिरंगीं रमा ॥ ध्रु० ॥ विषयसुख हें दुःखदायक । याहुनियां सुगमा ॥ १ ॥ जरी करिल कृपा, अनुभव सोपा । दावी स्वरूप हें अपर प्रतिमा ॥ २ ॥ गुजाचें गुज आहे हें

निज । अगम्य जें निगमा ॥ ३ ॥ माझें मीपण हरिलें पूर्ण । सोहिरा म्हणे सुखा नाहीं सीमा ॥ ४ ॥

पद ८३ वें.

सीताराम स्मर रे प्राण्या, भजन अहर्निशि कर, जीव हा उद्धर रे! ॥ ध्रु० ॥ शीघ्रचि उठिला पितृआज्ञेनें झाला वनवासी । सिद्ध करुनियां वानरसेना उतरला सुवेळेसी । शिर उडविलें दशाननाचें प्रताप लंकेसी । शिळा तारिली नगरी जो कां न्हे वैकुंठासी ॥ १ ॥ तारक सकळां स्वामि आम्हां राम धणी दाता । तारिले पाषाण समुद्रीं हे ज्याची सत्ता । तारापतिशीं चकोर जेवीं लावितसे चित्ता । तावत् ज्याचें चिंतन करणें अखंड हनुमंता ॥२॥ राख ज्याचें हें लक्ष निरंतर निरसीं संसारा । राव रंक देह समान चालवी आज्ञेनें वारा । रानीं नलगे टाकुनि जाणें अवघ्या घरदारा । राहें स्थिर तूं परतुनि पाहें चराचरीं सारा ॥ ३ ॥ मनमोहन हा गहन वसतो हृदयीं आराम । मग्नचि होउनि असणें तेथें स्वइच्छ निष्काम । मज्जन करणें ज्ञानगंगेचें निर्मळ निर्लोम । महानंद परमात्म सोहिरा म्हणे हरे श्रम ॥ ४ ॥

पद ८४ वें.

सुखी हो कीं त्या सुखीं । जेथ मनाची नलगे नखी ॥ ध्रु० ॥ जीवा तूं पक्षी उदास होई, ऊर्ध्वमूल महारुखीं । पुनरपि इच्छुनि पडों नको या, प्रपंच परम दुःखीं ॥ १ ॥ भिन्न स्वभाव जनाचे देखत उपटुनि टांकी उखी । भगवंताचें अखंड स्मरण कीर्तन कर हें मुखीं ॥ २ ॥ म्हणे सोहिरा शरीर हें तंव, तृणतुल्य लेखीं । भोगी असतां जोगी हो तूं, आदेस कर ओळखीं ॥ ३ ॥

### पद ८५ वें.

संसारचिंता चिंतितांचि मन हें गेलें । नरदेह जन्माचें सार्थक नाहीं केलें ॥ ध्रु० ॥ इच्छिलें हें जोंवरि न घडे, सुखनिद्रा हे तोंवरि न पडे । विवेक तरुवर समूळिं उपडे, सदां रागेलें ॥ १ ॥ दिवसेंदिवस काया शोके, विवंचनाही पुढली घोके । नित्यानित्य बसती धोके, जीवित्व रोगेलें ॥ २ ॥ उत्तम योजिती सर्वकाळ, आपपरांची पुरविति आळ । पावल्या मृत्यूचा वेळ, अवचित घोंगेले ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा आत्मा न कळे, मिथ्या ह्या मृग-जळींच विकेळे । अन्यथामति निजेंत लोळे, नव्हती जागेले ॥ ४ ॥

### पद ८६ वें.

संसार प्राण्या थोडा रे थोडा रे ! । जैसा पाण्याचा बुडबुडा, वेगीं सोडा रे सोडा रे ! ॥ ध्रु० ॥ त्रिकुटीं मन हें ओढा, ब्रह्मरंध्र फोडा । विषय गोडावरिली माशी, तेवीं मोहपाश तोडा रे तोडा रे ! ॥ १ ॥ इंद्रियें हीं कोंडा, वरि नियमाचा हा धोंडा, ठेवुनि अभिमान दवडा । दूर करोनियां आधीं, विकल्प मनिंचा मोडा रे मोडा रे ! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे गाढा, नाडा पंचभूतांचा हा झाडा, । यांतुनी हें चित्त काढा, अविनाश गुरुपद जोडा रे जोडा रे ! ॥ ३ ॥

### पद ८७ वें.

स्मर हर त्रिभुवनपति । तूं प्राण्या पावसि परम गती ॥ ध्रु० ॥ सद्बुद्धि नारी पतिव्रतेला । प्रियकर जो कां पती । निःसंग अनंग बहुरंग दावी । जगतरंग अपांपती ॥ १ ॥ जया-लागिं हें जपतपसाधन । साधक जन विलापती ध्यानामृत पित तद्रुप जाहले । संसारीं न लपती ॥ २ ॥ अंतर्गत हा नकळे आत्मा ।

जीव विस्मृत मूढमती । चिदानंद चित्स्वरूपीं सावध । करिं बा दृढतर मती ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा लाघव घेईं । तूं भजनकळा धांवती । ईश्वरीं लय हें लावीं जोंवरी । आयुष्याची आवती ॥ ४ ॥

पद ८८ वें.

स्मरा रे प्राणियांनो हरिला सरा ॥ ध्रु० ॥ अजुनी गुंताल तुम्हीं किती संसारा । स्वप्नप्राय हा दिसतो पसारा । विवेकें पाहा सारासारा । परात्पर अजरामरा ॥ १ ॥ नरकीं न पडाल तें करा आचरण । भगवंताला यावें शरण । नित्य करावें नामस्मरण । येणें चुके जन्म मृत्यु जरा ॥ २ ॥ शरीर हें कवणें कैसें घडलें । पंचभूतात्मक विषयीं जडलें । साक्षित्व या मध्यें न सांपडलें । निश्चय हा दृढ धरा ॥ ३ ॥ सर्वहि गेलिया काय हें उरतें ? । कोठुनि उत्पन्न कोठें मुरतें । पाहण्यांत पाहणें पाहा पुरतें । आनंदेंचि काळ हा हरा ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे आयुष्य जातें । ब्रह्म हें नरदेहीं-हुनीच उमजा तें । संतसमागमें कीं समजा तें । चित्त हें त्यांतचि भरा ॥ ५ ॥

पद ८९ वें.

हकनाहक आयुष्य जाय । प्राण्या तूं उगाच बससी काय ॥ ध्रु० ॥ मनासी मानेल तेंच तूं करिसी । देवासी जें कां नसाय । विचार बोलुनि करिसि तूं अवघा । हा कृत्रिम व्यवसाय ॥ १ ॥ अति प्रीतिनें देहा पाळिसी । भिक्षुकां देसि दुराय । अनुतापाविण नरकीं पडसी । मग हा न चले उपाय ॥ २ ॥ स्वदारा हो परदारा हो । भुलणें हाचि अपाय । भोग भोगितां रोग ऊठती । रक्त-पित्त-कफादिक वाय ॥ ३ ॥ अनादि हा सत्य ईश्वर । म्हणोनि सोहिरा गाय । मलाहि दिसतो तुलाहि सांगतों । पुढील तरणोपाय ॥ ४ ॥

पद ९० वें.

हरि भगवान् भजन करी मना ॥ ध्रु० ॥ नश्वर देह हें जाणुनि सकळिक । विषयसुख माव ना । सांडी तेथील धांव ना । त्वरित लावीं आत्मस्वरूपीं भावना ॥ १ ॥ शब्दज्ञानेंचि करोनि साधुचा । वृथा घालसि आव ना । नासुनि उगीच काव ना । गुसांई अंतरिं विषयकामना ॥ २ ॥ ज्ञानसंभवीं इंद्रियवृत्तिसी । भिऊं नको त्रिविध या जना । चित्सुखवनीं विहार करोनि । करीं निवासस्थान निरंजना ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा आयुष्य सरतें । कांहीं किमपि काम ना । योगयाग गुरुदास्यभक्ति । या नवविध घे लाव ना ॥ ४ ॥

पद ९१ वें.

हरिभजनावीण काळ घालवूं नको रे ! ॥ ध्रु० ॥ दोरिच्या सापा भिऊनि भवा । भेटि नाहीं जिवा शिवा । अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नको रे ! ॥ १ ॥ विवेकाची ठरेल ओल । ऐसे बोलावे कीं बोल । आपुल्या मतें उगाच चिखल कालवूं नको रे ! ॥ २ ॥ संतांचे संगतीने समज । ध्यानिं आणुनि पुरतें उमज । अनुभवावीण मान हालवूं नको रे ! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे ज्ञानज्योति । तेथें कैंचि दिवसराति । तयाविणें नेत्रपातिं, हालवूं नको रे ! ॥ ४ ॥

पद ९२ वें.

हरिस्मरण-विस्मरण, तरि तुझें काय जिणें रे असून ॥ ध्रु० ॥ स्वार्थचि साधिसी, सार्थक नेणसी । कोणासि पहा तरि पुसून । पुढें नाहिं गति, मलिन जाहलि मति । साधुचि संगति नसून ॥ १ ॥ रतीविलासीं लंपट होसी । मानस गेलें डसून । लवकर सर कीं, पडशिल नरकीं । फुकट मरशिल कुसून ॥ २ ॥ आळसि कामा,

उगा रिकामा । थट्टाचि करिसी बसून । कुकर्मांच्या कांहीं वर्माच्या । गोष्टि सांगसी कसून ॥ ३ ॥ शरीर फिरवी तुजला मिरवी । देव असे रे रुसून । जवळिं असून तुझे हृदयिं बसून । भगवंत नये रे दिसून ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा गुरूनाथ हा । माझ्या हृदयीं घुसून । जनांसि उद्धरावया कारणें । वचन सांगतो ठसून ॥ ५ ॥

पद ९३ वें.

हरिस्मरणसुख हें जरि घे । तरि मोह मनीं न रिघे ॥ ध्रु० ॥ श्रवण-मनन-निदिध्यासेंकरुनि, रज-तम हा डाग निघे । मिथ्या मानिलें सकल दृश्य हें, पुनरपि नयनीं न घे ॥ १ ॥ येणें पुण्यें करुनि वर्तन, क्रिमपी न राहती अघें । भक्ति-ज्ञान-वैराग्यदशा हे नित्य हृदयीं वळ घे ॥ २ ॥ ध्यान धरोनी निरंजनवनीं, दृढाभ्यास लावुनि घे । तरि तें पद पावेल जेथ हे ब्रह्मा-हरि-हर निघे ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा आतमरसाची, प्राणि नित्य चव घे । अंतर बाहेर तेंचि कीं व्यापक, ब्रह्मचि हें अवघें ॥ ४ ॥

पद ९४ वें.

हें काय कसें प्राण्या पहा । पाहुनियां निश्चळ रहा ॥ ध्रु० ॥ शून्यामाजीं देह हें भासे । भासत भासत केव्हांचि नासे । सबाह्य याला कोण प्रकाशे । जवळींच असोनियां न दिसे हा ॥ १ ॥ पंचभूतांची साक्षि येती । साक्षि कैसी ते दिठी न येती । प्राप्त व्हावी गुरुदयें ती । तोचि कळेचा निदिध्यास वहा ॥ २ ॥ पिंडब्रह्मांड त्यागुनी सुख हें । सदैव स्मरतां असे सन्मुख हें । समूळ विलया जातें दुःख हें । दृश्यातीत आनंद महा ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा रवि शशि चाले । ज्याचे सत्तेनें जग हें हाले । हेंचि देखुनि योगी धाले । नवलाचि परम अहाहा ! ॥ ४ ॥

*

# (४) वेदांतपर पदें.

## पद १ लें.

अधःशून्य उर्ध्वशून्य, त्रिशून्य चौंशून्या । भेदोनि महाशून्यीं गेला ॥ १ ॥ दोरावेगळा बांधोनियां, जेथ । इंद्रियांचा धणी हा धरोनियां न्हेला ॥ २ ॥ त्रिकुट श्रीहार गोल्हाटीं पैट, औट-पीट । टाकुनि भ्रमर गुंफे आला ॥ ३ ॥ वैखरी रोधोनि, मध्यमा भेदोनि, पश्यंति सोडोनि । परेनें वरियेला ॥ ४ ॥ सोहिरा निःशब्द सुखें सुखावोनी । सत्राविच्या स्तनपानीं गुंतला ॥ ५ ॥

## पद २ रें.

अपरापर हरी । करितो नवल परी ॥ ध्रु० ॥ शबल शुद्ध हें जाणुनि एक । प्रकटे ज्ञाननिधी । दोहिं प्रकारें भावुनि आपण, खेळे चराचरीं ॥ १ ॥ एकी एक भुलवणी । मग दावी अनेक आभाळ दृष्टिं आणोनी । मग हा सगुण जीव वरी ॥ २ ॥ कोठें आपें-आपणा देखे । प्रेमसुख हरिखें । मानुनि आलीढ देह चारी ॥ ३ ॥ भवभ्रम फेडुनि निज सोहंबीज । मांडोनि जपतो, सोहिरा देहीं निर्धारीं ॥ ४ ॥

## पद ३ रें.

अंबे ! तनु मन ध्यान नेई ॥ ध्रु० ॥ निजउगम तुजमाजि सहज । तें समाधिसुख घेई ॥ १ ॥ स्वतःसिद्ध सहाविया योगिनी । हा भव जाणुनियां तूं गे माई ॥ २ ॥ आपें आपणा-माजी स्वरुपीं नसे दुजी । सोहिरा म्हणे हेंचि भावुनि ध्याई ॥ ३ ॥

## पद ४ थें.

अभ्यास मनाला लाव । प्राण्या मोक्षपदाप्रति पाव रे ! ॥ ध्रु० ॥ दोराचि परि हा भुजंग भासत । प्रपंच तद्वत माव ।

नित्य अनित्य विलोकुनि अंतरीं । दृढ धरीं सद्भाव रे ! ॥ १ ॥ शमदम साधुनि घालिं निरंतर, संतसमागम नाव । उपरम उजारा सोहं झेलित, भवनदी तरणोपाव रे ! ॥ २ ॥ इडापिंगळा आकळुनि घेईं, सुषुम्नेमाजी धांव । निमग्न होउनि ब्रह्मानंदीं, परम सुख हें पाव रे ! ॥ ३ ॥ उपनिषदांचा अर्थ भरित, निर्गुण समुच्च गांव । म्हणे सोहिरा स्वयंप्रकाशक, आत्मकळेचा प्रभाव रे ! ॥ ४ ॥

पद ५ वें.

अरे ! सज्जन होउनी विजन देखें ॥ ध्रु० ॥ विषयमदादिक पोळुनि आघवे । जेथ सदाशिव तोखे ॥ १ ॥ अनात्मक हें सकळहि आटुनि । अभेदनगीं उमा उखे ॥ २ ॥ शंखध्वनि हे अनुदिनीं वाजत । नारि भुलत निजसुखें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे तें स्थान पाहे तो । पुनरागमनासि नोळखे ॥ ४ ॥

पद ६ वें.

अवचटेंचि आजि ऐशी गुरुकृपा हे फळली । आपुलें स्वरूप पाहतां कल्पनाचि हे गळाली । अनुभवतेजामाजी देहबुद्धि हे जळाली । निरंजनीं दिपवाळीची दीपमाळी पुंजाळिली ॥ १ ॥ ज्ञानदिठीं पाहूं जातां झाला संसारचि लटका । सत्तारूप कळों आलें तंव तंव यत्नातुनि सुटका । बंधाची ती दोरी तुटली तंव झाली कीं हे सुटका । गैबाचि हा प्याला प्यालों पूर्णप्रेमाचा घुटका ॥ २ ॥ इंद्रियें हीं शोधूं गेलों तंव हारपली साक्ष । अधोर्ध्व टाकितां हें मौन आलें कीं प्रत्यक्ष । विहंगम उडों गेला तंव मोडले पक्ष । असो कीं हें देह नसो सोहिरा झाला अलक्ष ॥ ३ ॥

पद ७ वें.

असें वाचे बरें बोल । रामरंगीं डोल ॥ ध्रु० ॥ जीवरूप हा शिवपदीं पावाया । अनुभव एक सखोल ॥ १ ॥ देहभावासी या

विवशी येउनी । चित्त स्वरूपीं वेधेल ॥ २ ॥ मायाजाळ हें मिथ्या भावोनी । चैतन्य एक निवटेल ॥ ३ ॥ सकळ मनोगम हारोनी आराम । निलय तें सोहिरा समजेल ॥ ४ ॥

पद ८ वें.

अहंकार हा मुंडा, कल्पना हिजडीसंगें नाचे चहूंकडे ॥ध्रु०॥ नारी ना पुरुषावीण हिजडियेचें रूप । अविवेक मुखें करी विषयीं आलाप ॥ १ ॥ विचाराची दाढी बोडुनी दावी सुरेखपण । म्हणोनि सज्जनीं तें न देखावें आपण ॥ २ ॥ स्थिरभूमिं हिजडियेच्या पाय न धरे निका । धरों जातां मुंडा ठोकी भेदाचा हा घुमका ॥ ३ ॥ सर्वांगीं हिजडी न्हेसे वासनेचें लुगडें । द्वेषाचा दक्षिणांगीं पदर सोडिला मुंडें ॥ ४ ॥ प्रवृत्तीचे पाठीवरि तृष्णेची हे वेणी । नेत्रद्वारें पाहुं जातां घालिते गवसणी ॥ ५ ॥ हिजडियेचे कानीं अनर्थाचीं तानवडें । पाहूं जात्या महामोहें मोहुनीच पाडी ॥ ६ ॥ इंद्रियांच्या द्वारीं गुंतुनि पाडीसी कां अलक्ष्या । लोभ टाकुनि झडकरेंसी चल चल दे भिक्षा ॥ ७ ॥ दान धर्म व्रतें आम्हा दाणे म्हणति नका । आशेचा खीण न पाहतां दृश्यपैसा टाका ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे दे परता जाउं दे खटपट । निघोनि गेलिया आहे समाधीच नीट ॥ ९ ॥

पद ९ वें.

आगमनिगमपदसार ॥ ध्रु० ॥ पाहे न पाहिलें, सेवी न सेविलें । जेथ वसे मनोहर ॥ १ ॥ प्रकाश प्रकाशक, नित्य नवें कौतुक । होती तीन्ही लोक, एकाकार ॥ २ ॥ तें सुख बोलतां, बोल अबोलता । होउनि राहे सुंदर ॥ ३ ॥ शास्त्रसमूहेंशीं, साभासादिक । पहुडे अमरगणांतर ॥ ४ ॥ निजसुखखाणी, देख निठोरपणीं । सोहिरा म्हणे मिळुनि, असा सादर ॥ ५ ॥

### पद १० वें.

आजी म्यां सुखी झालोंचि सये हो! ॥ ध्रु० ॥ निरालंबीं पडली हे मिठी । कांहिं केलिया दिठी परतोनि नये हो! ॥ १ ॥ चित्कलिका विकासली । जाहला चित्सूर्य उदय हो! ॥ २ ॥ निरंजन नित्यानंद । निर्गुण निर्मळ निरामय हो! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निजधामीं । अनामीं गेलेंचि हें मन विलया हो! ॥ ४ ॥

### पद ११ वें.

आजी हा जीव ब्रह्मानंदीं रमला रे! ॥ ध्रु० ॥ संदेहीं न पडतां, देहीं पाहतां, विदेही मी हा गमला ॥ १ ॥ दिनमान, नाहीं कीं दिव्यमान, तेजें अभिमान, सहज दमला ॥ २ ॥ आंगीं चिन्हें उमटलीं कैशीं, कीं पुन्हा नये ऐशीं, गुन्हा सकळ खमला ॥ ३ ॥ जैसे सतीप्रति कांपती, कीं जन भूपती, तैशीं इंद्रियें जपती, अमला ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा भूतीं कीं भरला, भरोनि उरला, जवळ दुरला, न कळे मला ॥ ५ ॥

### पद १२ वें.

आतां ओळखीं चिन्मात्र । अभिमान सोडीं मात्र ॥ ध्रु० ॥ मिथ्या माया मृगजळ, लटिकें कुळगोत्र ॥ १ ॥ संसारीं राहणें, जसें जळीं पद्मपत्र ॥ २ ॥ याला कासया धुंडिसी, बहुत नलगे मंत्रतंत्र ॥ ३ ॥ पहा शरीर शोधुनी, कवणें घडियेलें हें यंत्र ॥ ४ ॥ याला चाळविता कवण, याचें कोणाहातीं सूत्र ॥ ५ ॥ वाद्यावीण वाजतें, अनाहत कीं वाजंत्र ॥ ६ ॥ सोहिरा म्हणे जा तेथ, जेथ दिवस नाहीं रात्र ॥ ७ ॥

### पद १३ वें.

आतां काय मी हो बोलों ? । कीं उगा आनंदेंचि डोलों ॥ ध्रु० ॥ दिठी गेली हे परतोनि नये । सांगों येतां बुडाली सये ॥ १ ॥

आनंदहीन राहाणें । हें वर्म ज्याचें तोचि जाणे ॥ २ ॥ सोहिरा म्हणे पाहूं गेलों, गेलेपणही विसरलों ॥ ३ ॥

पद १४ वें.

आतां चिंता ते कायसी । निजसुख धरीं आपैसी ॥ ध्रु० ॥ सदैव निजउल्हासीं । राहोनि हरिं हें माया विवशी ॥ १ ॥ कांहीं कल्पूं नका मानसीं । स्वेच्छा विचरतो हृषिकेशी ॥ २ ॥ भक्तांचिया काजा । धांवणें लागे अधोक्षजा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे करणें धरणें । अवघें देवाहातीं होणें ॥ ४ ॥

पद १५ वें.

आदि नाहीं अंत । तोचि आपुला सिद्धांत ॥ ध्रु० ॥ पाहतें पाहणें जेथ विसाव्या आलें । उन्मनीं रिघालें मन कीं हें ॥ १ ॥ आकाशाचा डोळा, चिन्मय सर्वांगचि झाला । मजमाजी देखिला नाहीं कोणी ॥ २ ॥ मीचि मजला नुरें जागा, दुजा उरे तेथ कें गा ! । सोहिरा म्हणे हें सहज, निजवर्म बुझों कीं गा ! ॥ ३ ॥

पद १६ वें.

आनंद जिरला । चिन्मयबोध मुरला ॥ ध्रु० ॥ नाहीं एक दुजेपण, आपेंचि आपण ॥ १ ॥ आपणही नसेल, तेंचि काय असेल ॥ २ ॥ असलेपणही नासलें, मज म्यां ग्रासिलें ॥ ३ ॥ नकळोनियां कळलें । कळलेंपणही गळलें ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे दावूं कसें । तुला काय दिसे ॥ ५ ॥

पद १७ वें.

आनंदमय असो कीं चित्त हें ॥ ध्रु० ॥ दृश्यभास हा नाश पावे । घडिघडि यावर मन जें धांवे । परतुनि मुळिलें वळिलें

व्हावें । समाधिसुखिं अवचित हें ॥ १ ॥ स्थावर जंगम भूतग्राम । नानालीला रूपनाम । आंतुनि खेळवी शरीरचाम । आहे नाहीं हरिविरचित हें ॥ २ ॥ सर्वव्यापक अनंताला । प्राण्या स्मर तूं भगवन्ताला । तद्रुप मानी जीवजंताला । तुज सांगतों कर हित हें ॥ ३ म्हणे सोहिरा तारक स्वामी । लय लागों त्या आत्मारामीं । ज्ञानकळा हे अंतर्यामीं । सदांचि सावचित हें ॥ ४ ॥

पद १८ वें.

आनंदलें बहु मन हें ॥ ध्रु० ॥ करितां अंतररूप तर्मन हें । प्यालें प्रेमाचा पर्जन्य हें । केलें विवेक उपर्जन हें । ऐकुनि अनाहत घनगर्जन हें ॥ १ ॥ भवांतूनि निघालें । केवळ महाशून्यीं रिघालें । ब्रह्मबोधेंचि धालें । झालें उपशमदम उन्मन हें ॥ २ ॥ व्यतिरेकें रिझालें । केवळ अन्वयावरि आलें । चैतन्यीं तद्रूप झालें । न करी पुनरपि आगमन हें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे हें निश्चळ । समाधिसुखेंचि क्रमितें वेळ । पाहुनि भगवंताचा खेळ । कीं आश्चर्यवत् जनवन हें ॥ ४ ॥

पद १९ वें.

आपेंचि लागली जेथ उन्मनीनीज ॥ ध्रु० ॥ संकल्प हा त्यजिला । त्यजुनी नीजगुज बूझला ॥ बुझुनी निवांतचि निजला । करोनि तन्मय शेज ॥ १ ॥ मनबुद्धि ऐक्य घडलें । सुषुम्नेसवें भिडलें । दशवें द्वार उघडलें । समूळेंशीं संसारा या पडलें पूज ॥२॥ सोहिरा म्हणे आलें मौन्य । शून्यामाजी गेलें शून्य । उरलें हें चैतन्य । निरालंब सहज ॥ ३ ॥

पद २० वें.

आमुचा येथ अपराध काय । आंगीं भरलें निरामय । जो इंद्रियें चाळवी, त्याणें धरिली आपुली सोय ॥ ध्रु० ॥ डोळा झाला

ब्रह्मरूप । वाचा करिते आलाप । मनासि घडला हाचि जप ॥१॥ इंद्रियातें उपेक्षुनी । धारणा हे रक्षुनी । गेला आपुलें मूळ लक्षुनी ॥ २ ॥ ज्ञानवैराग्यें हा आगळा । भवीं असोनि वेगळा । झाला अभिमान हा पांगळा ॥ ३ ॥ नको पाहूं देहाचि चाल । दृष्टि करोनि सखोल । घ्यावें तुम्हीं अनुभवाचें बोल ॥ ४ ॥ ऐसें कवणें केलें कवण जाणे । सोहिरा म्हणे मीं हें नेणें । पदरीं बांधिलें अविनाश देणें ॥ ५ ॥

पद २१ वें.

आम्हीं नहों हो पांचांतले, नहों पंचविसांतले । एवढ्यांलाही वळखोनियां, वेगळे आम्हीं आंतले ॥ ध्रु० ॥ सत्त्व रज तम आम्हीं, नहों त्रिगुणांतले । केवढाही प्रपंच केला, तरि नहों आम्हीं त्यांतले ॥ १ ॥ आम्हीं नहों हो मंत्रांतले, नहों हो तंत्रांतले । बहुत बोलुनि काय, आम्हीं नहों मायेच्या यंत्रांतले ॥ २ ॥ आम्हीं नहों हो लक्षांतले, नहों हो पक्षांतले । सोहिरा म्हणे अनिर्वाच्य, आम्हीं केवळ अलक्ष्यांतले ॥ ३ ॥

पद २२ वें.

आरंभ रंभःस्तंभ निरालंब स्वयंभचि झालों ॥ ध्रु० ॥ मूळ आलें हातां पाहतां पाहतां, आंतचि निमालों । सोऽहंबीज, निजगुज । बुझोनियां ठेलों ॥ १ ॥ संगचि सोडी, आत्मा आवडी, झाली हे जोडी । मनाच्या ओढी, अनेक मोडी, लागलि हे गोडी ॥ २ ॥ सोहिरा म्हणे सये तन्मय, मुरलें उरलें चिन्मय । आपणा गांठी, पडली मिठी, दिठी परतोनि नये ॥ ३ ॥

पद २३ वें.

आरंभ रंभःस्तंभ सदा निरालंब जागला ॥ ध्रु० ॥ सज्जनरंजनीं नित्यनिरंजनीं, ध्यासचि लागला । त्रिकूट श्रीहाट गोल्हाट,

औटपिटीं विरागला ॥ १ ॥ आनंदडोहीं बुडाला, आठव नाहींच मागला । ज्याचिये सत्तेचा हाट, इंद्रियांचा नव्हेचि पांगला ॥ २ ॥ सोहिरा पाहूं गेला, तईंच निमाला । ब्रह्मरसें धाला, नाहीं उमगला ॥ ३ ॥

पद २४ वें.

आलों संसारीं आम्हीं करावया सेवा ॥ ध्रु० ॥ भावातीत निखिल निरंजन निर्विकार या निर्गुण देवा ॥ १ ॥ सर्वही सोडुनी प्रपंच, हा घेउनी बैसलों निजधनठेवा ॥ २ ॥ श्रवणमनननिदिध्यास तुजशीं ध्यातों निशिदिनिं दयार्णवा ॥ ३ ॥ नको हे जन नलगे भोजन खाउनि बैसलों हाचि मेवा ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे तुज आनादिसिद्धा गोसाविया महानुभावा ॥ ५ ॥

पद २५ वें.

आहे तेवढें बरें । जरि का कल्पना मुरे ॥ ध्रु० ॥ वनिंचिया तरुवरां । शिंची कोण तरी निरा । सहज हालती समिरें ॥ १ ॥ संचित क्रियमाण । पहिलें बांधोनि प्रमाण । देह धरिलें गिरिधरें ॥ २ ॥ ज्याचा तोचि कर्ताहर्ता । नसता अभिमान धर्ता । म्हणउनि जीव हें नाम उरे ॥ ३ ॥ प्रपंचपरमार्थाला । नाणी द्वैत अभावाला । सोहिरा जाणे अंतरें ॥ ४ ॥

पद २६ वें.

उघड कीं हा चाळवितो । कान डोळा हालवितो । दृश्यदिवा मालवितो ॥ ध्रु० ॥ ब्रह्मरूप झाली दृष्टी । मुखें निघती त्याच गोष्टी ॥ १ ॥ आंगचि झालें निरंजन । मन हें झालें

उन्मन ॥ २ ॥ सूत्र धरोनि उभी माउली । हे काया खेळवि बाहुली ॥ ३ ॥ सकळ भरलें तत्त्व निरीं । जगबुद्‌बुद् हें तयावरी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे हेंचि धन्य । हेंचि आंगीं भरलें चैतन्य ॥ ५ ॥

पद २७ वें.

उन्मनीनीज सहजोंचि मज लागली ॥ ध्रु० ॥ चिन्मयें धालों, पुढील विसरलों । आठवण नुरे मागली ॥ १ ॥ ब्रह्मबोधें आपेंचि हे । चित्तवृत्ति विरागली ॥ २ ॥ तन्मयदीपिका लावोनियां । कवण नेणों हे जागली ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे जागतां निजली । परतोनि ना उमगली ॥ ४ ॥

पद २८ वें.

उन्मनी हे लागली ॥ ध्रु० ॥ चित्तवृत्ति हे विरागली । ना आठव मागली ॥ १ ॥ तन्मयेशीं जागली । चिन्मयसुखीं निजतांना उमगली ॥ २ ॥ कल्पना उल्लंघिली । कवणें नेणों भोगिली ॥ ३ ॥ हे रूपाविण चांगली । सोहिरा म्हणे न सांगोनिया सांगिली ॥ ४ ॥

पद २९ वें.

उमज दशवें द्वार । निरंतर नांदे सत्रावी नार ॥ ध्रु० ॥ नादाचा नाद । जहीं निजसुखस्वाद । सुषुम्नेवरी होय अनाहत गजर ॥ १ ॥ इडा, पिंगळा, प्राण रोधुनी सेवीं । अखंडित वाहे आकाशीं नीर ॥ २ ॥ ककार खिडकी उघडुनी, नादबिंदु भेदोनी । सुखेंचि सुख हें भोगीं, उन्मनी अरुवार ॥ ३ ॥ अहं-सोहं सकट, भरोनियां घोंट । आपेआप निघोट निजींच निर्भर ॥ ४ ॥ सोहिरादास म्हणे, स्त्री पुरुष नपूंसक । विना चौथें देख हें निराकार ॥ ५ ॥

### पद ३० वें.

ऐशी कवणाची कवण ती । मज खुणाविती हे ॥ ध्रु० ॥ मेरूचे वरती । चंद्रसूर्याचे परती । तेथें दिवस ना राती ॥ १ ॥ हात देउनि केधवां । नेणों दृश्याचा हा दिवा । मालविते हेवा ॥ २ ॥ काढुनि भेदाचें जोडवें । परे पैलाड पडावें । तेथें आनंदें क्रिडावें ॥ ३ ॥ वासना लुगडें । फेडुनि व्हावें कीं उघडें । सुख बोलतां कानडें ॥ ४ ॥ नेदी विकाराचें कांकण वाजो । म्हणे अति गुह्यें निजों । परतुनि मागुतीं न उमजों ॥ ५ ॥ सोहिरा म्हणेना व्यभिचार । आंगीं बोधाचा संचार । योगी जाणती चतुर ॥ ६ ॥

### पद ३१ वें.

ऐसें काय मिळालें कळेना ॥ ध्रु० ॥ चारी सहा त्रैलोक्य-मंडळ । शमदमीं पाहतां कोठेंचि हें आढळेना ॥ १ ॥ जें जें दिसे तें नयेचि सरिसें । कर्ताचि नासे वरि अनारिसें तें कवणाचि हें तुळेना ॥ २ ॥ मळ निर्मळ म्हणे कल्पनाचि मळवी । आपण हें मळेना ॥ ३ ॥ संसारभयें भितें मनाचि पळवी । आपण हें पळेना ॥ ४ ॥ अनुभव-तरुवरी फुलेंविण फळलें । देठाविण फळ कदाचि हें गळेना ॥ ५ ॥ जें जें दिसतें तें तें त्यानेंचि चळे । परि आपण हें चळेना ॥ ६ ॥ निखिल चिन्मयबोध मुराला । प्रकाश उरला अढळ हा ढळेना ॥ ७ ॥ सोहिरा म्हणे मज हें घडलें । थक्काचि पडलें मन हें जडलें फिरोनि कीं वळेना ॥ ८ ॥

### पद ३२ वें.

करणी तुझी अलगट ॥ ध्रु० ॥ आपुलिया पदीं प्रेम देउनी । हरिसी भवसंकट ॥ १ ॥ स्वरूपसंबंधीं देसि समाधी । नित्यसुखामृत घोंट ॥ २ ॥ सोहिरा म्हणे जहींचि विकृति । झाली मनासी तहीं भेट ॥ ३ ॥

पद ३३ वें.

करीं करुणा जगदाभरणा प्रेम निरंत ॥ ध्रु० ॥ एक बहु-पणें साम्य समावत । गुणीं असोनी गुणातीत ॥ १ ॥ वंदिन मानसें भलतशा मिषें । देखें स्वरूप रुपातीत ॥ २ ॥ करणी करु-नियां जाइल वायां । जाणोनियां मग नेणत ॥ ३ ॥ मागील पुढील कांहींच नाहीं । सोहिरा देहींच देहातीत ॥ ४ ॥

पद ३४ वें.

कल्याण केलें हो येणें । त्याला केविं उत्तीर्ण होणें । सुफळ झालें हें जिणें, पुनरपि जन्माला या नाहीं येणें ॥ ध्रु० ॥ तीन्ही लोक चळती जेणें, प्रभव प्रळय तेणें । अविनाश दिधलें देणें, त्याचें रूप कैसें तें मी नेणें ॥ १ ॥ नित्य ज्याचें नाम घेणें, आतां कांहीं नाहीं उणें । दैन्यचि पळालें भेणें, लेइलें शांतीचें हें लेणें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मन बेणें, करूनि बोधाचें केणें । देह हें वाटलें पेणें, झालें जिवा ज्ञानगंगे न्हाणें ॥ ३ ॥

पद ३५ वें.

कळतां हें चैतन्य कां वाहावें दैन्य ॥ ध्रु० ॥ एकचि निश्चय धरावें निजलय । नाहीं तयासी तें कांहीं न्यून ॥ १ ॥ प्रेमामृत हें घेउनियां रत । होउनि देखिजे सर्व शून्य ॥ २ ॥ कोठें कांहीं पाहतां नाहीं । जाणोनि उगें मग घ्यावें मौन्य ॥ ३ ॥ सोहिरा निजनिधी पूर्ण समाधी । लागुनि राहे तो येथें धन्य ॥ ४ ॥

पद ३६ वें.

काय झालें तें नयेचि सांगूं । अंतरींच भोगूं ॥ ध्रु० ॥ धृतीचा हा डोळा असतांचि, कल्पना बाहुली हे परतली । चालतां राहिली चालचि, वाचा बोलतां निमाली ॥ १ ॥ पुढिलें हें थोकलें,

योजना मोडली आठवण मागली । दृश्य द्रष्टा मनीं न गणितां, मीपण दोरीच हे काढिली ॥ २ ॥ सोहिरा म्हणे आतां हारपली मुद्रा, सहजेंचि निद्रा उन्मनी लागली ॥ ३ ॥

पद ३७ वें.

काय तरि उणें निजस्मरणें ॥ ध्रु० ॥ याही सुखाहुनि थोर । आनीं नाहीं दुजें तुळणें ॥ १ ॥ सौख्य परात्पर भावोनि तत्पर । ध्यावें हें शाहाणें ॥ २ ॥ निजघर टाकुनि दुजे स्थानीं । फासयासि फिरणें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे दृढ पैं गा ! । निजहृदयीं धरणें ॥ ४ ॥

पद ३८ वें.

काय मिळालें हें नयेचि तुका । झालों म्यां मुका ॥ ध्रु० ॥ ॐकार कुंठला, शब्द मावळला । न बोलवे अमुका ॥ १ ॥ बुद्धि विहंगिणी, संसार तरुवरि । उडों जातां समूळ मोडला डोका ॥ २ ॥ साधन नौका, नलगे तो रुका । सांपडलें फुका ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे भ्रांतितिमिर दवडुनी । तन्मय उजळुनी चिन्मय-दीपिका ॥ ४ ॥

पद ३९ वें.

काय मी सांगूं सये वो ! बोलतां नये वो ! नवलाचा हा जोगी । मुखावीण कैसी वाजवी, गैब गाजवी, ज्याची अनाहत शिंगीं । संसारीं असोनी नाहीं हो, नीट पाहीं हो, ऐसा नित्य वैरागी ॥ ध्रु० ॥ टाकुनि त्रिविध त्रिगुणी । लक्ष निर्गुणीं लावुनियां अखंड । नाशवंत ऐसें जाणुनि ध्यानीं आणुनि, त्यजीं पिंड-ब्रह्मांड । मन पवन हलाकले नेत्र झांकले, काय बोलों उदंड ॥ १ ॥ दुधामाजी घृत जैसें हो ! रुप तैसें हो ! मायेमाजीं हा गुप्त । सर्वी सर्वत्र हा व्यापक, जगन्नायक, परमानंदें तृप्त । नादबिंदु कला ज्योती, आंगीं लावुनि विभूति, परमामृतें तृप्त ॥ २ ॥ पटामाजीं

जैसा तंतु हो! आदिअंतिं हो! जैसा बीजीं हा वट। तैसा सकळ हा विस्तार, ज्याचा निरंतर, जैसा गगनीं घट। सोहिरा म्हणे तो हा ऑल्लेख, नाहीं रूपरेख, झाला मजमाजी प्रकट ॥ ३ ॥

पद ४० वें.

काय म्यां सांगों अगोचर नवल तुझें हो! ॥ ध्रु० ॥ पोकळ कर्ण, येथ नाहीं कोण। ऐकों येतें तें काय हो! ॥ १ ॥ उगीच कीं घापुडी, दिसते हे चामडी। कठीण मृदु कैंस निवडी हो! ॥ २ ॥ श्वेत भंवतें, काळें वरतें। दिठीसि कैसें दिसतें हो! ॥ ३ ॥ तेवींच जिव्हेस , दिसतें हें मांस। कवण घेतो रस हो! ॥ ४ ॥ नासिकीं केवळ, दिसतो अनीळ। कवण घे परिमळ हो! ॥ ५ ॥ देह हें झालें, ऐसें कवणें देखिलें। शेवटीं कोठें गेलें हो! ॥ ६ ॥ ययाचा कर्ता, न गवे धरितां। येथ तरि मरता कोण हो! ॥ ७ ॥ सत्ता-समाधान, जडा ना ज्ञान। तरि कवणा अज्ञान हो! ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे गेलें, मीपण नेलें। देह तरि चाले कैसा हो! ॥ ९ ॥

पद ४१ वें.

काय म्यां सांगों गे माये! नवल जाहलें ॥ ध्रु० ॥ चैतन्य-सिंधुमाजीं, सैंधवकाया ही डोले ॥ १ ॥ निर्वात कर्पुरदीपीं, प्रणवपतंग बोले ॥ २ ॥ आकाशावरि जळ त्यावरि कमळिणी खोले ॥ ३ ॥ हात नाहीं पाय, ऐसे भ्रमर गुंतले ॥ ४ ॥ नामचि नुरतें केलें, लया आमोदें नेलें ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे हें आंगाथिलें, तें रूपाविण देखिलें ॥ ६ ॥

पद ४२ वें.

काय सांगूं सये! बोलतांचि नये। ज्या सुखालागोनी ॥ ध्रु० ॥ चोरुनि नेलें विश्वचि, येतां उरला ना मागोनी। तन्मय-शेजे पराप्रमदा, निमाली भोगोनी ॥ १ ॥ सोहिरा म्हणे आतां

तूर्यंत जागोनी लागोनि उन्मनी । निजलों निरंजनीं जागणें त्या-लागोनी ॥ २ ॥

पद ४३ वें.

कांहीं नाहीं जेथ तेथ झालें, रूपा आलें हो ! ॥ ध्रु० ॥ अनादि हा अरूप, साक्षि जैसा दीप । तेथुनियां नाम रूप, एकेक निघालें हो ! ॥ १ ॥ जितुकें चराचर, दृष्टिसि गोचर । आंत अगोचर, चैतन्य रिघालें हो ! ॥ २ ॥ विस्मरतां सोहं, उठलें हें कोहं । देहबुद्धि अहं, विषयीं हें लाधलें हो ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे हृदयीं प्रकाशलें, पूर्ण ज्ञानकमळ विकासलें । दिसलें जें भासलें, तेंचि मुखें गालों हो ! ॥ ४ ॥

पद ४४ वें.

कैसा विसरूं मी तयासी । तो आहे मजपाशीं ॥ ध्रु० ॥ जरी निर्जीवां देऊं मी देवपण । तरी इंद्रियें चाळवितो कवण ॥ १ ॥ देहचि प्रमाण मानिलें । तरी उत्पन्न कोठुनि झालें ॥ २ ॥ निद्रेंत देहा नाहीं स्मरण । यातें जागवीतो कोण ॥ ३ ॥ एकमेक दिसे अनेक । लाघवी नगरनायक ॥ ४ ॥ नाशवंत चराचर । तो अवि-नाश अगोचर ॥ ५ ॥ विषद बोध हा विद्गत । सकळभूतहृद्गत ॥ ६ ॥ लागली हे तयाची भक्ति । सृष्टि उत्पन्न जेथुनी होती ॥ ७ ॥ सोहिरा म्हणे नाहीं दुरी । व्यापक सत्ताधारी ॥ ८ ॥

पद ४५ वें.

गोवर्धनधारी वाचे बोल रे ! ॥ ध्रु० ॥ सनक सनंदन देव सुरवरां । ज्याचें स्वरूप सखोल रे ! ॥ १ ॥ पाहीं चराचरीं एक अनेक । पार उतारी भव पैल रे ! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निजदेहीं सुखामृत । सेवुनि आनंदें डोल रे ! ॥ ३ ॥

### पद ४६ वें.

घेईं सुख दुर्लभ मानुनि लाभ ॥ ध्रु० ॥ सुगम समागमीं, चालतां आगमीं । सांडोनियां महि डिंब ॥ १ ॥ रम्यपर्णीं मग देख प्रयाग । पूर्ण निरें भरे कुंभ ॥ २ ॥ स्नान करोनि कलिमल विलयांगीं । शमेल अनळ डोंभ ॥ ३ ॥ शांतपणें जहीं समीर-प्रवाहीं । होउनियां स्वयंभ ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे पुढें, अहं मी हें नातुडे । मिळोनि अवाचिक नभ ॥ ५ ॥

### पद ४७ वें.

चालवितो कुडी हे तयाची गोडी लागली ॥ ध्रु० ॥ होउनी उदास, विषयांची आस त्यागिली ॥ १ ॥ विसरला आपण, आठवण ना मागली ॥ २ ॥ सोहिरा म्हणे, सहजनिद्रा हे मुद्रा चांगली ॥ ३ ॥

### पद ४८ वें.

चिदानंदींचा ऐसा राजा । सदोदीत भोगी निजभाजा । काय वानूं मी त्याच्या साजा । पाहिं पाहिं तेथील नवल वोजा ॥ ध्रु० ॥ मन हारोनि झालें मनोहर । तेचि शोभती अतिरहंवर । महिभ्रमणीं बोध नित्य स्वार । पंचतिसांसि एक सरदार ॥ १ ॥ अनिज सांडुनी निज सोहंबीज । तेचि झुलती महा मतंगज । कामधेनु दुभे दिवससांज । रवी आगळा तेथ तेजःपुंज ॥ २ ॥ ज्याच्या मंदिरा चाऱ्ही दरवाजे । चोपदार चाऱ्ही उभे ठेले जे । शब्द निःशब्दीं मंत्री बैसला जे । अनाहत भेरी नित्य वाजे ॥ ३ ॥ उन्मनीचें सतत ज्यासी स्थान । तेथ हारपलें देहभान । तेथ सहज-निजीं निजोन । सोहिरा झालाचि तेथ लीन ॥ ४ ॥

पद ४९ वें.

चिन्मयमोतीं हें मज आलें, देहभान गेलें । सांग काय पां उरलें? लयलक्षचि मुरलें ॥ ध्रु० ॥ सांपडला हा अनुभव, हरले भावाभाव । आपेंचि गळाली हे माव, उजळला स्वयमेव ॥ १ ॥ अवचटेंचि म्यां निघालों, कोठें नेणों गेलों । पाहतां पाहतां निमालों, सहजींच सामावलों ॥ २ ॥ सोहिरा म्हणे हा सुखलाभ । मीनलाचि स्वयंभ । पराप्रमदावल्लभ, स्वयंभारंभःस्तंभ ॥ ३ ॥

पद ५० वें.

चिन्मयसुखेंचि आम्ही झालों समाधान ॥ ध्रु० ॥ मजमाजी सहजेंचि देखिलें निधान ॥ १ ॥ आवडे तेव्हां भोगावें विधि ना विधान ॥ २ ॥ सोहिरादास म्हणे ज्ञानेशीं हरलें विज्ञान ॥ ३ ॥

पद ५१ वें.

छंद लागला हो अखंड श्रीनाथजीचा ॥ ध्रु० ॥ सहज हरिख जेथ नाहीं रूपरेख । तो हा देख गोरखनाथजीचा ॥ १ ॥ मन-मोहन गहन सज्जनरंजन । अलख निरंजनजीचा ॥ २ ॥ निःसंग निष्काम कल्पद्रुम हा आराम । सहज आत्माराम नाथजीचा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे भोगी ना त्यागी अनाहतशिंगी । विराजे राजयोगी जोगीनाथजीचा ॥ ४ ॥

पद ५२ वें.

जग मग ठेंगणें ठेंगणें । स्वरूपीं पूर्ण होणें ॥ ध्रु० ॥ अहं हें सोडुनी घेणें । सहजगतीचें ठाणें ॥ १ ॥ कर्ता करविता तो जाणे, घेई परतत्त्वाचे खुणे ॥ २ ॥ देहालागीं निराळें होणें । जीवनीं जैसें कमळ आलाणें ॥ ३ ॥ पहा हें स्थूळ अस्थिर पेणें । जाणुनि

ब्रह्मीं सदोदित असणें ॥ ४ ॥ विकल्पविरहित असणें । सोहिरा म्हणे अघडित घडणें ॥ ५ ॥

पद ५३ वें.

जगीं तूं धन्य एक ॥ ध्रु० ॥ देहपण विषयांसी आभारिलें । धरिसी ययांशी वेगळिक ॥ १ ॥ सारासार हें जाणुनिया निकें । न धरिसी हा भवशोक ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग नाहीं जन्ममरण । काय सांगों अलौकिक ॥ ३ ॥

पद ५४ वें.

जन्मा आलियाचें काज हो! । झालें आज हो! सांपडलें हें मूळ । कोठील कोण हें पाहतां, तेथ राहतां, जया याती ना कूळ । येणेंजाणें नाहीं जयासी, जैसें गगनासी, वरि मायेचा खेळ । टाकुनी सकळिक बोलणें, नित्य डोलणें, ब्रह्मानंदीं केवळ ॥ ध्रु० ॥ सर्वीं सबाह्य हा व्यापक, सुखदायक, जया आदी ना अंत । देहीं असोनिया नाहीं हो! कळा पाहीं हो! ऐसा गैब अतीत । पाहणें परतोनि पहा हो! तेथ राहा हो! जो कां महा महंत । त्रिभुवनींचा राजा हो! स्वामी माझा हो! भेटला भगवंत ॥ १ ॥ आतां करणें कांहीं नलगे पूजा हो! देव दुजा हो! कीं हें अनादि बीज । कळोनि आलें हें मनाला, नकळे जनाला, निरंजनीं रीझ । लागोनि गेला हा सत्य हो! होंचि नित्य हो! निजीं लागली नीज । बाहेर आंत प्रकाश पडला, मोहांधःकार दडला, हा सहज ॥ २ ॥ उफराटा रोंक हा दृष्टीचा, नाश सृष्टीचा, झाला परमप्रकाश । चिदाकाशिंचा दिनमणि, ज्ञानकमळणी, झाला परम विकास । सिद्धांताचा सेवुनि चारा स्वच्छंद, झाला

आनंद, प्रपंच दिसला सद्गुरुकृपा या नांव हो! महानुभव हो! म्हणे सोहिरादास ।। ३ ।।

पद ५५ वें.

जिवलग भेटला । जीवनप्रेमें आलिंगिला ।। ध्रु० ।। अनादि निजशक्तीशीं प्रवृत्तिसंगाला । लागुनि जो मुळींचा हारपला ।। १ ।। समदृष्टिं अवलोकुनि, पहिलें उत्पत्ति गुण हारोनि । पूर्णतत्त्वें ओळखिला ।। २ ।। बाह्य नादाला सद्रदुनि आला । ब्रह्मरंध्रस्थानीं श्रवला, अनाहतनादाला ।। ३ ।। त्रिविध तीन्ही अवस्था देखुनि । चौथे तूर्यपदासि येउनी । सेजे उन्मनि पहूडला ।। ४ ।। देहीं देहातीत होउनि, प्रवृत्तिनिवृत्तिला भावोनी । सोहिरा निज-लक्षासि आला ।। ५ ।।

पद ५६ वें.

ज्या मनानें निजीं भोगियलें सुख ।। ध्रु० ।। मजमाजी मी-पणा नुरेचि देखणा । सर्व हरिलें भवदुःख ।। १ ।। मूर्तीतीत अमूर्त परात्पर । भावोनियां तें ऑलेख ।। २ ।। सोहिरा म्हणे निज हेंचि काज । देखोनियां तें अदेख ।। ३ ।।

पद ५७ वें.

झाला ब्रह्मबोध लागली समाध ।। ध्रु० ।। सुषुम्नेच्या छिद्रीं । स्थिरावलों ब्रह्मरंध्रीं । भेदोनियां नादबिंद ।। १ ।। मना वाचे नाकळे । ऐसें देखिलें निराळें । रूपावीण हें अगाध ।। २ ।। सोहिरा म्हणे काय वानूं । हारपलें देहभानू । सद्गुरु भेटला हा सिद्ध ।। ३ ।।

### पद ५८ वें.

झाला हो झाला आनंद आजी ॥ ध्रु० ॥ इंद्रियां दमन, करोनि त्रिकुटीं गमन, होतां योगाचें शमन, नेणों काय झालें मन ॥ १ ॥ लागतां खेंचरीमुद्रा, उल्हास हा चित्समुद्रा, पिउनि अर्धचंद्रा, आली सहजनिद्रा ॥ २ ॥ चंद्रसूर्यबिंब, ग्रासुनियां प्रतिबिंब, सदा स्वयेंचि स्वयंभ, विकासला निरालंब ॥ ३ ॥ बारा सोळा आकळा, अनुभव हा मोकळा, जीवशिव हे न कळा, सेविली सत्रावी कळा ॥ ४ ॥ तूर्या हे भोगुनि गेलों आंतचि विरागुनी, नये कल्पना मागुनी, लपटों उन्मनि लागोनी ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे ज्ञानगंगास्नान, झालें गुरुचिये दयेन, जेथ न पवति नयन, तेथ झालें शयन ॥ ६ ॥

### पद ५९ वें.

झालें हो समाधान । गुंतोनि कोठें नेणों ठेलें हें मन ॥ ध्रु० ॥ त्रिकुटाचे वाटे, उघडोनियां द्वारिवटें । भेटे आलों कोण नेणो कोठें अवचटें ॥ १ ॥ पुढली कीं हे मागली, नेणों कैंची चांगली । अतर्क्यचि लागली, निद्रा हे सहज ॥ २ ॥ जन्म नाहीं मरण, जेथ व्यक्ति नाहीं वर्ण । सोहिरा सच्चिदानंदीं आजी पूर्ण ॥ ३ ॥

### पद ६० वें.

झालें हो ! सुख चिन्मय बाई ॥ ध्रु० ॥ भाव हरला, बोध मुरला, प्रकाश उरला । सांगों म्या कायी ॥ १ ॥ रूपरेखेविण मीनलें बाळक । अहं ओंवाळुनि घेऊं बलाई ॥ २ ॥ सोहिरा म्हणे आतां मिळणें ओंवाळणें । हारुनी मी मज उरलें नाहीं ॥ ३ ॥

### पद ६१ वें.

झालों समाधान आज जेथ मी ॥ध्रु०॥ विश्व चाळवितो हा। व्यापक गुप्त पहा ॥ १ ॥ सकळ मायेचें व्याप्त । यांत जो अलिप्त ॥ २ ॥ नाहीं मन जन । ऑलख निरंजन ॥ ३ ॥ नाहीं रूपरेख । गगनासारिखा देख ॥ ४ ॥ गगन म्हणों तया । जाणीव जाय लया ॥ ५ ॥ अवधूत हा नंगा । ज्याची सत्ता जगा ॥ ६ ॥ किती झांकूं डोळे । प्रत्यक्ष देह चळे ॥ ७ ॥ देह पावेल नाश । सोहिरा म्हणे अविनाश ॥ ८ ॥

### पद ६२ वें.

तरी अघटित हें घडलें । चित्त स्वरूपीं जडलें ॥ ध्रु० ॥ क्रोध–शांतिरूपें एक होउनि । व्याघ्रधेनूशीं जहीं सख्य पडलें ॥ १ ॥ ममताभास अदृश्यीं मिळोनि । गरुडपिच्छांवरि व्याळ क्रिडलें ॥ २ ॥ लोभ मतंगज पंचपंचाननीं । भेटोनि खेंव दिधलें ॥ ३ ॥ पूर्ण जळामध्यें काष्ठ हुताशीं । पां ! हें प्रज्वळलें ॥ ४ ॥ सोहिरा निजमहितळीं राहोनी । रवि–चंद्र आकळिले ॥ ५ ॥

### पद ६३ वें.

तरि देवचि होईल प्राणी । जें कां शाश्वत ध्यानीं आणी ॥ ध्रु० ॥ विहंगम हा आकाशीं पाखाणी । दृष्टिसी सृष्टि दिसे हे उखाणी । शून्याआंत चाऱ्ही खाणी । ईश्वराचें नवल हें वाखाणी ॥ १ ॥ वाणी टाकील ओंगळवाणी । नामसुधारसें रंगली वाणी । ऐकतांचि हे कौतुकवाणी । पावे निरंजन निर्वाणीं ॥ २ ॥ होईल प्रसिद्ध शास्त्रपुराणीं । निजकळा अनादि पुराणीं । अवघी केली विकारचुराणी । सोहिरा म्हणे प्रकटे तूर्याराणी ॥ ३ ॥

### पद ६४ वें.

तरि म्या कैसेनि हो! पांगला ॥ ध्रु० ॥ बद्धता मुक्तता म्हणे हा कवण ? मी पाहूं जंव गेलों, लागचि ना लागला ॥ १ ॥ आदिं पाहूं गेला, अंतींही विसरला । नाहींच उमगला ॥ २ ॥ सोहिरा म्हणे आतां । ज्ञान अज्ञान हें न बोलतां । उगा राहिलों चांगला ॥ ३ ॥

### पद ६५ वें.

तरि सार्थक हेंचि करावें । सदैव आत्मस्वरूप स्मरावें ॥ध्रु०॥ मानूं नये हें आवरावें । चैतन्य सर्वसमान धरावें । विश्रांतिकळेला वरावें । पुनती जन्मुनियां न मरावें ॥ १ ॥ अनादि भूमिके स्थिरावें । मन हें गगनामाजि जिरावें । सर्व नासुनि जें कां उरावें । तेंचि कीं हृदयीं भरावें ॥ २ ॥ सोळा अतीत सतरावें । त्या परब्रह्मकशीं उतरावें । ब्रह्मरंध्रीं भितरावें । हा संसारसमुद्र तरावें ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा नलगे फिरावें । जेथील तेथ मुरावें । देहभान विसरावें । हेंचि वांच्छित मनिंचें पुरावें ॥ ४ ॥

### पद ६६ वें.

तरि होय परम संतोष मनाला ॥ ध्रु० ॥ हृदयभुवनीं असे आत्माराम, मनचि होइल जरि निष्काम । येथलें येथाचि असे आराम । दूरी कोठें जाणें नलगे वनाला ॥ १ ॥ मन हा मयूर कीं आनंदें नाचे । नाना कलख करणें वाचे । अंतरीं स्मरतां स्वरूप साचें । अनाहत गर्जत गुप्त घनाला ॥ २ ॥ म्हणे सोहिरा भगवान् अगोचर । व्यापुनि उरला सकळ चराचर । लावुनि पाहतां मुद्रा खेचर । उपरमसी गगनाला ॥ ३ ॥

पद ६७ वें.

तरी होय स्थीरासन अचळ मनाचें ॥ ध्रु० ॥ साधनाचें आराधनाचें, इंद्रियवृत्ति निरोधनाचें । फळ हें यावें सुफल व्हावें दर्शन ज्ञानघनाचें ॥ १ ॥ चारी खाणी चारी वाणी, गगन पवन महि तेज पाणी । भगवत्सत्ता ध्यानीं आणी, अवचित करि गमनाचें ॥ २ ॥ म्हणे सोहिरा चालत प्रवृत्ति, सकळहि व्यावृत्ति निवृत्ति होउनी । चित्तवृत्तिला अर्धमात्रा औषध हें दमनाचें ॥ ३ ॥

पद ६८ वें.

तुज कोणतरी गाय हरि ॥ ध्रु० ॥ सद्रूपभास हा अम्मल शोषणी । देती झुल्लत झुलरी ॥ १ ॥ चिद्रूपसागरीं आपुलिया भरीं । आपेंचि येती लहरी ॥ २ ॥ आनंदात्मया ब्रह्मांडींहुनि । बोलवी निजवैखरी ॥ ३ ॥ स्वरूपीं संभावुनि ज्योति प्रकाशुनि । सहज सोहिरा देहधारी ॥ ४ ॥

पद ६९ वें.

तुझी अघटित करणी । बोलणी हीच उणी ॥ ध्रु० ॥ आपेआपण दृश्य प्रकाशक । देखों दिला जे तरणी ॥ १ ॥ अविनाश तूं नाशिवंत हें । देह जननमरणीं ॥ २ ॥ आत्मानुभवीं माया अवयव । हरिसी संसरणी ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे जहीं एकीं अनेक । भावोनि लागें चरणीं ॥ ४ ॥

पद ७० वे.

तुझी दया हो! देवा ॥ ध्रु० ॥ लटिकी केली काया । निरसली हे माया । मन गेलें विलया । तुजशीं चिन्मय निरामया ॥ १ ॥ काया बेगडिची बाहुली । गमली अभ्रींची सावुली, ऐसी अविनाश माउली ॥ २ ॥ जगबुद्बुद् नीरा वीतराग वैराग्यागरा । सोहिरा म्हणे अजरामरा ॥ ३ ॥

पद ७१ वें.

तुझिया स्वरूपीं हें मन सुखावलें हो ! ॥ ध्रु० ॥ आकारातीत निरंतरा तूं निर्गुण निराकारा ॥ १ ॥ परात्पर प्रेमातीता अकल्पकल्पद्रुमा ॥ २ ॥ सदसतसत्ता देवा तूं प्रबुद्धवनवसंता ॥३॥ सोहिरा म्हणे दीनबंधु परमामृतसिंधु ॥ ४ ॥

पद ७२ वें.

तें तूं पाहीं परब्रह्म आपुले ठायीं । निरंतर त्याचाचि ध्यास वाहीं । संतसंग यास्तव करणें कांहीं । हृदयीं असोनी कोठेंचि दिसत नाहीं ॥ ध्रु० ॥ ज्याचे सत्तेनें शरीर उपजे नाशे । ज्याच्या तेजें शशिसूर्य हा प्रकाशे । जेथें राहायाला घर केलें कीं आकाशें । ज्याला पाहातांचि कल्पना हे नाशे ॥ १ ॥ जीव झाला कोठुनि नेणें आला, शरीरसंयोगें लुब्ध इंद्रियांला । देह हें सुटल्या मग काय होय त्याला, ऐसा विवेक उत्पन्न कोठुनि झाला ॥ २ ॥ आत्मा निर्गुण निर्विकार तूंची । जें जें घडतें तें जाणसी आंतची । जन्मा आलें तें आहे कीं जातची । जें कां अविनाश असतें राहातची ॥ ३ ॥ जागृतींत जें जें दिसे ज्याला । स्वप्नामाजी आणिकचि दिसे त्याला । सुषुप्तिमाजी शून्य देखुनि भ्याला । तिहीं अवस्थांचा साक्षी कोण झाला ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे चहूं वाचांचे जें मूळ । भेद नाशी कीं द्वैताचा समूळ । आच्छादिला जेवीं मुंगी काढी गूळ । तेवीं स्वरूप व्हावें सानुकूळ ॥ ५ ॥

पद ७३ वें.

तेणें मज सहज हा हृदयीं नित्य वेध लाविला ॥ ध्रु० ॥ वैराग्य हें आंगीं वसलें । तेव्हां अवघेंचि मिथ्या दिसलें । निजरूप नयनीं बसलें । कोठें नाहीं सुख असलें । एकाएकीं जीव हा परम

विश्रांति पावला ।। १ ।। पंचमहाभूतें जहालीं । तेणें सृष्टि रूपा आली । जेणें चंद्रसूर्या चाली । नामरूपा शोभा आली । जयामध्यें तीन्ही लोक समग्र समावला ।। २ ।। इंद्रियांचीं द्वारें कोंडुनी । पवनाचे पाय मोडुनी । सर्वहि प्रपंच सोडुनी । मनाचिया वृत्ति तोडुनी । शून्य अवघें गगन फोडुनि गुप्त पंथ दाविला ।। ३ ।। सोहिरा म्हणे जंव जंव पाहें । विश्व नाहीं तोचि आहे । सर्वगत व्यापुनी राहे । तेथिला कीं ध्यास वाहे । अहंसोहं समूळ अभिमान हा दुरावला ।। ४ ।।

पद ७४ वें.

तो मी मिनलों आपुलिया उगमीं ।। ध्रु० ।। प्रपंच वाढे मोडे । परि मज विसर आपुला न पडे ।। १ ।। उठला भास पावे नाश स्वरूप निराभास ।। २ ।। देहासि या जाणे, आपुली हे लीला म्हणे । परि यासंगें नाहीं येणेंजाणें ।। ३ ।। घटमठीं अवकाश, तैसा जीव–ईश्वर हा भास । तो गेलिया उरतें हें आकाश ।। ४ ।। अवस्थात्रया, टाकुनि माया । अंतीं जाय लया ।। ५ ।। न लावितां अग्न, अजी काया केली भग्न । प्रकृति-पुरुषाचें हें लग्न, आंत सोहिरा झाला मग्न । रे ! मन भुललें ।। ६ ।।

पद ७५ वें.

त्या अगम–अगोचराचें ध्यान हें ! ।। ध्रु० ।। अपरोक्ष वस्तूचें ज्ञान । सर्वांचें निदान । उत्पत्तिस्थिति लय जेथुनि हें ।। १ ।। काया चाळिल्या सर्व वाळिल्या । सोहिरा म्हणे रूप निरंजन हें ।। २ ।।

पद ७६ वें.

देव म्हणोनि हाक मारोनि सरली । मग उरली चैतन्य-प्रभा ।। ध्रु० ।। देव म्हणोनि पाहूं जातों । शेवटीं होय तोचि

तो ॥ १ ॥ पाहणेंची पडली तुटी । तंव जीव नामाची जाहली बोभाटी ॥ २ ॥ सोहिरा म्हणे हेंचि समज । मग सुखेंचि नीज आपुल्या ठायीं ॥ ३ ॥

पद ७७ वें.

देह हें शुक्तिपणीं । टाकुनि घेई मुक्तिमणी ॥ ध्रु० ॥ असोंगियानें सोंग घेतां । निजरूप पालटतां । प्रबुद्ध न भुलती आभरणीं ॥ १ ॥ कर्दम अवघा सांडुनि । मग तें सोज्वळपण निवडुनी । घेती शुकचि तें पाणी ॥ २ ॥ वृक्ष समत्व हेळुनी । एक चंदन साच निवडुनी । नाग जडले परिमळपणीं ॥ ३ ॥ भिन्नपणें स्थूल दृष्टि । मानुनी सूक्ष्मपणें सृष्टि । सोहिरा एकात्मा सगुणीं ॥ ४ ॥

पद ७८ वें.

धन्य हा योग ! धन्य हा योग ! । देह टाकुनि सत्तासुखेंशीं हा भोग ॥ ध्रु० ॥ चित्रामाजी भिंती । नसोनियां दिसती । तैशी देख ज्योति दृश्याकारें बा ! ॥ १ ॥ तरंगीं हा सागर । कीं लवणीं आगर । तांदुळीं ओगर । नानापरि बा ! ॥ २ ॥ घटीं मृत्तिका । पटीं तंतु एका । भज तेवीं सकळिका । आत्मरूपें बा ! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे ऐशा बोधाची खूण । पावला तो जाण । योगिया ऐसा ॥ ४ ॥

पद ७९ वें.

धुंडत धुंडत अवधूत जोगी ॥ ध्रु० ॥ सहज वाजवी अनाहत-शिंगी ॥ १ ॥ ज्याचा तोचि एकटा निवृत्तिमार्गीं ॥ २ ॥ मीपण जाळूनि लावी विभूती आंगीं ॥ ३ ॥ अनुभववनीं हा वैरागी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे चिन्मुद्रा राजयोगी ॥ ५ ॥

पद ८० वें.

न बोलवे यावरी आतां एक आणि दोन्ही ॥ ध्रु० ॥ संकल्प त्यजुनी, निवांतचि राहिलों निरंजनीं ॥ १ ॥ कवणाठायीं तें नेणों ! परि मन गेलें कीं विरोनी ॥ २ ॥ आपणां पाहूं जातां, कल्पना गेली हारपोनी ॥ ३ ॥ मजमाजी पडली मिठी, दिठीं नये हे परतोनी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे हें चैतन्य, लाधोनी सहजोंचि आलें मौन्य, आपेंचि लागली उन्मनी ॥ ५ ॥

पद ८१ वें.

नवल हें गुज समाधि सहज । चित्सुखनिजीं निजति योगीराज ॥ ध्रु० ॥ नाथिलें हें मृग देखोनि आला । वेडा हा पारधी पाठिसी लागला । लागतां लागतां पूर्वे निघाला । अवचटेंचि वरचे डोंगरीं गेला ॥ १ ॥ पावतां पावतां डोंगरही विसरला । पारध्यासी मृगें समूळ ग्रासिला । ग्रासितां ग्रासितां मृगही निमाला । सोहिरा म्हणे तें सुख लाधलें मला ॥ २ ॥

पद ८२ वें.

नाच नाचे नाचे, या हरिरंगीं नाचे ॥ ध्रु० ॥ सहजसमाधि लागे, निद्रेमाजी होइजे जागें । समाधान मनाचें ॥ १ ॥ भ्रमरगुंफे राहणें, निरंतर स्थीर होणें । उलटें मान लोचनाचें ॥ २ ॥ बद्धता नाहीं, मग मुक्तता कैंची । नामचि नुरे मोचनाचें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मीच नाहीं, मग दुजा तेथ कैंचा पाहीं । काज राहिलें पावनाचें ॥ ४ ॥

पद ८३ वें.

निजकृपें तरि अनुभव सोपा ॥ ध्रु० ॥ कल्पनाकाजळी जेथ मावळे । नाहीं करी जयीं भवविक्षेपा ॥ १ ॥ सर्वही सोज्वळ

निजतत्त्व निर्मळ । कोण धरी मग पुण्यपापा ॥ २ ॥ सोहिरा म्हणे ज्यांहीं हें सुख सेविलें । नाहीं तयांलागीं पुनरपि खेपा ॥ ३ ॥

पद ८४ वें.

निजजनवसंत सुखावले जिच्या संगा लागोनि ॥ ध्रु० ॥ आदि अंत नाहीं जिसी । पूर्णानंदाची राशी ॥ भोगिति हे निदिध्याशीं श्रवणमननीं ॥ १ ॥ नाहीं जेथ यमनेम । आपणापेंचि आराम ॥ शुद्ध सुमन शमदम । मदनमालिनी ॥ २ ॥ टाकिलें हें त्रिकूट । भेदोनियां श्रीहाट ॥ वस्तीला गोल्हाट । औटपीठ-वासिनी ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे चतुष्पदा । भोगुनियां परमपदा ॥ भोगिती अनुपम्य स्वादा । तूर्या उन्मनी ॥ ४ ॥

पद ८५ वें.

निजनयनीं हरि आणी वो! सये ! ॥ ध्रु० ॥ आत्माराम हा भावी आराम । त्याविण नीज नये ॥ १ ॥ आपेंआपण पुरुषपण । देखोनि सुंदर प्रिये ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग प्रेमसुखामृत । सेवुनि सहज निलये ॥ ३ ॥

पद ८६ वें.

निजनयनीं हरि पाहसि जरि गा ! ॥ ध्रु० ॥ एक तेज हें सर्व प्रकाशुनी । आपण दिससी तूं जगा ॥ १ ॥ गुणातीत जो ब्रह्मसनातन । पाहतां शांति वरीं गा ! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे पृथ्वी पाहतां । पूज्य आपणापें गा ! ॥ ३ ॥

पद ८७ वें.

निजबोधें जाहला गर्क । जेथ नुरती हे चंद्रार्क ॥ ध्रु० ॥ पाहुं जातां चित्सुखसिंधु । सैंधवमानें बुडाला तर्क ॥ १ ॥ सोहिरा म्हणे एकाएकीं । जाहला जाणिवेचा संपर्क ॥ २ ॥

### पद ८८ वें.

निजसदनीं धरिं धीर ॥ ध्रु० ॥ भवमेरू हा पृथ्वी उलथिल । त्रिकुटीं राहुनि स्थीर ॥ १ ॥ विषयकोरान्न हें न मिळे तरि । सेवुनि गंगेचें नीर ॥ २ ॥ रविचंद्राविण अंधत्व भासेल । गोल्हाटीं पेटवीं वैश्वानर ॥ ३ ॥ शोकमोहाचा पडे पर्जन्य । प्रेरुनी ज्ञान-समीर ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे अभय ओपितां । होसिल व्योमीं गंभीर ॥ ५ ॥

### पद ८९ वें.

निजस्मरणीं तत्पर मन हें होउनि राहूं ॥ ध्रु० ॥ मृग-जलवत हें जाणुनि सकळिक । विषयसुखासि न पाहूं ॥ १ ॥ ऊर्ध्व-मुळीं कीं याचित ठायीं । सुख भोगिलें सतीं ॥ २ ॥ म्हणे सोहिरा आदिनाथगुरु गुप्त निरंजन जें कांहीं । हरिहरब्रह्मा जेथुनि झाले चित्सुखवनवसंतीं ॥ ३ ॥

### पद ९० वें.

निजसुख सेवूंचि लागलों ॥ ध्रु० ॥ सेवि तेंचि सरे, अपार तें उरे । आपणचि भागलों ॥ १ ॥ बैसतें स्थान, तें भान विसरलों । तटस्थचि झालों, तेथचि कीं विरागलों ॥ २ ॥ सोहिरा म्हणे कवणे ठायीं हें । काय सेवियलें सांगूं, नाहींच उमगलों ॥ ३ ॥

### पद ९१ वें.

निजानंदीं मन मुरलें उरलें चैतन्य ज्ञानगंगे न्हालों, पूर्णत्वा आलों, झालें समाधान ॥ १ ॥ आत्मयाशीं लग्न, होऊन नग्न, अंतरीं झालों मग्न ॥ २ ॥ आस न वाहत, भास न पाहत, चित्सुखसिंधुआंत ॥ ३ ॥ न करी, उखीविखी, दृश्य न लेखी,

झालों सदा सुखी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे काया, लटिकी केली माया, निर्गुण निरामया ॥ ५ ॥

पद ९२ वें.

नित्य स्मरण तुझें, हरिरूप दुजें ॥ ध्रु० ॥ हें बहु नाम, पाववी निजधाम । परमामृतसुख सेवूं जें ॥ १ ॥ आपेंचि आपण, जेथिल हे खुण । जाणोनियां माझें मीच बुझें ॥ २ ॥ संकल्पविकल्प हे, हारोनियां जहीं । सांगत निजजीविंचीं गुजें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मग, तेंही विसरूनी । निजसुखीं निजलाचि निजे ॥ ४ ॥

पद ९३ वें.

निर्मुळ तें फळ सांपडलें हो ! जें ॥ ध्रु० ॥ टाळ तें मूळ कीं मूळ तें टाळ । या तरूलागीं अलग जें ॥ १ ॥ पाहतां ज्या फळीं अनेक फळें । एक एकांतही एक मुळीं जें ॥ २ ॥ चारी सहांसही शमदमादिकां । नाकळेचि निजवर्ण निरूज जें ॥ ३ ॥ राजयोगादिकीं सेविलें आवडी । अमूल्य बहुत अनुपम्य जें ॥ ४ ॥ सोहिरा फळामृतें समृद्ध होउनी । दृढपणें निजदृष्टि धरी जें ॥५॥

पद ९४ वें.

निराकार निर्द्वंद्वा निर्गुण परब्रह्मा ! । तुझेनि योगें परमसुख आम्हा ॥ ध्रु० ॥ तुझिया स्वरूपाची न कळे मजला मति । वाचा कृष्णकृष्ण म्हणवुनि गाती । निरंजना! पावों तुज श्रीपति! । तुझी देईं मजला निजभक्ति रे ! ॥ १ ॥ तुझा तूंचि बोलविसी वाचेकरवीं । अनुभवाचीं बोलणीं ऐशीं बरवीं । मनकमळ प्रकाशी आत्मरवी । तुझिये ज्ञानयोगीं हा मिरवी रे ! ॥ २ ॥ निराकारा ! तुझा तूंचि सहज महाराजा ! । सर्वस्वरूपीं अससी तूं विराजा ।

तूंचि जीवन नलिनी कायाकंजा । तुझिया नामाचा त्रिभुवनीं गर्जा रे ! ॥ ३ ॥ सोहिरा तुझ्या नामेंचि रुतला । प्रेमयुक्त तेथेंचि गुंतला । परमामृत सेवुनियां शांत झाला । ज्याचे दृष्टीं भव हा विक्रतला रे ! ॥ ४ ॥

पद ९५ वें.

निश्चल अचल अनंताला । भज परमप्रीति भगवंताला ॥ ध्रु० ॥ परमात्मा आत्मा हा अंतरसाक्षी, अनाम अतीताला । पूर्णकृपाघन जो भूतभावन, पावन करितो पतिताला ॥ १ ॥ भूतसंग स्थावर-जंगम, सोडुनि सेवीं तूं संतांला । गुह्य गुरुबीज माग तयांप्रति, लाग विहंगमपंथाला ॥ २ ॥ म्हणे सोहिरा पूर्णप्रतीति, वेदांत श्रवण करीं ग्रंथाला । श्रवणमनननिदिध्यासें त्वरित घे, अनुभव हा एकांताला ॥ ३ ॥

पद ९६ वें.

नीज रे ! लागली मज, केली हे चिन्मयसेज । उपमे-अतीत तेज, हारपलें सोहंबीज ॥ ध्रु० ॥ जेथुनि जन्मली काया, पातलों त्या निजठाया । त्यागिली लटिकी माया, मन हें गेलें विलया ॥ १ ॥ होउनियां तन्मय, ठेलें कीं हें निरामय । अगोचर सुख सये ! दिठीं हें परतोनि नये ॥ २ ॥ राहिल्या सकळ गोष्टी, मिथ्याचि भासली सृष्टी । वोळली चिद्धनवृष्टि, मुळीं मावली दृष्टी ॥ ३ ॥ उल्हासचैतन्यसिंधु, उदेला अर्धइंदु । सेविला पूर्णबिंदु, झाला कीं हा आनंदु ॥ ४ ॥ कवणाचि या प्रतिबिंबीं, पाहतां ना आरंभरंभःस्तंभीं । पावलों म्या अवलंबीं, स्थिरावलों निरालंबीं ॥ ५ ॥ बोधचि हा त्रिशुद्धि, माझी मज नाहीं शुद्धि । विराली समूळ बुद्धि, सदोदित समाधी ॥ ६ ॥ दिन नाहीं रजनी, तेथचि कीं रंजोनी । निर्गुण निरंजनीं, सहज हे उन्मनी ॥ ७ ॥

कासया हें बंधन, सोहिरा म्हणे साधन । सांपडलें निजधन, झालों आतां समाधान ॥ ८ ॥

पद ९७ वें.

नीज लागली उन्मनी ॥ ध्रु० ॥ अहं त्यजोनी, सोऽहं उमजोनी, राहिलों निजोनी ॥ १ ॥ पूर्णाल्हादीं, आनंदकंदीं, सच्चिदानंदीं रिझोनी ॥ २ ॥ निवटोनि एकें, निजकळिकें, निर्गुण-भूमिके रुजोनी ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे अज्ञान, ज्ञेय ज्ञाता ज्ञान हें विझोनी ॥ ४ ॥

पद ९८ वें.

नीज लागली हे उन्मनी ॥ ध्रु० ॥ निष्काम हा राम आराम। ना भूमि ना व्योम अनाम निजधाम ॥ १ ॥ मना लागलें गोड सुख हेंचि अखंड । बुद्धि विरागली सई ना मागली ॥ २ ॥ झालों कीं समाधान अंतरींच मग्न । दृश्याहुनि निराळा झांक आली डोळां ॥ ३ ॥ स्वप्न ना सुषुप्ति तूर्या ना जागृति । शून्याचिये बाजे चैतन्याचे सेजे ॥ ४ ॥ उदो नाहीं अस्त तेथ आजीं स्वस्थ । सोहिरा म्हणे हें गुज समाधि सहज ॥ ५ ॥

पद ९९ वें.

निर्जीवीण नीज नये सये वो ! मज ॥ ध्रु० ॥ नयना अलक्ष्य जें । वाचे अमुख तें । तेथ परतोनि मी नये ॥ १ ॥ परेचे उपरिये, पालखीं पहुडये । सहजचि घेई आह्लये ॥ २ ॥ तेथ चौघी जणी, गाती निगमपर्णी । तें सुख तयांसि भूलये ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे, मग तें सुख पावणें । चुकवणें हा भवनिरये ॥ ४ ॥

पद १०० वें.

नेणों हें काय ऐसें पडलें ॥ ध्रु० ॥ नावाथिलें मन, शोधूं हें जातां । जातेनशीं दडलें ॥ १ ॥ आपणा मोडुनि, लंपट

होउनी । कवणाशीं हें जडलें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे वाचा, कुंठुनि अवचटें, मौन्यचि मग पडलें ॥ ३ ॥

पद १०१ वें.

पतीतपावन दीनदयाघन करुणाकर देवा । श्रवणमनन-निदिध्यासें निरंतर घडो तुझी सेवा ॥ ध्रु० ॥ परमप्रकाशक तेजोमय हें गुप्त तुझें स्वरुप । परतुनि दृष्टि पाहणें पाहतां निर्गुण हें अरुप । परमार्थ परिपूर्ण साधनीं भरलें हें अमुप । परात्पर तूं अंतरसाक्षी हृदयभुवनदीप ॥ १ ॥ तीन्ही संधी साधुनि घेणें सुख हें एकांतीं । तीन्ही गुण हे निरसुनि शून्यीं उगवली हे ज्योती । तीक्ष्ण ज्ञानें पुरतें पाहतां कुळ नाहीं याती । तितुकी प्रतीति बाण-लिया मग दिवस नाहीं राती ॥ २ ॥ तलगत तलगत सकळहि जीव हे चित्सिंधू आंत । तरंग जैसे उमटत भासत नासत हे बहुत । तरणोपाय सांगति साधू मत हें सिद्धांत । तरले येणें मार्गें बहुत देहीं देहातीत ॥ ३ ॥ पान्हा पिउनी प्रेमकळेचा हरिलें संकल्पा । पाहतां पारापरेनें भवभय दोरीच्या सापा । पारंगत हें करुनि सकळही अहं सोहं कापा । पारख करितां तटस्थ जाहल्या नेत्रांच्या मलपा ॥ ४ ॥ वरिली शांति आंगीं जाहला पूर्ण अनुभव । वरदबळें सद्गुरुप्रसादें अक्षय वैभव । वमिलें सकळहि मायिक आतां नाहीं भय भव । वदली वाणी मौनपणीं हे रूप नाहिं नांव ॥ ५ ॥ नम्र होउनि वृत्ति लागली अलक्ष हें लग्न । नटत नटत हे लोक सकळही होउनियां भग्न । नख नलगे जेथ देहबुद्धिचें विकासलें गगन । नमुनि सोहिरा म्हणेचि अवघा अलख निरंजन ॥ ६ ॥

पद १०२ वें.

परतोनि मागुती आतां नये हे दिठी ॥ ध्रु० ॥ योगाची पाउटी, करोनि शून्याचिये भेटीलागीं । गेलों उठाउठीं, स्थीर

बैसलों गोल्हाटीं ॥ १ ॥ अभ्यास बारुवा वरोनी, सुषुम्ना विवर फोडोनी । झालों परेपार उतरुनी, निजसुखासवें पडली कीं मिठी ॥ २ ॥ वैखरी मध्यमेमाजी, विराली सहजीं । पुढें आली निजनिजी, मुखें न सुचती गोष्टी ॥ ३ ॥ स्वानुभवहाटीं, स्वानुभूति हे गोमटी । प्रेमें होउनियां भेटी, पदरा दिधली गांठी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे निजपदपटीं, तें रूप डोळियां वाटी । फिरुनी उमजेना समदृष्टीं, काय जाहलें शेवटीं ॥ ५ ॥

पद १०३ वें.

परब्रह्मचि आघवें । सुखें सुखचि हें भोगावें ॥ ध्रु० ॥ जेथ आहे तेंचि आहे । म्हणों नये होय नोहे । सर्वे मीपण हें त्यागावें ॥ १ ॥ उगें होइल तें तें पाहावें । सोऽहंबीज हें जपावें । नित्य स्वानुभूतीचिया गावें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे भावोनि देव । तेथ कांहींच न मागवें ॥ ३ ॥

पद १०४ वें.

परब्रह्मपद भोगी हा जोगी ॥ ध्रु० ॥ मुखाविण कैसी वाजवितो पहा, अनाहतशिंगी ॥ १ ॥ आंगचि नाहीं, हे प्रतीतिचि, पुरी गोदडी हे आंगीं ॥ २ ॥ मोहरें आलें दृश्य, कदाचि नेघे, झाला वीतरागी ॥ ३ ॥ भोगही न म्हणे, त्यागही न जाणे, सोहिरा रमला राजयोगीं ॥ ४ ॥

पद १०५ वें.

परब्रह्म भेट रे ! । प्रपंच पट हा फाट रे ! । दृश्यचित्र आट रे ! । मजमाजी सदोदित आनंदाची दाट रे ! ॥ ध्रु० ॥ त्रिकुटाचा घांट रे ! । ओलांडुनि सुषुम्नाकपाट रे ! । वरी नादाचा

दणदणाट रे ! ॥ बाहेर येऊं पाहतां नाहीं, कल्पनेसी वाट रे ! ॥ १ ॥ विकासों लल्लाट रे ! । मोडों मनपवनाची राहाट रे ! । टाकूं श्रीहाट गोल्हाट रे ! ॥ औटपिठावरुनी जाऊं, भ्रमर-गुंफे नीट रे ! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे हा शेवट रे ! । लुटों अनुभवाची पेठ रे ! ॥ फिटों मतांतर बोभाट रे ! । चारी वाचा निवांत पडती, मुखें सुचेना गोष्ट रे ! ॥ ३ ॥

पद १०६ वें.

परब्रह्मीं मुरलें मन ॥ ध्रु० ॥ बोध अबोध हा हारोनि गेला । सहजेंचि हें झालें उन्मन ॥ १ ॥ त्रिविधताप हा निमाला । वपूंचि लागला चिद्धन ॥ २ ॥ टाकोनि हे गुण सकळ सगुण । रूपातीत रूप हें निर्गुण ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे बोलणें निमालें । कांहींच नाहीं त्याहीं झालों लीन ॥ ४ ॥

पद १०७ वें.

परमानंद सेविती, निरंजनीं योगिराज जे ॥ ध्रु० ॥ नेणों काय अखंडित अनाहतध्वनि बाजे । मनमयूर, सुख विचित्र, गगनघन गाजे ॥ १ ॥ जेथें जाहलें आत्मज्ञान, अंतरिंचे सांजे रूपरेख नाहीं, अंगीं स्वयंबोध माजे ॥ २ ॥ संसार हा नाशवंत, घडलेवीण काजें । शरीरभोग न सुटे, परि चित्तवृत्ति लाजे ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे उलट दिठी, धनुष्य मत्स्यराजें । अहंकार शूरबोधा मिळे तिरंदाजें ॥ ४ ॥

पद १०८ वें.

पराप्रेम गुमान ॥ ध्रु० ॥ आकळ नाकळे अगम अगोचर । मना वाचे दिठी अनुमान ॥ १ ॥ सच्चिदानंदपद अव्यय ।

आंगिंचेंचि हें महिमान ॥ २ ॥ निराकार निर्विकार । जेथ नाहीं दिनमान ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मग सर्वभूतीं । पहा हेंचि समान ॥ ४ ॥

पद १०९ वें.

पाहीं हो! पायीं सहजगति चाले जो गोसावी ॥ ध्रु० ॥ पाहतां गृहस्थाश्रमी ऐसा भावी । स्त्रीसह वंशवृद्धि बहुतें दावी । ज्याची गोष्टी असेल त्याला ठावी । तोचि एक पूर्ण अनुभवी ॥ १ ॥ गृहधर्म करितां सकळहि त्यागी । विषयभोगीं असतां जो वीतरागी । पापपुण्याची चिर्त्ती नये विषागी । तोचि एक धन्य राजयोगी ॥ २ ॥ निजबोध हा सदैव हातीं दंड । धरोनि चाले शांतिपथीं चाड । चित्स्वरुपीं लावुनियां अखंड । ज्ञानवह्निच्या कैफासि वोसंड ॥ ३ ॥ देहालागीं वेगळीक हेचि विभूती । लावुनि बैसे चहूं आसनाचे अंतीं । अंतररंगाचीं भगवीं पांघुरला तीं । प्रेमालयीं मस्तकीं जटा स्फुरती ॥ ४ ॥ चतुष्पदेंचे ध्यानीं जो निमग्न । तेथ झाला अवधूत अवघा नग्न । माझें मी हें स्मरण झालें भग्न । सोहिरा पूर्णालयीं झाला हो निर्विघ्न ॥ ५ ॥

पद ११० वें.

पाहे कैसें हें आहे । आहे-नाहीं तहिं राहे ॥ ध्रु० ॥ अधिष्ठान जें जारज स्वेदज । अंडज उद्भिज वा! हें ॥ जड-चैतन्या व्यापुनि सर्वही । साक्षिरूपें पाहे ॥ १ ॥ पंचभुतें स्थुल सूक्ष्म बुद्धि । इंद्रियें मन त्यजितां हें ॥ बिंदुल्यामधिं असुनि नसुनि । चमकत चमकत जें वाहे ॥ २ ॥ सधर्म साजे वृक्ष विराजे । मनोराज्य तें भाजे ॥ निर्धर्मी बीजप्रायांचि होउनी । अनुभव ठाकुनि जें लाहे ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा बहुविध गेले । कल्प कल्प

नासुनि ठेले । परि आहेपण सत्य विलक्षण । जाणुनि गैबीपद पाहे ॥ ४ ॥

पद १११ वें.

पूर्ण हरि भव तारी निजजन ॥ ध्रु० ॥ आपण प्रकटुनि भक्तजनांमुखीं । प्रेम घेतो निजनाम तनुमन ॥ १ ॥ निजज्योतितत्त्वीं आपण तत्त्वतां । करी भक्तभवबंधमोचन ॥ २ ॥ जाणुनियां मनीं सोहिरा अनुदिनीं । भावें करी तुझें ध्यानभजन ॥ ३ ॥

पद ११२ वें.

बाइ वो ! आतां कायी हें मी सुख सांगों ॥ ध्रु० ॥ निजदिठीं सुदलें अंजन । हाता आलें हें निजधन । कवणचि विकल्प नये लागों ॥ १ ॥ न दिसे देवभक्त । नाहींच कीं बद्धमुक्त । कवणापाशीं काय मागूं गो ! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मज हें घडलें । अवचटें टकाचि पडलें । स्वानुभूतीचा भोग भोगों ॥ ३ ॥

पद ११३ वें.

बोलाआंत खोली, खोलीसवें गेली । वाचा निमाली, कवण जागा ? ॥ ध्रु० ॥ हा सांग बापा, अनुभव सोपा । आपुलिया रूपा, ओळख कैसा ॥ १ ॥ ब्रह्मीं भाव हरला, मग उगम मुरला । मग उरला कवण तो गा ? ॥ २ ॥ सोहिरा म्हणे सांगें सखया । आपुलिया ठाया निजतां भलें ॥ ३ ॥

पद ११४ वें.

ब्रह्म अम्मल प्यालों उन्मत्त झालों ॥ ध्रु० ॥ आपपर विसरलों । संसारांतुनि निसरलों ॥ १ ॥ अनुभवाचा प्याला । रूपाविण देखिला ॥ २ ॥ अगोचररसाला । रसनेविण प्राशिला ॥ ३ ॥

कैफ हें उतरेना । उतरतां उरेना ॥ ४ ॥ डोलत डोलत चालिलों । नेणों काय बोलिलों ॥ ५ ॥ झाला ऐसा चढावा । सोहिरा परे पडावा ॥ ६ ॥

पद ११५ वें.

ब्रह्मबोधें गुल्ल झालें । मन उन्मनीं रिझालें ॥ ध्रु० ॥ ज्ञानाऽनळें भवइंधन । पोळुनि ज्ञेयचि हें विझालें ॥ १ ॥ द्वैताद्वैत हें खंडुनी । महा अद्वैतीं बुझालें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे चिन्मात्र हें । मग तन्मय होउनि ठेलें ॥ ३ ॥

पद ११६ वें.

ब्रह्मबोधेंचि निवालों । आतां काय मी बोलों ? ॥ ध्रु० ॥ पाहतें पाहणें उडालें । लयलक्षचि बुडालें । कोठें नेणें विसावलों ॥ १ ॥ असलेपण न मोडतांचि । म्यां नसलेपणेंचि । असें कांहीं नहोउनियां ठेलों ॥ २ ॥ कोणें कांहींच ना दिधलें । नेणों कैसें समाधान हें झालें । नित्य डोलोंचि लागलों ॥ ३ ॥ प्रतीति–पाखीं उडों गेलों । पहिलाचि पांगळलों । अवघें अंबरचि झालों ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे आंगीं आलें । गाढें मौन्यचि माखिलें । माझा मीच प्यालों ॥ ५ ॥

पद ११७ वें.

ब्रह्मबोधें हें भुललें मन कोठें नेणों गेलें ॥ ध्रु० ॥ देखोनियां चिन्मात्र चित्, मग तन्मय होउनि ठेलें ॥ १ ॥ माझें मीच हें नाठवे, देहभान विसरलें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे चित्सिंधुमाजी, सैंधवमानें कीं विरालें ॥ ३ ॥

पद ११८ वें.

ब्रह्मानंदीं निमग्न मन झालें । एकाएकीं देहभान अवघें गेलें । पूर्णबोधाचें घर हें रिघालें । अंतरीं पाहणें पाहतां हें निमालें ॥ १ ॥

मूळ शोधितां सांपडला हा साक्षि । उडोनी फळीं बैसला जैसा पक्षी । चित्त गुंतोनी हरपे अलक्षीं । लक्ष लागलें केवळ अंतरिक्षीं ॥ २ ॥ दोरावरी सर्पपण भासलें । रूपामाजीच अरूप प्रकाशलें । प्रकाशानें हें समूळ नासलें । अभ्यंतरीं गगन विकासलें ॥ ३ ॥ स्वसुखवसंतीं हे झाली ज्ञानवल्ली । पूर्ण वैराग्यकुसुमानें फुलली । ज्यासि दैवें सांपडली गुरुकिल्ली । म्हणे सोहिरा तोचि अवलिया वल्ही ॥ ४ ॥

पद ११९ वें.

भगवानजी ! तुजविणें क्षणभरी आन चिंतीना मी । जनीं जनार्दन समान देखें प्रत्यक्ष हा नयनां मी ॥ ध्रु० ॥ नासुनि पंचभूतसेना मी । कवणाचि वागवणें भय ना मी । पळ एक पडों नेदीं चैना मी । मग हें भोगणें ना दैना मी ॥ १ ॥ विषमबुद्धि धरींना मी । जगीं या कोणाचाचि अरि ना मी । सप्रेमभरित हरिनामीं । पुनतीं जन्म पडे तें करीना मी ॥ २ ॥ विपरीत करी वमना मी । दृढतर निग्रह करी कीं मना मी । आकाशीं करी गमना मी । न पडे कर्मदोपदमना मी ॥ ३ ॥ शरण या भवभंजना मी । मुनिजनरंजना मी । म्हणे सोहिरा निरंजना मी । ऐसें करी तूं स्वामी ॥ ४ ॥

पद १२० वें.

भगवानजी ! हा करिल तें सुखिं करूं । अनंतकोटीब्रह्मांडनायक सदैव हाचि स्मरूं ॥ ध्रु० ॥ अंतरसाक्षि असोनि न दिसे । अनादि हा ईश्वरू ॥ स्थावरजंगम व्यापुनि उरला । अपार विश्वंभरू ॥ १ ॥ आचार धरूनि साचार भावें । विचारणा विवरूं ॥ दुरित निवारिल हाची निश्चय । मनीं दृढ धरूं ॥ २ ॥ कोठें तरि

वावरूं परि हें । शेवट मन आवरूं ॥ कर्मभोग आणि ज्ञानयोग हा । समतुल्याचि सांवरूं ॥ ३ ॥ ब्रह्मार्पण हें सर्वहि करुनी अहंकृति परिहरूं ॥ अलक्ष्यभुवनीं लावुनि लय हें । आनंदें काळ हरूं ॥ ४ ॥ प्रपंचरचना देखुनि कधींच । नयनीं न बावरूं ॥ म्हणे सोहिरा कैवल्य जिव हा । जिताचि असतां मरूं ॥ ५ ॥

पद १२१ वें.

भगवंत दाता । स्वामी तो आठवा आतां ॥ ध्रु० ॥ परमानंद प्रकाशवंत । ज्याला नाहीं आदीअंत । जो कां ध्याती अखंड संत । धरूनि जाती निर्गुणपंथ ॥ अंतरिक्ष हें लावुनियां लय दक्ष होउनी मोक्षसुखाला सहजसमाधीं राहातां ॥ १ ॥ जेथुनि झाली सकळही सृष्टी । याचा कर्ता न दिसे दृष्टी । म्हणवुनि होतें मन हें कष्टी । ऐकुनि अवघ्या ग्रंथीं गोष्टी ॥ स्थावरजंगम नाना लीला विचित्र वर्णीं शोभत धरणी तापत तरणी अगम्य करणी चरित्र हें पाहतां ॥ २ ॥ म्हणे सोहिरा आंगीं जडला । आधींच आहे नाहीं घडला । प्राणी हा संदेहीं पडला । उपाधींत सांपडला ॥ त्याचे दृष्टीं ईश्वर दडला । ऐसा वेदांतीं निवडीला । तो हा व्यापक आत्मा अंतरसाक्षि परिपूर्ण सनातन गोड दिसे गातां ॥ ३ ॥

पद १२२ वें.

भ्रम विस्मय गेला । देवें उद्धार हा केला ॥ ध्रु० ॥ अजरामर हें स्वरूप दावी । अनन्यभावें भक्ती लावी । महिमा तेच वदनीं गावी । कितुकी वचनीं ते सांगावी । जन्मोजन्मीं हे मागावी । परतुनि दृष्टीनें उमगावी ॥ सज्जनजनमनरंजन । करि भवभंजन निरंजन निर्गुण जो गंजन करि हरि व्यंजन ॥ नयनीं अंजन

भरि जीव तन्मय होउनि ठेला ॥ १ ॥ निरालंबीं राहणें ज्याला । मिळुनियां अजाला । कीं त्या भुवनत्रयराजाला । करितो अनाहत-बाजाला । विसरे तुझ्यामाझ्याला ॥ ऐसा लाल होउनि कालकलित कौतूहल तुंदिल ललित दलित विश्वंभरभजनीं गलित वलित अतिमन होउनि चिन्मयभुवनीं न्हेला ॥ २ ॥ म्हणे सोहिरा शरीरचर्म । आहे तोंवरि घडतें कर्म । पूर्वार्जित हे धर्माधर्म । अंतरसाक्ष हें जाणुनि वर्म । तेणें हरिले सकळ श्रम । ऐके देखे स्पर्शे चाखे । परिमळ ये तो घेतो नाकें ॥ वाचे बोले हात हाले पायीं चाले मैथुनकाले विसर्जताले ॥ जागृति निद्रा स्वप्न सुषुप्ति वर्तुनि ऐसा गुणातीत तो महाशून्य चैतन्यचि झाला । जिताचि असतां मेला ॥ ३ ॥

### पद १२३ वें.

भवदंडितमंडित हो । अखंडित तुम्हीं गावा ॥ ध्रु० ॥ देउनि तनु मनमोहन गहन । शांतिसुख चांगावा ॥ १ ॥ आत्म-शुद्धि त्रिशुद्धि विशुद्धि । स्वसमाधिमहिमा गावा ॥ २ ॥ त्रिकुट श्रीहाट गोल्हाट भेदोनि । त्रिवेणीसंग मागावा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे अपरप्रेम । परानारिसंग भोगावा ॥ ४ ॥

### पद १२४ वें.

भुललें आजी हें मन ॥ ध्रु० ॥ जेथ दिवस ना राती । तेथ जीवघटाची हे माती । इंद्रियें आपापुलें खाती । जया पाहूं जातां झालीं तटस्थ नेत्रपातीं ॥ १ ॥ अरूपाचें रूप । तो हा आकाशिंचा कूप । आंत बुडालें पुण्यपाप । देखुनी निर्वातीचा दीप ॥ २ ॥ लोपल्या बारा सोळा । तो बा ! नोहे गोरा काळा । सर्वी सर्वत्र मोकळा । त्यानें धरिला माझा गळा । देह चालती

कळा रे ! कळा ॥ ३ ॥ भेद मोडला माझा । चहूंवाचातीत गुजा । आपणापें होते पूजा । हें सुख सर्व सुखाचा राजा ॥ ४ ॥ न लावितां अग्न । आजी कायामाया केली भग्न । प्रकृतिपुरुषाचें हें लग्न । आंत सोहिरा झाला मग्न ॥ ५ ॥

पद १२५ वें.

भेटला भगवान् मला हो ! ॥ ध्रु० ॥ भेटीसाठीं आटाआटी जपतपकोटी जन्मोजन्मीं करित करित जिव बहुतचि हा श्रमला हो ! ॥ १ ॥ पंचभूतांच्या विस्ताराला सविस्तराला जाणुनि नित्यानित्य साक्षिभूत हा अंतरींचि गमला हो ! ॥ २ ॥ जे जे समर्थी जें जें घडतें भोगणें पडतें देहाला । हा संस्कार तयानेंचि नेमिला हो ! ॥ ३ ॥ नित्यानित्यविवेक करूनी वैराग्यदशेनें पुनतिं न सेवीं विषयरसा वमला हो ! ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा अंतर बाहेर व्यापुनि उरला रूपरेखविण परब्रह्म तेथ हा जीव रमला हो ! ॥ ५ ॥

पद १२६ वें.

मग पाहिलेंचि नाहीं ज्यांहीं हो ! ॥ ध्रु० ॥ दृश्यपणें तरि होय कीं नोहे। ज्ञानवशें बोलिला हो ! ॥ २ ॥ द्रष्ट्यालागीं जो देखो निरंतर । ज्ञाता निःसिम लाहो ॥ २ ॥ दर्शन ज्ञेय तें आठव हारोनि । नाठव आठवला हो ! ॥ ३ ॥ सर्व सुखामृतीं होउनियां रत । सोहिरा निजीं निजला हो ! ॥ ४ ॥

पद १२७ वें.

मज परम सुखी केलें तेणें हो ! ॥ ध्रु० ॥ सार्थकचि केलें नरदेहाचें । निरसनचि केलें संदेहाचें । दिव्यदर्शन झालें विदेहाचें ।

सर्व विश्वाचि चळतें जेणें हो ! ॥ १ ॥ अवघें दुमदुमिलें आकाश । दिनरजनीविहित प्रकाश । झाला निरंजनींच विकास । आतां पुन्हा जन्माला नाहीं येणें हो ! ॥ २ ॥ हें साधन । साध्यचि वाटे देहपण । दिधलें अविनाश देणें । सोहिरा म्हणे 'मी' त्याचें स्वरूप नेणें हो ! ॥ ३ ॥

पद १२८ वें.

मजमाजी घडलें सुख हें । सांगों काय ? सये ! ॥ ध्रु० ॥ आनंदें निवाली । तेथचि कीं निमाली । दिठी गेली हे परतोनि नये ॥ १ ॥ निरंजनीं निरत । निःसंग निर्मळ । मिनलें निर्गुण निरामय ॥ २ ॥ सोहिरा म्हणे आतां घडणेंचि विघडलें । झालों म्यां निर्जीच कीं निर्भय ॥ ३ ॥

पद १२९ वें.

मजमाजी मीपण हें तैसें सहजेंचि हारलें ॥ ध्रु० ॥ सैंधव मन हें, चैतन्यसिंधुमाजीच विरालें ॥ १ ॥ संकल्पानिळ राहतां, सदसत्तरंग हे जिराले ॥ २ ॥ असणें नसणें घट मठ दोन्ही, चिदंबरीं मिळाले ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मग मिळोनि उरले, आपणियां लाजले ॥ ४ ॥

पद १३० वें.

मजमाजी हे विकासली हो ! सहजेंचि साजणी ॥ ध्रु० ॥ निष्काम हें जळ, निर्गुण दिनमणिमाजी; जैसी कमळिणी ॥ १ ॥ आनंद प्रेम आमोद सुखीं रमे, मानस हें भृंगपणीं ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निशीं चारी प्रहर हे; हारपती चौघी जणी ॥ ३ ॥

### पद १३१ वें.

मन मग्न केलें गुरुनाथें ॥ ध्रु० ॥ स्वरूप कळलें, मीपण गळलें । मिळलें आनंदातें ॥ १ ॥ सहज पिसावलें, मुळीं विसावलें । पावलें मोक्षपदातें ॥ २ ॥ शून्य जितलें, निर्गुणीं रुतलें । गुंतलें निजछंदातें ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा, सुलीन होउनी तल्लीन झालें । अनाहतनादातें ॥ ४ ॥

### पद १३२ वें.

मन माझें हरिनामीं रंगलें ॥ ध्रु० ॥ ज्यांहीं करोनियां, निघालों निजावया । तेथेंचि तें रमलें ॥ १ ॥ अनाहतगजरनाद निरंतर । ऐकुनियां भुललें ॥ २ ॥ जेथ पाहूं गेलें, परतोनि न आलें । सोहिरा म्हणे मोहुन पडलें ॥ ३ ॥

### पद १३३ वें.

मन हें आजी सच्चिदानंदें वेधलें । जन्मा येउनी परमसुख हें साधलें । अंतरीं मी हा कवण ऐसें शोधिलें । सहज ब्रह्मबोधें बोधलें ॥ ध्रु० ॥ संसारींहुनि सुटलें, मन हें आजी विषयभोगांसि विटलें । आपण सर्वांगेंशीं फुटलें, दृश्य लटिकें हें लिगाड तुटलें ॥ १ ॥ राहिली मीपणाची हे कळवळ, निवाली त्रिविध तापांची तळमळ । गेली संशयाची ही खळबळ, झालें निष्काम निःसंग निर्मळ ॥ २ ॥ संकल्पाचियें सावुले सोडुनि नग्न होउनी आत्मेशीं हें भग्न । नाहींपणा लागूनि गेलें लग्न, अनुभवसुखीं आंताचि झालें मग्न ॥ ३ ॥ आपुलिया उगमीं स्थिरावलें, निद्रासमाधिमाजीं सामावलें । निश्चल निराळीं पूर्ण गोवलें, सायुज्य अविनाशपदा पावलें ॥ ४ ॥ पूजाविधिविधान पारुसलें, सकळ कर्मविकर्माकर्म लया

गेलें । सिद्धिफल हें परिपक्कतोसि आलें, पापपुण्याविरहित होउनि ठेलें ॥ ५ ॥ कांहीं कल्पावेंचि सोडिलें, चळत्या देहाचें भान मोडलें। सगुणींच हें निर्गुण जोडलें, सोहिरा म्हणे परमामृतसागरीं बुडालें ॥ ६ ॥

पद १३४ वें.

मन हें कां रे ! विजन जन देखेना ॥ ध्रु० ॥ सांडुनि भेदिक अलंकार । अभेद एकचि लेणें ओळखेना ॥ १ ॥ स्वरूप-उगमीं नित्य निज नेमीं । इंद्रियवृत्तींसी राखेना ॥ २ ॥ सोहिरा म्हणे जहीं पूर्णत्वपणें । परमामृतरस चाखेना ॥ ३ ॥

पद १३५ वें.

मन हें ब्रह्मबोधें बुडालें ॥ ध्रु० ॥ आत्माग्नीचें दर्शन होतां। कर्पुरमानें उडालें ॥ १ ॥ चित्सुखसिंधु हा पाहूं जातां । सैंधवमानें विरालें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मजमाजी आतां । नेणों काय झालें ॥३॥

पद १३६ वें.

माई वो ! सखि दीनदयाळी ॥ ध्रु० ॥ भावें भावितां करणी, अगम्य तुझी स्वरूपनवाळी हो ! ॥ १ ॥ ऊर्ध्व मुळींहुनि शाखा आदि, करोनि तरुचि जिव्हाळि हो ! ॥ २ ॥ साम्य सम-रशीं चिद्विलाशीं, अससी निजीं निर्मळीं हो ! ॥ ३ ॥ आर्तरूपें तुज जाणुनी सहज । सोहिरा शरण तव चरणकमळीं हो ! ॥ ४ ॥

पद १३७ वें.

माजी मेळ वेळ नलगतां झाला समाधी ॥ ध्रु० ॥ मन ही कन्या वर, वरी शून्या । लग्न मौन्या चैतन्या ॥ १ ॥ कान ना डोळा ययां निराळा । दिसे हे लीला जगबुद्बुद जळामाजी ॥ २ ॥

जगदभ्रव्योमा पूर्णकामा । हृदयारामा आत्मारामा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे गैबा मूळबिंबा । आरंभरंभस्तंभा निरालंबा ॥ ४ ॥

पद १३८ वें.

मी काय हो! हें सुख वानूं अनुमान ॥ ध्रु० ॥ वाचा हे गळे प्राण पांगुळे । सहज मिळे जहीं नाहीं दिनमान ॥ १ ॥ व्यक्त ना अव्यक्त बद्ध ना मुक्त । हें निज निजीचें महिमान ॥ २ ॥ परम प्रमेय हें अपर ना पर । नाम अनाम गुमान ॥ ३ ॥ चित्रींची भिंती नसोनियां असती । तेंवी हें समसमान ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे मी हा टाकूनि पहा । जीव शिव अभिमान ॥ ५ ॥

पद १३९ वें.

मीच नाहीं जेथ । दुजा कैंचा तेथ ॥ ध्रु० ॥ एकीं एक झालें तयीं दीन नाहीं नाथ ॥ १ ॥ आदि नाहीं अंत जातां नाहीं पंथ ॥ २ ॥ सोहिरा म्हणे, आपणापें असावें सनाथ ॥ ३ ॥

पद १४० वें.

मी मज टाकुनि आणिक पाहूं काय ? ॥ ध्रु० ॥ निशिदिनीं गोरस पूर्ण वोरस । सेवनीं जो प्रीति लाय ॥ १ ॥ काम निष्काम जो जाणुनि पुरुषा । प्रकृति लावी भुलाय ॥ २ ॥ बोबडेपणीं बोले सखोल । शब्दरूपें परह्लाय ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निशिदिनीं ध्यातां । नाहीं विषयसुखलाहाय ॥ ४ ॥

पद १४१ वें.

मी मज देखलिया रे! मग नाहीं श्रम ॥ ध्रु० ॥ मी तूं हें जेथ निरसुनीच गेलें । कैंचि उरे भवभ्रम ॥ १ ॥ श्रुतींसि अगोचर तूं तुज भेटसी । कोण धरी मग नेम ॥ २ ॥ शब्दसा जीवधर ब्रह्मां

मिळाला । कोण करी उपक्रम ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे जगीं जो अपरंपार । निजदेहीं परब्रह्म ॥ ४ ॥

पद १४२ वें.

मुरारी नांदे निरंतरीं ॥ ध्रु० ॥ ऐसेंचि भावुनि, नित्य समाधानीं । पाहे पां अंतरीं ॥ १ ॥ ज्याचिये स्मरणीं, ज्ञान उगाणीं । भवभ्रम दूर करीं ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग अनुभवीं पाहतां । जन्ममरण वारीं ॥ ३ ॥

पद १४३ वें.

मोहिलें आजी मनचि तेणें हो ! ॥ ध्रु० ॥ फळोनि नफळतें । मीपण गळतें ! विश्व चळतें हें ज्याणें हो ! ॥ १ ॥ नाहीं रूपरेख । गुप्त व्यापक देख । ऐसा कवण म्यां नेणें हो ! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे देह । गमलें निःसंदेह । जैसें वाटेचें पेणें हो ! ॥ ३ ॥

पद १४४ वें.

म्यां केला धणी हो ! त्याला ॥ ध्रु० ॥ सहस्रदळकमळीं, अम्मल परमामृत पी त्याला । करोनियां न करी, शबल विश्व भरोनि रित्याला ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु महेश ईश्वर, चहूं जणांच्या पित्याला । दुसरें नाहीं जयालागीं, भक्तकाज जप त्याला ॥ २ ॥ भासत दृश्य हें नासत जाय, अजरामर जो निर्गुणवनीं वसे त्याला ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा तंतू पटीं तद्वत, सर्वघटीं जो प्रकट असोनी लपे त्याला ॥ ४ ॥

पद १४५ वें.

या हरिनें माझें हरिलें मन ॥ ध्रु० ॥ अवघाचि आपण बुझवुनी हे खुण । पावतां जहीं झालें अमन ॥ १ ॥ स्वरूप सोडुनि दुजे भावनीं । करूं नये मग दूरी गमन ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग इंद्रियवृत्तिशीं । तें सुख सेवुनि झालें शमन ॥ ३ ॥

पद १४६ वें.

याहुनि काय तें बोलणें । आनंदें डोलणें ॥ ध्रु० ॥ प्रेमभरें मन भरलें । चैतन्यहेम नगीं आभरलें ॥ १ ॥ असोनियां तरी जनीं । वस्ति केली निरंजनीं ॥ २ ॥ सोहिरा पारंपर हें सांगे । दिसती तितुकीं मायासोंगें ॥ ३ ॥

पद १४७ वें.

रामरूप झाले प्राणी ॥ ध्रु० ॥ अंतरीं दीपक उजळला । मी कोण कळला । अभिमान गळला । मिळोनि गेले निर्वाणीं ॥ १ ॥ निरंजनाला, आणि मनाला । जशी भेट होउनी लवणाला । रिघालें पाणी ॥ २ ॥ मिळोनि आकाश, आणि सुप्रकाश । श्वासोच्छ्वास राहिला प्राणीं ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा आपण तरणें, जग उद्धरणें । निघती भगवद्वाणी ॥ ४ ॥

पद १४८ वें.

रंगलों या हरिरंगीं लौकीकलाज सांडुनी ॥ ध्रु० ॥ नगवत् जग मग मानुनि शुद्ध सुरंगीं ॥ १ ॥ सोडुनि संग निःसंग झालें चैतन्यसिंधुतरंगीं ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मज अवचित देणें, जग चळे जेणें एकचि हा तंतु दुरंगी ॥ ३ ॥

पद १४९ वें.

लय लागलें आत्मारामीं । जाहला आनंद अंतर्यामीं ॥ ध्रु० ॥ घद्ध मारिला अहंकार हरामी । कर्म केलें कीं परिहरा मी । युक्त केलें कीं हवि रामीं । श्वासोच्छ्वास प्यालों वारा मी ॥ १ ॥ देहीं असोनी असें कीं न्यारा मी । कधीं न साहेंचि विकारा मी । कांहीं न घेंचि कल्पना घेरा मी । नाना योनींचा न फिरें फेरा मी ॥ २ ॥ वासना हे न ठेवीं उदारा मी । लुब्ध होईना घरदारां मी । मनीं लक्षिला मोक्ष उदारा मी । शरण आलों दीनोद्धारा मी ॥ ३ ॥

कधीं न लिंपे संसारकेरा मी । यमधर्माच्या नाटोपें वैरा मी । गोष्टी सांगेन तीनतेरा मी । भगवानाचा होईन प्यारा मी ॥ ४ ॥ विपरीतरीती इंद्रियग्रामीं । यांचा नायकेंच कधिं आग्रह मी । कधीं न जाय निंदानगरा मी । दशवेद्वारींच्या राहिलों अग्रा मी ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे या यंत्रा मी । देखियला कीं भ्रामयंत्रा मी । विसरेना विवेकमंत्रा मी । उगी पाहतों जीवयंत्रा मी ॥ ६ ॥

पद १५० वें.

लागला निदिध्यास अविनाशसुखाचा ॥ ध्रु० ॥ निराकार निर्गुण निरंजन निरामयाचा ॥ १ ॥ धन्य हें मौन्य, महाशून्य चैतन्य अखंडिताचा ॥ २ ॥ ज्ञान निरवधि, सहजसमाधी, सकळकळानिधीचा ॥ ३ ॥ कलिमलदहन, गहन मनमोहन, दयार्णवाचा ॥ ४ ॥ कायादंडन, नलगे मुंडन, नलगे रुका हा सदा फुकाचा ॥ ५ ॥ निष्काम आराम, हा राम, कल्पद्रुमाचा ॥ ६ ॥ दुमदुमिलें अंबर, स्थिरावली नजर, होता हे गजर, अनाहतध्वनींचा ॥ ७ ॥ म्हणे सोहिरा दास उदास, हा छंद सदा सच्चिदानंदाचा ॥ ८ ॥

पद १५१ वें.

लागलें प्रेम हो तयाचें । निर्गुण निरंजन निरामयाचें । विश्व हें लाघव ज्याचिये सत्तेचें ॥ ध्रु० ॥ दिसे हा तितुका मायेचाचि खेळ । न दिसे तेंचि स्वरूप निर्मळ । आनंद सत्ता प्रकाश प्रबळ । केवळ जग बुद्बुदाचें जळ ॥ १ ॥ सुखाच्या आंगीं हारपल्या गोष्टी । पाहूं जातां पुंजाळली दृष्टी । मेघावीण होतसे हे वृष्टी । ज्याचिये पोटीं मावळली सृष्टी ॥ २ ॥ आकारा आलें दिसतें तें हें सामान्य । बोलाआधीं आलें कीं हें मौन्य । अधऊर्ध्व मावळलें शून्य । सर्वत्र एक व्यापक चैतन्य ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे झालों म्यां आराम । आंगाचि झालें जगदभ्रव्योम । इच्छेवीण झालों पूर्णकाम । अक्षय दयार्णव आत्माराम ॥ ४ ॥

पद १५२ वें.

लागोनि लग्न । मग्न मन ठेलें हो ! ॥ ध्रु० ॥ काया नाहीं माया, तया ठाया लया गेलें हो ! ॥ १ ॥ हृद्गत सदयहृदया, उदया आलें हो ! ॥ २ ॥ संकल्प हा क्षया जाउनी, अक्षय दया ल्यालें हो ! ॥ ३ ॥ आरंभरंभःस्तंभीं, निरालंबीं गैब जाहलें हो ! ॥ ४ ॥ तुटका संसार घोंटुनी झुटका, प्रेमघुटका प्यालें हो ! ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे जेथुनि येणें, ज्याचें तेणें नेलें हो ! ॥ ६ ॥

पद १५३ वें.

लाधलें हो ! अनादि निजबीज सहज मज हें ॥ ध्रु० ॥ सकळ भूप अमूप अरूप दीप ॥ १ ॥ अकुल अगोत्र स्वतंत्र पवित्र चिन्मात्र ॥ २ ॥ अभेद बोध जगत्कंद महदानंद ॥ ३ ॥ ज्याणें प्राण चळे, हें शरीर खेळे, तो मजमेळें, अनंत डोले ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे क्षेम पराप्रेम जगनगहेम ॥ ५ ॥

पद १५४ वें.

लेइलें आजी चिन्मयलेणें ॥ ध्रु० ॥ आंगाहुनि जहीं, दुजें नाहीं, सबाह्य पाहीं, सर्वांगीं देखणें ॥ १ ॥ अवाचित घडलें, मौनाचि पडलें, अंतरीं जडलें, तें मनबुद्धि नेणें ॥ २ ॥ कर्म गाळवी वर्म आळवी, इंद्रियें चाळवी, कवण येणें ॥ ३ ॥ पाहतां न दिसे, दिसल्याविण असे, सकळ प्रकाशे, जग चळे जेणें ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे, पावलों निजखुणें, दिधलें येणें, अविनाश देणें ॥ ५ ॥

पद १५५ वें.

विवेक हा गोरक्षक गोधनें राखे । विरळा कोणी देखे सद्गुरू-कृपें ॥ ध्रु० ॥ उन्मेख पहांटे अवचटेंचि सोडी । भेदाची हे काडी सेवूं नेदी ॥ १ ॥ मनपवन काठी वैराग्य करतटीं । विषयांच्या

आत्राठीं धांवूं नेदी ॥ २ ॥ षट्चक्रें चोंहाटा न्हे ओलांडुनी । सरळ सुषुम्नेचें पाणदिनें ॥ ब्रह्मरंध्रडोंगरा निजसुखचारा । सत्रावीच्या निरा पाजवुनियां ॥ ४ ॥ गोल्हाट टांकुनी औटपीठावरुनी । आणितो गोठणी सहस्रदळीं या ॥ ५ ॥ अन्वयव्यतिरेकें हांकोनियां पैठां । हृदयींच्या गोठां आणुनि बांधी ॥ ६ ॥ बांधणूक कसी नवलाव परि । सोहिरा म्हणे जेथ दावें ना दोरी ॥ ७ ॥

पद १५६ वें.

विहंगम अवचटें उडाला । चंद्रमा सागरीं बुडाला ॥ ध्रु० ॥ जळाविण सिंधु देख तमासा । राहिला कैसा मासा । सर्वे चंद्रमा नेला ग्रासा ॥ १ ॥ अग्नि आमिषा लुब्धुनि पडला । मुंगिमुखीं मासा ॥ २ ॥ निजसुख गोडाला । मुंगि मिळाली उत्तर नये तोंडाला ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे ही खुण उमगी । तोचि जाणावा योगी ॥ ४ ॥

पद १५७ वें.

वेगळे नव्हती आत्मा जीवात्मा दोघे जण ॥ ध्रु० ॥ ठायींच्या ठायींच जें कां आहे । तें कांहीं केलिया डळमळ नोहे । हें जो दीर्घ दृष्टि करोनि पाहे । भिन्न भाव दाविती हे त्रिगुण ॥ १ ॥ पारंपर हें सहज सृष्टि भूतीं रचना हे आघवी । मोठा आहे ऐसा जो लाघवी । धरोनि वर्ते संचित क्रियमाण ॥ २ ॥ निर्गुण नोहे विषय-रसीं आसक्त । सगुणयोगें इंद्रियसुखीं प्रविविक्त । पाहती ज्यालागीं योगी नित्यमुक्त । मंदमती लाविती आरोपण ॥ ३ ॥ जे जे घटीं जैसा आहे धर्म । तेथें मिळोनि करी तो तो स्वधर्म । करोनि नाहीं ज्यालागीं बद्ध कर्म । मिथ्या भावी तें अज्ञान मीपण ॥ ४ ॥ पाहतां अंतरदृष्टि सोयें । सर्वं जीव हा म्हणतो शिवपण लाहे । भिन्नपण कांहीं जेथ न साहे । सोहिरा बोले समरसेंशीं मिजखूण ॥ ५ ॥

### पद १५८ वें.

वेषधारी युगायुगीं हर । लीलाभरित हरि । भवसागर हा तारी ॥ ध्रु० ॥ चरित करित अरि दमुनि कामना आराम हृदय हें करी ॥ १ ॥ ज्ञान मृगहि निमाला, सोहिरा म्हणे तें सुख लाधलें मला ॥ २ ॥

### पद १५९ वें.

वंदियला भगवन्त । तो म्यां वंदियला भगवन्त ॥ ध्रु० ॥ भवसिंधुतारक निजसुखकारक । सकळां आदी अंत ॥ १ ॥ सज्जन-रंजन अलख निरंजन । भक्तजनां कृपावंत ॥ २ ॥ वेद झाले मुके, शेष न स्तवूं शके । ज्याचें स्वरूप अनंत ॥ ३ ॥ नव्हे नरनारी गैबी सूत्रधारी । हालवि जो जिवजंत ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे अनुभविं पाहणें । चित्सुखवनवसंत ॥ ५ ॥

### पद १६० वें.

शामसुंदर मुरलीधर ॥ ध्रु० ॥ जीव शिव एकाकार । देखोनि स्वरूप नार । चुंबन देती दोन्ही अधर ॥ १ ॥ योगियां सत्रावी ते तत्त्वता । भावोनियां माता । जीवविती नित्य पयोधर ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निर्जी । निजसुखामृत । स्मरे ज्यासी शशिधर ॥ ३ ॥

### पद १६१ वें.

श्रीहरिच्या निज लाग छंदा ॥ ध्रु० ॥ उत्तमांतिल पद हें जाण सुखाधिक जें सांडुनि सकाम धंदा ॥ १ ॥ दृश्य-विषयत्यागीं, बरवें आत्मत्व भोगीं; सावध स्वरूपीं हो मंदा ॥ २ ॥ निजतेजीं साकारीं, पहिलें सोहंबीज ॐकारीं; निर्मूळ उत्पत्तिकरकंदा ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा निजरंगीं पैं रमतां, केवळ स्वपद ये हाता; सर्वें देखसी गोविंदा ॥ ४ ॥

पद १६२ वें.

सज्जन हा चुकलेला आला। दर्शनें परम हा जीव धाला ॥ ध्रु० ॥ येथेंचि असतां दिसला नाहीं। वसला देहीं न करी कांहीं ॥ सदैव त्याचा ध्यास वाहीं। विसविली नाहीं हे जपमाला ॥ १ ॥ अंतरिं बाहेर प्रकाश पडला। मोह अंधार हा सहज दडला ॥ विदेहपणें कीं जीवीं हा जडला। चिन्मय लावियली दिपमाळा ॥ २ ॥ प्रपंच दिसला उदास सारा। अवघ्यां चाळक एकचि वारा। सिद्धांताचा सेवुनि चारा। स्वच्छंदें आनंद झाला ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा चिद्धनाला। वर्षाव होतांचि पूर आला। द्वैताचा हा फेर निमाला। एकचि झाला नदीनाला ॥ ४ ॥

पद १६३ वें.

सत्ता तोचि हा ऐसा निश्चय झाला पहा ॥ ध्रु० ॥ भ्रांति ओंगळी झाली पांगळी। जनीं आगळी अंतीं वेगळी ॥ १ ॥ प्रवृत्ति सरती निवृत्ति हरती। विवेकावरती होउनि उरती ॥ २ ॥ आहे अभाव रूप नाव। दिसे हे मांव लटिकें झाला ॥ ३ ॥ न चले तर्क जई अर्क। गर्क तें हें अतर्क्य ॥ ४ ॥ भुलीव भुलती अबोल बोलती। योगी खुलती अंतरिं डुलती ॥ ५ ॥ म्हणे सोहिरा वाचे गुज तें आपुलें निज। अनादि बीज सहज ॥ ६ ॥

पद १६४ वें.

स्थिर करीं हें मन कीं तेथें ॥ ध्रु० ॥ नामरूप उच्चारितां भेद। सरल्या, उरलें मुळींच अभेद। 'नेति नेति' म्हणती वेद जेथें ॥ १ ॥ पाहातां आधीं शून्यचि वाटे। वाटति जाणीव चैतन्यीं आटे। सबाह्यांतरीं आनंद दाटे। मनबुद्धिविण प्रकाश जेथें ॥ २ ॥ चिद्भ्रमर सहज सुखावे। श्वासोच्छ्वासीं तेथचि धांवे। चित्कळेंतिल

आमोदसुधेतें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे हेंचि आराधन । कोणा न दिसे गुप्त हें साधन । नित्य वाटे समाधान जेथें ॥ ४ ॥

पद १६५ वें.

स्थिरावली निजदिठी । आपणापें पडली मिठी ॥ ध्रु० ॥ आगमानिगमा गुज । तेंचि सुख स्वयें बुज । लागली सहजनीज हो ! ॥ १ ॥ चौशून्य महाशून्यीं । बुडोनि लाधलें मौन्य । भोगिलें चित्सुख चैतन्य हो ! ॥ २ ॥ आकाशाचा भरला कुंभ । कवणीकडे प्रतिबिंब । विकासला निरालंब हो ! ॥ ३ ॥ जेथ गेल्या नाहीं येणें । हें कीं ज्याचा तोचि जाणे । खुंटलें वाचेचें बोलणें हो ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे मजमाजीं सहज । मावळलीं निजीं निज । गैब जाहला योगिराज हो ! ॥ ५ ॥

पद १६६ वें.

सद्गुरुकृपेनें भाग्य ऐसें आलें । ब्रह्मानंदीं मन संतुष्ट झालें ॥ ध्रु० ॥ सांपडली हे सुषुम्नेची वाट । देखियेला हा विवेकाचा हाट । तेथ झाली हे सद्वस्तूची भेट । रूपरेख नाहीं पाहतां पाठी पोट रे ! ॥ १ ॥ आदि अंत पाहतां नाहीं शून्यीं । शून्य सामावलें ज्या चैतन्यीं । अनिर्वाच्य होउनी ठेलों मौन्यीं । निद्रा लागली सहज उन्मनी रे ! ॥ २ ॥ तत्त्व सेवियलें जें सज्जनीं । दिठी सूदली त्या ज्ञानांजनीं । तेणें तेजें लोपली दिनरजनीं । निधी लाधली पूर्ण निरंजनीं रे ! ॥ ३ ॥ उमजों गेलों म्यां कवण ऐसें आधीं । मग्न झालों त्या अनुहातनादीं । निजबोधें गगन समाधी । सर्वां आधीं हें स्वरूप अनादी रे! ॥ ४ ॥ पडला चित्सूर्याचा हो प्रकाश । केला अद्वयाब्धीनें विकास । अधऊर्ध्वीं कोंदलें चिदाकाश । अनुभव हृदयींचा वदला सोहिरादास रे ! ॥ ५ ॥

### पद १६७ वें.

सद्गुरु प्रसन्न जाहला । विश्रांतीसी हृदयीं आला । पूर्णानंदें जीव धाला । अखंडाकारें ॥ ध्रु० ॥ दृश्यभान छेदिलें । चंद्रमंडळ भेदिलें । पिंडींच या शोधिलें । आत्मया रामा ॥ १ ॥ जेथ सुखावले संत । ज्ञानवनवसंत । विवेक जाहला पसंत । सर्व देखणा ॥ २ ॥ विश्व चळतें कीं हें जेणें । जया नाहीं येणें जाणें । मार्गस्थ जीवाचें पेणें । देह हें जाणा ॥ ३ ॥ ब्रह्म व्यापक जेथवरी । अनुभव जाहला तेथवरी । आतां कांहीं हेत वरी । राहिला नाहीं ॥ ४ ॥ संसार हा बाजार । करितां न पवे येरझार । सुटला आहे सेजार । अहंकाराचा ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे समाधिस्थ । जया नाहीं उदोअस्त । संप्रज्ञात छंदस्त । स्वात्मसुखीं या ॥ ६ ॥

### पद १६८ वें.

सदाचि संतोषमय । आंत आम्हीं आहों हो ! ॥ ध्रु० ॥ मन हें चंचळ, विसंबों ना पळ । निश्चळ निर्मळ, निरंजनीं राहूं हो ! ॥१॥ खेचर भूचर, आणि हें जळचर । आइतें चराचर, नवल हें पाहूं हो ! ॥ २ ॥ नेमिलें जें असें, दृष्टीसी न दिसे । चिंताचि ते नसे, होणार तें होऊं हो ! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे तें साहूं, देवाला या नित्य गाऊं । देईल तें खाऊं, वर सोंग दावूं हो ! ॥ ४ ॥

### पद १६९ वें.

सदैव निराकार । मिथ्या मानीं हा आकार ॥ ध्रु० ॥ पाहतां अंतरदृष्टि । दिसे लटकीच अवघी सृष्टि ॥ आहे सतत निर्विकार ॥१॥ निजउगमासीं मेळुनी । सर्व कल्पनेसी हेळुनी ॥ करी जो विषयांचा धिःकार ॥ २ ॥ बाह्य विषय त्यागी । बरवा अंतर विषय भोगी ॥ सर्व निजसुख स्वीकार ॥ ३ ॥ सहोदर एका निजींचा । जाणोनि जें जें देखे त्याचा ॥ सोहिरा न धरी अधिकार ॥ ४ ॥

पद १७० वें.

सदोदित लागली उन्मनी ॥ ध्रु० ॥ महाशून्य निरामय, निर्गुण निरंतर । राहिलों निरंजनीं ॥ १ ॥ तप्तलोह तेंवी, आत्मारामीं हें । जीवन माने, गेलें कीं जिरोनी ॥ २ ॥ भ्रमरगुंफा सिंधु, सैंधव हे दिठी । गेलीच आतां, नये कीं फिरोनी ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे आतां, चालतां बोलतां । कवणींच नाहीं, अभिमानी ॥ ४ ॥

पद १७१ वें.

स्मरण ना मागलें लय लागलें ॥ ध्रु० ॥ नारी पुरुप नपूंसकाविण । चिन्मयसुख हें चांगलें ॥ १ ॥ कवणेठायीं च म्हणोनि पाहतां । मनचि कीं विरागलें ॥ २ ॥ शोधूं गेलें तयीं न्हेलें । परतोनि ना उमगलें ॥ ३ ॥ एकाविणें ना दुजेंही । परत कल्पितें विभागलें ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे तुज अंतरगुज हें । न सांगोनियां सांगलें ॥ ५ ॥

पद १७२ वें.

सये ! मज लागली सहजसमाधि ॥ ध्रु० ॥ पाहतां सखोलचि, रूप अलोलाचि, बोलतां बोलची नये ॥ १ ॥ शांत्यरविंद, आमोद सोऽहं मद, पूर्ण प्रबोध सदये ॥ २ ॥ मजमाजी माहेर, रम्य मनोहर, सुंदर मेरू निलये ॥ ३ ॥ सज्जनरंजनीं, नित्यनिरंजनीं, सोहिरा म्हणे झाला लय ॥ ४ ॥

पद १७३ वें.

सये ! संगमीं मग बोलोंचि नये ॥ ध्रु० ॥ उत्पत्ति आगम जेथील तेथचि । मिळोनि गेलें मग तूं मी ॥ १ ॥ देह विदेह हें जाय लयाला । काय किती सांगों मी ॥ २ ॥ सोहिरा म्हणे जयीं आहे निरामय । नव्हे तें एकही भामी ॥ ३ ॥

### पद १७४ वें.

सहज निद्रा आपेंचि मज लागली ॥ ध्रु० ॥ उलटा योग खेचरिमुद्रा । लागोनि विरागली ॥ १ ॥ पुढील हे योजना मुळींच मोडली । आठवण नुरे मागली ॥ २ ॥ नारीपुरुषावीण कवण हें नेणों । निजोनिया जागली ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे सोऽहंरवी अस्तमानीं । न्हेली मी हेर सावुली ॥ ४ ॥

### पद १७५ वें.

सहज सुखी । ज्यालागीं नाहीं कोण दुःखी ॥ ध्रु० ॥ प्रवृत्ति ज्याणें ही निवृत्ति भावोनि । झाली विषयांसी दुर्विखी ॥ १ ॥ सोहिरा म्हणे पूर्ण सनातना । वंदुनियां निजसौख्यीं ॥ २ ॥

### पद १७६ वें.

सहस्रदळ कमळ हें सुंदर । आत्मा बैसे निज आमोदीं मधुकर । जीव-शिव हे करोनि दोन्ही अधर । सेवी सत्रावीचें पयोधर ॥ परमानंदें आनंदति योगी । सज्ज्ञानिये विज्ञानाचे भोगी ॥ ध्रु० ॥ जन्ममृत्याची चुकली येराजारी । विनटलें जें श्रीगुरुपद निर्धारी । परमपद हें जाहलें ज्या साहाकारी । एकाएकीं पावलें निराकारीं ॥ १ ॥ मन हें हारोनि झालें मनोहर । भ्रमरगुंफे घेतला पाहुणेर । त्यातीत ज्याचें निजमुक्तीचें माहेर । सोहिरा म्हणे भावोनि हरिहर ॥ २ ॥

### पद १७७ वें.

साजणी वो बाई ! धुंडूं लाग, धुंडूं लाग ॥ ध्रु० ॥ तुझिया अवगुणा लागुनि दुरावे कान्हया । कोठें आहे गे ! हरि सांग ॥ १ ॥ अव्यक्तरूपीं जो नांदत जगीं । एक अनेक धरी सोंग ॥ २ ॥ निजमना वरि घेशिल तूं जरि । काय करावा वीतराग ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे तूं महाकारणीं, वोळशील झणीं । नाहीं मग हे तुझी पांग ॥ ४ ॥

### पद १७८ वें.

सांपडला आजी देव भला । मला आनंद जाहला पूर्ण ॥ ध्रु० ॥ व्यक्ति ना वर्ण, तटस्थ कर्ण, वाहिलें अंतःकरण ॥ १ ॥ चहूंवाचातीत गूज, स्वरूप सहज, अनादिबीज ॥ २ ॥ जाहला हर्ष, त्वचेवीण स्पर्श, इंद्रियां नाहीं दर्श ॥ ३ ॥ मीपणा तुटी, पडली मिठी, आजि विरक्ती, वाटली मोठी ॥ ४ ॥ न लावितां अग्न, देह हें भग्न, सोहिरा म्हणे झालों मग्न ॥ ५ ॥

### पद १७९ वें.

सुख सार सरिते । निजजनकल्पलते ॥ ध्रु० ॥ कलिमल-दहनी, मनमोहनी, जगदुन्मलते ॥ १ ॥ अद्वयाब्जिनी, चित्सुख-दिनमणि, देखुनियां खुलते ॥ २ ॥ मजमाजी मीपण हें नुरवुनि, अखंडित डुलते ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निजगुज बुझवुनियां, निजानंदें डुलते ॥ ४ ॥

### पद १८० वें.

सेवीं निरंजनसुख हें सार । सर्वांमध्यें पहा हो ! ॥ ध्रु० ॥ अनुभवें त्याग, विषयभोग । दृश्यातीत रहा हो ! ॥ १ ॥ उलट-दिठीनें त्रिकुटावरी । अंतरज्योति पहा हो ! ॥ २ ॥ कल्पनामळ निर्मळ करीं । ज्ञानगंगे नाहा हो ! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे कीं उर्ध्वपंथीं । प्राणापान वाहा हो ! ॥ ४ ॥

### पद १८१ वें.

सेवुनि अर्धचंद्रा । प्रेमें गाऊं रामचंद्रा ॥ ध्रु० ॥ लावुनियां निजमुद्रा । स्वरूपीं भावुनि ज्ञानसमुद्रा ॥ १ ॥ हे भववृत्ति आर्द्रा ।

हारोनि निजीं नीज योगिंद्रा ॥ २ ॥ सुषुम्नेच्या छिद्रा । लक्षुनि मागें त्या खगेंद्रा ॥३॥ सोहिरा म्हणे ब्रह्मरंध्रा । घेऊं सहजसमाधि-निद्रा ॥ ४ ॥

पद १८२ वें.

संसार नाहीं परब्रह्माचि पाहीं ॥ ध्रु० ॥ देह म्हणोनि पाहतां सर्वेही विदेही ॥ १ ॥ वुचकळूं नको या बहुविध कल्पनाडोहीं ॥ २ ॥ सोहिरादास म्हणे हेंची भज कां लवलाहीं ॥ ३ ॥

पद १८३ वें.

हृदयीं चिन्मयसुखाचा बोध जाहला ॥ ध्रु० ॥ कांहीं नाहीं प्रतिकूळ । जाहलें स्वरूप अनुकूल । जया याति नाहीं कूळ । पाहतां आपुलें तें मूळ । समूळ हा शब्द निमाला ॥ १ ॥ होउनि अहं-सोहं भग्न । जाहलें तद्रुपतेशीं लग्न । सदां स्वयेंचि संलग्न । आपण अंतरींच मग्न । होउनि पूर्णानंदें धाला ॥ २ ॥ कीं तें नामरूपावीण । निरालंब हें निर्गुण । घेतां तेथिल हे खूण । गेलें व्यापें व्यापकपण । केवळ जाहलें उगवण । कीं या अनादि-बीजाला ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे ज्ञेय । ज्ञाता झाले ब्रह्ममय । अवि-नाश अप्रमेय । अखंडित निरामय । कीं हें सद्गुरुचें गुह्य । कीं अद्वयअम्मल प्याला ॥ ४ ॥

पद १८४ वें.

हरला काम, झालों आराम, जडला आत्माराम । विश्वाभ्रम-व्योम, जें निजधाम, नाहीं रूपनाम ॥ ध्रु० ॥ त्रिवेणीसंगम, त्या-वरी उगम, लाधला सुगम । झालों परागम, ना पुनरागम, उडाला विहंगम ॥ १ ॥ निजनरेंद्रा, ज्ञानसमुद्रा, पिउनी अर्धचंद्रा । मध्यम-

द्रा, खेचरीमुद्रा, ही लागली सहजानिद्रा ॥ २ ॥ दिसत नासत
ात, म्यां असलाचि असें सत् । आदी ना अंत कैंची घस्त, हाचि
त्सुखवनवसंत ॥ ३ ॥ संसारचित्र, पुसोनि हे नेत्र, म्यां झालों
स्वतंत्र । ना जन्मपत्र, तेथ कैंचें गोत्र, नलगेचि दुसरा मंत्र
४ ॥ नलगे आराधन, लाधलें हें धन, ओळखिला चिद्घन ।
नहि गिंवसोन, मुरालें हें मन, झालें कीं उन्मन ॥ ५ ॥ पूर्ण-
ोध, आमोद समाध, हे लाधली अनादिसिद्ध । जो मूलकंद
ाद, स्वयें मजमाजी अद्वैतानंद ॥ ६ ॥ ना प्रतिबिंब, हाचि हा
यंभ, विकासला निरालंब । आरंभरंभास्तंभ, पाहतां आंताचि
ळों गैब ॥ ७ ॥ सोहिरा म्हणे देहभानचि हरलें, चालणें बोलणें
लें । तन्मय विरलें, चिन्मय मुरलें, काय नेणों हें उरलें ॥ ८ ॥

पद १८५ वें.

हरि ! तूं एक पाहतां निष्टंक ॥ ध्रु० ॥ वेदशास्त्रें वाचाळपणें
ध्या भेदी ते वादीक ॥ १ ॥ चहूंवाचातीत सौख्य ज्याचें ।
य सांगों तें अमूक ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निर्गुणीं भावोनी ।
णींचा जो नायक ॥ ३ ॥

पद १८६ वें.

हरि निजनिर्धारीं भावा तुम्हीं निरंतरिं हो ! ॥ ध्रु० ॥
रणसुखें संतोषे, निजानंदें उल्हासे । आपण प्रकटे पां अंतरीं
! ॥ १ ॥ अवलोकितां सृष्टि, सर्वे निजात्मतेचे दृष्टि । दिसे
पण चराचरीं हो ! ॥ २ ॥ भावें जरि भावाल, सर्वे निजसुख
ाल, श्रम नाहीं या संसारीं हो ! ॥ ३ ॥ साभासाला हरिला,
पीं अवभास दाविला । सोहिरा म्हणे निराकारीं हो ! ॥ ४ ॥

पद १८७ वें.

हरि माझा सखा जिवलग जो निधान ॥ ध्रु० ॥ आपणा-
ा कांहींच नाहीं । देत असे निजध्यान ॥ १ ॥ दोन्ही वेळे

साभासींच हें देखें । जयाचें निर्गुण अभिधान ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निजस्वरूपीं । ज्यांहीं लावियलें अवधान ॥ ३ ॥

पद १८८ वें.

हरिविणें आणिक नाहीं सखा मज ॥ ध्रु० ॥ सारासार हें दावुनि अंतर । सांगतसे मज जिवींचें निजगुज ॥ १ ॥ समज समजवुनी निजसुख लाधोनी । निवटिलें ज्यांहीं सगुणरुपीं निज ॥ २ ॥ सोहिरा म्हणे जहीं नीज घ्यावया । दिधलि ज्यांहीं मज सहजसमाधिसेज ॥ ३ ॥

पद १८९ वें.

हा तूं भोग रे ! चिन्मयराजयोग ॥ ध्रु० ॥ मुनिजनवर्या, अमितकौमार्या, चैतन्यचर्या, सर्वज्ञसूर्या ॥ १ ॥ अमूपदीप, द्वीप निवृत्तीचा भूप, रूपातीताचें रूप ॥ २ ॥ विद्यारविंदा, पराप्रमदा, आनंदकंदा, सच्चिदानंदा ॥ ३ ॥ संसारतापा, उधळुनि वाफा, अद्वय-कैफा, चिद्भ्रमरगुंफा ॥ ४ ॥ सोऽहंअनंगा, सबराभरीत रंगा, मनतुरंगा, बुडविल चिद्गंगा ॥ ५ ॥ म्हणे सोहिरा अहं भग्न, स्वतेजअग्न, लावुनि लग्न, स्वयेंचि हो मग्न ॥ ६ ॥

पद १९० वें.

हे घनःश्यामा ! करि कां आरामा ॥ ध्रु० ॥ आनंदें आनंद होय, स्वतःसिद्ध चिदंतर्यामा ॥ १ ॥ हें सुखसार जाण निरंतर, सर्वें हा भवभास विरामा ॥ २ ॥ एकीएक हा सर्वसमूहा, तेथ देखे कोण परामा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे जहीं आहे अनुपम, तेथ देऊं कोण उपमा ॥ ४ ॥

पद १९१ वें.

हे पूर्णकळा भगवंत, कृपा करोनि देइल जेव्हां ॥ ध्रु० ॥ मन तंव शून्यचि झालें आहे । मिथ्या प्रपंच नेत्रीं पाहे । सोहं-

ध्यास निरंतर वाहे । सुखदुःख न शिवे तेव्हां ॥ १ ॥ अंतर आकळेना उपाधीन । केवळ इंद्रियें होति स्वाधीन । स्मरणें धांवणें सहज समाधीन । पावणें ये घडिये तेव्हां ॥ २ ॥ म्हणे सोहिरा देहीं असतो । वरिवरि संसारीसा दिसतो । व्यापक निरालंबीं असतो। बसतो न कळे केव्हां ॥ ३ ॥

पद १९२ वें.

हे महाराज ! दीनदयालनिधी ॥ ध्रु० ॥ आपेंआपण देखिलिया निज । अससी तूं सहजसमाधी ॥ १ ॥ पूर्णपणें तुज नलगे हें कांहींच । सुखदुःख भव आधी ॥ २ ॥ एकींएक हा भावुनियां जहीं । न राहे सोहिरा विविधीं ॥ ३ ॥

पद १९३ वें.

हें तूं उमज रे ! अंतरींचें गूज रे ! ॥ ध्रु० ॥ साक्षिदृष्टीचें, प्रेमवृष्टीचें, सकलसृष्टीचें बीज रे ! ॥ १ ॥ स्वानंदाचें, विहंगमाचें, उडणें साचें, चहूंवाचांचें पूज रे ! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे हें विसरे मागें, अनुभव आंगें, येउनिचि लागे, चिन्मयसेजे नीज रे ! ॥ ३ ॥

पद १९४ वें.

हें लाधलें सहजमौन्य । कीं शून्यामाजी गेलें शून्य ॥ ध्रु० ॥ जीवशिवभेदाचें दैन्य । फिटोनि प्रकाशलें चैतन्य ॥ १ ॥ निरालंब हें गगन । शेजे घातलें उन्मन ॥ २ ॥ सोहिरा म्हणे केलें शयन । जेथें न पावती नयन ॥ ३ ॥

पद १९५ वें.

हो ! तें मीचि हारिलें निजधन । चौथेला सांपडलें ॥ ध्रु० ॥ पहिलें निर्गुण निराकार, आलें व्यक्तीसी साकार । होतें अविद्येनें घेरिलें ॥ १ ॥ पंचविसांचे संघटीं, पंचविसा एकवटी । करोनि

तत्पदा आणिलें ॥ २ ॥ अभिन्नतेचे नयनीं, आपेंआपणा देखोनी आणुनी त्वंपदीं ठेविलें ॥ ३ ॥ तत्त्वें महतत्त्वीं ठेवुनी, ठेलें पांचवेलागुनी । निरुतें असिपदीं ठेविलें ॥ ४ ॥ सोहिरा ॐकाराला ठावो, नाहीं ऐक्यापाशीं गांवो । सौख्य अनुपम्य जोडलें ॥ ५ ॥

पद १९६ वें.

ज्ञानसिंधुशिरोमणी । नकळे कवणा ज्याची करणी ॥ ध्रु० ॥ धुंदांधःकार दाटे । मग तें रूप दिसे गोमटें । केलीं जीवपणाचीं लेणीं ॥ १ ॥ लेणीं विभूषित शोभे भुषिला । योगी जाणती निजतुरीय वहिला । योगें तूर्यपदाचे मिळणीं ॥ २ ॥ मिळणी होतां जाणपणाला । ज्ञाता नाहीं ऐसा झाला । न दिसे ज्योतिरुपाशीं तुळणीं ॥ ३ ॥ सोहिरा बोलणें बोलों गेला । सगुणदेशीं रावो निमाला, न दिसे मागें पुढें कोण्ही ॥ ४ ॥

*

## (५) भगवन्महिमा व भगवत्स्वरूपपर पदें.

पद १ लें.

अपरिमीत अविनाश अनामा ॥ ध्रु० ॥ निराकार निर्विकार निरालंब निजसुखधामा ॥ १ ॥ निरामय निर्गुण निरंतर निगम अगम्य आत्मारामा ॥ २ ॥ निरुपाधि निःसंग निर्मळ निर्भर नित्यानंद निरुपमा ॥ ३ ॥ अनादि अखंड अद्वैत अभेद अनवरत अमृतघन आरामा ॥ ४ ॥ देवा भक्तकल्पद्रुमा हृदयआरामा मुनिजन–मन–विश्रामा ॥ ५ ॥ जगदभ्रव्योमा पराप्रमदाप्रेमा सोहिरा म्हणे अगमा ॥ ६ ॥

पद २ रें.

आशीर्वचन वरदान भगवान हर देत सुख सुरस सागर परम निदान ॥ ध्रु० ॥ जेथ स्थान मानापमान नाहीं समान सकळांभूतीं कर दान मन कान वर आन स्मरत नसत वसत वनवासीं गिरि-कपट निकट अति भार जप तप पुण्यपरायण श्रीनारायणध्यान ॥ १ ॥ जेथ संत महंत अनंतरूप वसत गाती गुण रातदीन सांगात वेद तच्चरित त्वरित कल्याण मोक्षप्रद देती अवधान ॥ २ ॥ म्हणे सोहिरा अतीत ईश्वर पतीतपावन सनकादिक–मुनिजन–संभावन ब्रह्मा-विष्णु-महेश उत्पन्न गगन पवन जळ मही हुताशन स्थावर-जंगम संनिधानीं हें चळत अचळ हा परमानंद परात्पर पावत परम हें आत्मज्ञान ॥ ३ ॥

पद ३ रें.

कृपाब्धि हा भगवंत निजभक्तजनांचा कैवारी ॥ ध्रु० ॥ जो कां भक्तिबीजाचें क्षेत्र । प्राणी पुण्यश्लोक पवित्र । त्याला प्रसन्न

हा चिन्मात्र । विश्वचित्राचा चितारी ॥ १ ॥ ज्याची सत्ता नवही द्वारीं । हालवि मनपवनाची दोरी । ना तो पुरुष ना ते नारी । ऐसा गैबीसूत्रधारी ॥ २ ॥ जो जवळचि परी दूरी । पाहतां जीवाचिया भीतरीं । संकटसमयीं स्वरूपें धरी । नाना नटनाटक अवतारी ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे दशवे द्वारीं । अनाहतनौबतकी मतबारी । केवळ धरोनियां इतबारीं । राहिलों ज्याचिये दरबारीं ॥ ४ ॥

पद ४ थें.

तुला देव कधींच श्रमी न करी । त्याला तूं विसरसी ना क्षणभरी ॥ ध्रु० ॥ प्रपंच मिथ्या भ्रांतिच हे असे । ब्रह्म निरंतर सत्यचि तें दिसे । अंतरिं बाहेर तेंचि प्रकाशे । बसे निश्चय हा दृढ जरी ॥ १ ॥ भक्तकाजकल्पद्रुमस्वामी । तोचि चालक इंद्रियग्रामीं । प्राण्या भजसी जरि निष्कामीं । जगदुद्धारक हरी ॥ २ ॥ जन्ममृत्युजरादिक व्याधि । यांचें दुःख हें कधीं न बाधी । अनेक संसारिक उपाधी । सर्वचि श्रम परिहारी ॥ ३ ॥ भूतद्वेष हा किमपि नसेल । दैविदशा हे मनीं असेल । भूतदया हे हृदयीं वसेल । कवणचि न दिसेल अरी ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा देह हें ऐसें पाहीं । कहीं नासेल विश्वास नाहीं । त्वरित तूं कांहीं सार्थकीं राहीं । भजन करिसी लौकरी ॥ ५ ॥

पद ५ वें.

त्यानें भवसिंधु तरला । व्यापक अनंत जो विस्तारला ॥ ध्रु० ॥ ज्यानें निर्मियलें पिंड उदंड । निपट नाहीं तेथ कपट माव हे पृथ्वीपट चितारला ॥ १ ॥ जप तप ध्यानीं कीं पूर्वपुण्यें । हा निस्पृह हृदयीं वीतराग अवतरला ॥ २ ॥ अध्यासा या अभ्यासा-

मध्यें । मंत्र तंत्र जंत्र जो प्राणी चाखपाख उतारला ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा अंतरसाक्षि भगवंताला । भक्तचि ऐसा निश्चयरूपें करारासी उतरला ॥ ४ ॥

पद ६ वें.

दयाघनाचें रूप कीं हें । रूपावीण अरूप कीं हें ॥ ध्रु० ॥ भोजनावीण पोट भरतें । नादाविण कान निवती ॥ १ ॥ वाचा निमोनि निघती गोष्टी । रूपावीण संतुष्ट दृष्टी ॥ २ ॥ सत्ता देखोनि व्यापक गुप्त । अखंड आनंदीं मन हें तृप्त ॥ ३ ॥ चैतन्य प्याला पिऊं जाय । रसनेचा हा रसचि होय ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे घटमठ पाहीं । आकाश त्यांत असोनि नाहीं ॥ ५ ॥

पद ७ वें.

भज परमप्रीति भगवन्ताला ॥ ध्रु० ॥ नित्य ध्यानीं निरंतर गगनीं लय हें अन्वयलीला । विलोकीं तूं अचळ अरूप अनंताला ॥ १ ॥ सदानंद मूळकंद विबंधन चिद्घन । सुख चिरकाळ त्वरित घे अनुभववन एकांताला ॥ २ ॥ स्वगत विगत द्विभेद-रहित जो समयाधीन । सुदर्शन सर्वां अक्षयरूप जयवंत त्याला ॥३॥ म्हणे सोहिरा दत्तदिगंबर गुरु विश्वंभर अनुगृहीं तरे । संविद्बोधें निजनिरंजन मनरंजन सद्संताला ॥ ४ ॥

पद ८ वें.

भगवन्त निजभक्तजनांचा कैवारी । भवसिंधु तारी । पारावत कीं हें चंचळ मनपण मारी । नौके जन उतारी ॥ ध्रु० ॥ निरंजनीं निकट हें लक्ष लाहें । परतुनि पाहें । सकळहि व्यापक साक्षी तोचि आहे । निर्विकार राहें ॥ १ ॥ जो कां परमानंदाला मिळवी । मी कोण कळवी । प्रथमचि प्रीती देहबुद्धिला पळवी । अभिमान

गळवी ॥ २ ॥ बाळ—उन्मत्त—पिशाचवृत्ति । पिंडीं आवृत्तिं । ज्ञाना-वांचुनि नकळे स्वरूपस्थिति । देतो विदेहमुक्ति ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे इच्छिलें फळ देता । हा दुर्लभ दाता । त्रिभुवनपति एकचि हा अवघा पहातां । सुख वाटे गातां ॥ ४ ॥

पद ९ वें.

भगवंताचें नवल मोठें पाहीं । आपण असोनी कशाचमध्यें नाहीं । पंचभूतांशें कर्में घडती देहीं । झाला मेला दिसे प्रपंचाचे ठायीं ॥ ध्रु० ॥ एक गातो कीं एक खातो । चिंता वाहतो कीं निश्चिंत एक राहतो । एक येतो कीं एक वाटे जातो । दोरावरि कीं सर्प भासला तो ॥ १ ॥ बहुत प्राणी कीं विसरले देवा । विरळा कोणी कीं अनन्य करिति सेवा । एक सेविती केवळ विषयमेवा । दोन्ही न कळती त्या ब्रह्मस्वयमेवा ॥ २ ॥ अवघा संसार अभ्रिंची सावुली । नामरूपें हीं विचित्रचि बाहुलीं । यांना पिता नाहीं कीं माउली । चाल आकाशीं परत पाउलीं ॥ ३ ॥ दृष्टीं न दिसे तें सदैव आहे प्रत्यक्ष । दिसे तें मिथ्या नासे तेथ । याचा गेला समूळ ज्याचा हेत । सोहिरा म्हणे येथ कारण आपला हेत ॥ ४ ॥

पद १० वें.

भगवान् भवार्णव तारी । अनन्यगति शरणागतवत्सल भक्त-जनां कैवारी ॥ ध्रु० ॥ पुण्यश्लोक जे धर्मपरायण जो संस्थापनकारी । दुष्ट दानव मारी तो हा युगायुगीं अवतारी ॥ १ ॥ काया माया नसेचि आया निर्गुण पाया ज्याचा । सर्व खेळ हा त्याचा विश्व हें विचित्र चित्र चितारी ॥ २ ॥ परम प्रीति आभारीं संभुत संभव हा संभारी । ब्रह्मांड उभारी ब्रह्माहरीहर सुरनरउरगां भारी ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा पतीतपावन पूर्ण दयाघन गुप्त गहन आकारी । सज्जन-जनमनमोहन हा जगजीवन दीनोद्धारी ॥ ४ ॥

पद ११ वें.

भावें भगवान् हरि तो । वेळोवेळां तोचि स्मरतो ॥ ध्रु० ॥ जळस्थळव्यापक असोनि न दिसे । असेचि सभरांभरितो ॥ प्रल्हादास्तव प्रकटे स्तंभीं गर्जना करि नरहरि तो ॥ १ ॥ सदैव ज्याचें कीर्तन करितां । हृदयीं आनंद भरितो ॥ अनन्यगतिनें शरण आलिया । सुखदुःख हें परिहारितो ॥ २ ॥ निर्गुणसागर अचळ आपण । हारविहार करितो ॥ नानारूपीं या नाना रंग । उठवितसे जगलहरी तो ॥ ३ ॥ दैत्यमर्दनासाठिं उमटला । देव हाचि गौळ्यांघरिं तो ॥ म्हणे सोहिरा पूर्णब्रह्म हा । बहु अवतार धरी तो ॥ ४ ॥

पद १२ वें.

वैकुंठपती तो रमारमण स्मर । सुरनरकिन्नर वंदिती जगदुद्धार उदार ॥ ध्रु० ॥ हार हा कीं विहार सकळही मार भार विकार । साकारहि अनुकार जाण तूं विपरितबुद्धिविदार ॥ १ ॥ सार हा संसार तूं देख असार सांडि किसार । तुषार भव हा भुसार निवडुनि सत्कण हा चिदाधार ॥ २ ॥ म्हणे सोहिरा निवार हें येणें जन्ममरण अनिवार । ईश्वरपदारविंदीं पुनीत अलिवत् मन हें सुधार ॥३॥

पद १३ वें.

संकट भगवान् निवारी ॥ ध्रु० ॥ घडि घडि पल हरिस्मरण करितां । भवसागर हा तारीं ॥ समर्थस्वामी उदार दाता । भक्तजनां कैवारी ॥ १ ॥ गगानाहुनि जो सूक्ष्म ब्रह्म हा । अनादिनट विहारी ॥ लीलाविग्रही अनंतरूपिं जो । पुरुष नव्हे हे नारी ॥ २ ॥ म्हणे सोहिरा उदरभरणपोषण चिंता । पडों नेदि हे भारी । पुनरपि न घाली गर्भवासीं । जीवासि या संसारीं ॥ ३ ॥

## ( ६ ) श्रीदेवीपर पदें.

### पद १ लें.

जय जय महादेवी । तुज गाईन अनुभवीं ॥ ध्रु० ॥ अंतर-दृष्टीं नांदसी, सवें निजसुखें वससी । नससी अविद्याग्रामीं ॥ १ ॥ उभयपदींची स्वामिनी, सवें देखिजे निर्गुणीं । एकींएक तूं बरवी ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मग गुण गावया, या करीसी उपाया, चारीवाचा चेववी ॥ ३ ॥

### पद २ रें.

भज भवानी भगवती हे । आनंदी वरदायिनी ॥ ध्रु० ॥ चिद्घनवाटिका, ज्ञानदीपिका, परमामृतकूपिका, कल्पलता हे भक्तवत्सला, मनोहरा, सुंदरा, प्रिया श्रीनगरनायका, जगत्रय-जननी, विष्णुमायाविलासिनी, हे विश्वमोहिनी, चित्कला जे सत्रावी संजीवनी ॥ १ ॥ दिव्यांबरधारी, दिव्यलेपना, दिव्याभरणी, दिव्यकुसुमें दिव्यान्नेप्रिय, दिव्यप्रिया हे, आत्मरूपिणी, सर्वसिद्धिनी, साध्यसाधिनी, कामधेनू हे आदिकुमारी, जगदोद्धारी, जन्म निवारी, मरणा मारी, भवजल तारी, पार उतारी, हे सर्वांची स्वामिणी ॥२॥ म्हणे सोहिरा लक्षभेदिनी, भयानका, हे भवनाशिनी, भगमालिनी, लीलालालना, कळा नाटका, चिच्चंद्रिका, चित्कल्हारा, चित्तचाळका, चिदैकरूपा, चित्कैवल्या, भुवनेश्वरी हे, रामालंपट, कामातुर हे दृश्यवर्जिता, दुरितनिवारिणी, मंदाकिनि हे मोक्षदायिनी, परम-योगिनी, हे अनादि सौभागिनी ॥ ३ ॥

पद ३ रें.

माहेश्वरी ! कुमारगौरी ! ॥ ध्रु० ॥ तनुमनमोहिनी गहनी । तूं पराप्रेम सुंदरी ॥ १ ॥ निर्जीं निजसुखसदनीं । मदनीं सज्जन-वन वैराग्यआगारी ॥ २ ॥ सोहिरा म्हणे मजमाजी सहज । अर्ध-नटेश्वरनारी ॥ ३ ॥

## (७) श्रीशंकरपर पदें.

### पद १ लें.

जय जय शंभु सदाशिव शंकर पशुपति गिरिजावरा रे! ॥ ध्रु० ॥ नमन करुनि सद्भावें तुज मन अर्पण विश्वंभरा रे!। अनाथनाथ नमो दीनबंधु वांच्छित दे ईश्वरा रे! ॥ १ ॥ त्रिभुवनपति तूं सकलहि संपत्ति लंकापतीसि देसी वरा रे!। मुनिजनमोहन मानसहंसा ये मम हृत्सरोवरा रे! ॥ २ ॥ प्रसन्नता तव स्वप्रभ उदीत उदय विवेकदिनकरा रे!। प्रकाश पडतां आकाशभरि मति। विकास इंदूवरा रे! ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा भक्तिज्ञानवैराग्य सहपरिवारा रे!। पराप्रेम प्रमदासुख सैंवर ब्रह्मरंध्रगिरिवरा रे! ॥ ४ ॥

### पद २ रें.

तूं हर हर शंभु सदाशिवा! ॥ ध्रु० ॥ सर्व सोडुनी गर्व मोडुनि तोडुनि टाकीं तूं भवा। जटाजूट पशुपति तव पूजनीं, परम प्रीति हे जडो जिवा ॥ १ ॥ सकळहि सृष्टिकल्याणकर्ता, आनंदरूप तूं देवा। रुद्रा तूं वीरभद्रा प्रकटुनि हृदयीं, लावीं ज्ञानाचा दिवा ॥ २ ॥ म्हणे सोहिरा नवद्वारें, तुम्हीं परमामृत हें पिवा। शर्वा तूं बिनपर्वा करुनि दे आनंद हा नित्य नवा नवा ॥ ३ ॥

### पद ३ रें.

दिगंबरा जोगी जटाधरा शिवशंकरा तुजला नमो ॥ ध्रु० ॥ पंचमुख सुखशान्तस्वरूप तूं मदनदहन वनवास। गौरवर्ण वपु सुगंधहर जय जय जगन्निवास ॥ १ ॥ सुरवर गाती ध्याती तुज-

प्रति आनंद बारा मास । सत्यलोक वैकुंठभुवनावरि स्थान तुझें कैलास ॥ २ ॥ देह हें साजवी मनचि माजवी काळ वाजवी तास । प्रपंच करितां श्रमचि शेवट कांहींच नलगे हातास ॥ ३ ॥ बंधन सोडवीं वंदन करितो सद्भावें सोहिरादास । शमदमीं कोंडी इंद्रियें सोडी तोडी हा मायापाश ॥ ४ ॥

पद ४ थें.

या रे! शिवशंभूचें भजन कराया । भवसिंधु तराया ॥ ध्रु० ॥ होइल सार्थक या जन्माचें आजन्माचें । येणें मोचन या कर्माचें स्वधर्माचें । मूळबीज हें निजवर्माचें । विवेक सुमति सुनिश्चय चित्तिं धराया ॥ १ ॥ माया मृगजलवत् कां जाण । यांत भ्रमतो तो मूर्ख तूं जाण अजाण । याला भोगुनि त्यागी तो साधु सुजाण । शुद्ध भावें स्मर रे! गौरीहरा या ॥ २ ॥ ईशानेश हा स्मशानवासी । सकळ भूतावळि आहे त्यापाशीं । राज्य सोडुनियां निघाला तपासी । राम जपतो कीं त्रिविधताप हराया ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे हा विश्वाभ्र अंबर । ज्याला गाती हे नारद तुंबर । दशदिशांचें पांघुरला अंबर । जटाधारि हा अवधूत दिगंबर ॥ ४ ॥

पद ५ वें.

वंदीं तूं शिवशंकरा गिरिजावरा करुणाकरा । अंत नलगे अनंतरूप हें संत स्मरती जगदीश्वरा ॥ ध्रु० ॥ त्रिशूलडमरूधरा गजचर्मासह व्याघ्रांबरा । आरुढोनियां नंदिवरी आनंदयुक्त दिगंबरा ॥ १ ॥ पंचवदनवपु विभूतिलेपन शीरीं भूषित शशीधरा । जटाजूट करि भुजंगभूषण त्रिभुवनपति हरीहरा ॥ २ ॥ भवमोचना हे त्रिलोचना भज भक्तकाजतत्परा । प्राणियां तूं उगाणा करिसी

कुतमतत्परां ॥ ३ ॥ सार हा संसार हा परिपार पाव तूं नरा । अज्ञान नासुनि ज्ञान प्रकाशुनि ध्यान लावीं विश्वंभरा ॥ ४ ॥ पिंडींचा कीं ब्रह्माडींचा तो हा द्विधा अहं परिहरा । सोहिरा म्हणे तो हिरा जो कां अनुसरला मनोहरा ॥ ५ ॥

पद ६ वें.

शिव शंभु शंकर स्वामी । निजभावें पुजावा तुम्हीं ॥ ध्रु० ॥ विभूतिलेपन अवघे शरिरीं । व्याघ्रांबर गजचर्म धरी । वामांगीं ते गिरिजा नारी । कबरीभार जटाधारी ॥ १ ॥ पंचमुख त्रिलोचन भोळा । कंठीं धरिलें हळाहळा । वरी रुळती रुंडमाळा । आज्ञा समर्थ कळिकाळा ॥ २ ॥ आरुढोनि वृषभवाहनीं । ज्याला प्रियकर शंखध्वनी । डमरू त्रिशूल पिनाकपाणी । स्मशानवासी निर्वाणी ॥ ३ ॥ विराजित भूषणीं अजगर । शशिशेखर गंगाधर । ज्याची पूजा करिती अमर । ऐसा अवधूत दिगंबर ॥ ४ ॥ ऋद्धीसिद्धी ज्याच्या दासी । स्मरतां सकळ पातक नाशी । सोहिरा म्हणे निजभक्तांसी । उदार कैलासवासी ॥ ५ ॥

पद ७ वें.

शिवसांबचरणीं मन लावीं स्मरणाला ॥ ध्रु० ॥ या नैसर्गी इंद्रियवर्गाच्या उपसर्गा नासुनी स्वर्गा न्हे अपवर्गा देतो भर्गा विनवीं तूं दुर्गारमणाला ॥ १ ॥ देवकामिनी गगनगामिनी सौदामिनी सौंदर्यसुरत सुगंध तरुवर गीत नृत्य गंधर्व सुस्वरें संगीत गायन छंद बंध प्रबंध वादन नारद तुंबर तांडवलीला हावभाव कडविकड दाविती अमर वानिती सदानंद कैलासभुवनीं काळक्रमणाला ॥ २ ॥ शुभ्र सुमन सुगंधलेपन शुभ्र अक्षता कोमल त्रिदल बिल्वपत्र त्रिनेत्र त्रिगुणी त्रियायुधी कीं त्रिजन्माचें पाप संहरे धूप

दीप नैवेद्य निरंजन प्रदक्षिणा प्रीतीं प्रमाण करि तो न पडे भ्रमणाला ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा रुंडमाळा कंठीं हारी जटाजूटमुकुट मदनारी नारीनर संसारीं लीला सारीवत् जय हारी नाना चित्रविचित्रविहारी दशमद्वारीं स्वारी पवनारूढ अस्वारी अष्टौपारीं बारीधर करभारी हे सरदारी व्हमा मारी परोपकारी भज तूं न पडसी जन्ममरणाला ॥ ४ ॥

पद ८ वें.

शिव स्मर हर हर गिरिजावर ध्यानीं । भजनपूजनीं कल्याणकर्ता दाता हा वरदानी ॥ ध्रु० ॥ विभूतिविराजित पिशाचसहचर वास स्मशानीं । पंचवदन त्रिलोचन भूषित नाग कुंडलें कानीं ॥ १ ॥ गजचर्मवसन व्याघ्रांबरधर वर आसनीं । कैलासभुवनींचा नृपवर कीं तपोनाथ हा योगज्ञानी ॥ २ ॥ द्वापारयुगीं कीं किरातरूपें महाकाननस्थानीं । पार्थाप्रति हा झुंजत घेउनि तर्कस आणि कमानी ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा सकळ सृष्टिचा प्रळय करीत निदानी । भक्तकाजकल्पद्रुम शंभु आत्मसुखवरदानी ॥ ४ ॥

पद ९ वें.

शिव हर शंकर मदनारी । देह हें अर्पण तुज केलें ॥ ध्रु० ॥ तव भजन पूजन ध्यानीं मन हें । तन्मय होउन ठेलें ॥ १ ॥ चित्त हें गिरिवरवधुवल्लभा । स्वरूप पहाया भुकेलें ॥ २ ॥ जय विश्वेश्वर भगवान् स्मरतां । विषयस्मरण गेलें ॥ ३ ॥ जीवन्मुक्त करुनि भक्तांसी त्वां । कैलासभुवनीं नेलें ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे तरि होऊं सके । बहुत जन्मीं पुण्य केलें ॥ ५ ॥

पद १० वें.

सार्थक जन्माचें कर । भावें स्मर हरिहर । रमापति गिरिजावर । जनीं जनार्दन हा विश्वंभर ॥ ध्रु० ॥ आत्माराम पाहीं सखा ।

ज्याला नाहीं रूपरेखा । अनेका घटीं या एका । सर्वभूतीं ईश्वर ॥१॥ शांतिसुख नित्य वर । निजबोध निरंतर । निर्वाळुनी हें अंतर । अनाहत नित्य वाजे वाजंतर ॥ २ ॥ सोहिरा म्हणे हा अमर । अर्धनारीनटेश्वर । भक्तिभावाला तत्पर । पूर्णब्रह्म ध्याई हा परात्पर ॥३॥

पद ११ वें.

स्मर पार्वतिच्या वराला रे ! ॥ ध्रु० ॥ श्रवणमननानिदिध्यास नयनीं जनीं वनीं पाहुनी विसरीं तूं आपपराला रे ! ॥ १ ॥ जटाजूटमुकुट नीलकंठ त्रिलोचन पंचानन मुनिजनमनमोहन वृषभारूढ हराला रे ! ॥ २ ॥ खपरुडमरुधर पिनाकपाणी दक्षयज्ञमथन मदनारी देतो परम अभयप्रद वरदकराला रे ! ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा अर्चन वंदन आत्मनिवेदन नवविध भजन सकळहि संपत्ती चालुनि येति घराला रे ! ॥ ४ ॥

पद १२ वें.

हर हर भोळा । जीवीं जीवाचा जिव्हाळा ॥ ध्रु० ॥ जीवपणाला जाणोनी, जीवपणें आपणियातें नेणोनी, जो निराळा ॥१॥ एवंच योगसमाधी, बुद्धिवंता ठाकली बुद्धि, ते चित्कळा ॥ २ ॥ कर्ता करविता हे दोन्ही, नाहीं एकपणा लागोनी, जैसें तरुचें फळ जावळा ॥ ३ ॥ सोहिरा बोले अनेक जल्पा, ज्याचें स्वरूप आहे अरुपा, हें जाणे विरळा ॥ ४ ॥

पद १३ वें.

हरा रे ! दर्शन तूं देईं मज गिरिजावरा रे ! ॥ ध्रु० ॥ त्रिलोचना भवमोचना आकुंचन करीं मन उन्मन चिद्घन अणुरेणुव्यापक अमरा ॥ १ ॥ कपरदीश ईश स्मशानवासी भस्मधारण त्रिशूलडमरू पिनाकपाणी व्याघ्रांबरधर शिवशंकरा ॥ २ ॥ वृषभवाहना भुजंग-

भूषणा पंचानन नीलग्रीव शंभो शशिशेखर गंगाधर दिगंबरा ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा कल्पवृक्ष चिंतामणि सिद्धि आज्ञांकित तुज सकळिक साधन पूर्णकाम अभिवृद्धि अभयंकरा रे !

पद १४ वें.

हृदयीं हा शंभू ध्यातां आनंद वाटला ॥ ध्रु० ॥ कैलासभुवनिंचा राणा । वेदशास्त्रीं प्रसिद्ध जाणा । ज्याचा अवधुतित्राणा । पावोनी निर्वाणा भवसिंधु आटला ॥ १ ॥ प्रसन्न झाला व्योमकेश । इच्छिलें पावलों यश । उरला ना भ्रांतीचा लेश । वेषधारी लीलाविग्रही अंतरीं दाटला ॥ २ ॥ शांतीशीं हें लाउनि लग्न । मन हें होउनि गेलें मग्न । वैराग्य पेटला अग्न । संलग्न सकळा नोहे कवणाचा हा वाटला ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे समाधी लागे । निद्रेमाजी असणें जागें । कल्पना हे न लागे मागें । केव्हां नेणों काय इंद्रियग्राम राहाटला ॥ ४ ॥

## ( ८ ) श्रीविठ्ठलपर पदें.

### पद १ लें.

तो हा पंढरिचा राणा । व्यापक अणुरेणुप्रमाण जाणा ॥ ध्रु० ॥ दृष्टीं दिसतो सुजाणा । ज्यानें न्हेलें मीतूंपणा ॥ १ ॥ तो हा त्रिभुवनचाळक । स्वामी विश्वाचा पालक ॥ २ ॥ अनंतरूपीं एक । ब्रह्मांडनायक ॥ ३ ॥ अनाथदीनबंधु । जो कां सुखरूप कृपासिंधु ॥ ४ ॥ ज्याची अनाहतनौबत वाजे । राजा गैबीचा विराजे ॥ ५ ॥ भेदुनियां नादबिंद । योगियां लावितो समाध ॥ ६ ॥ जो निर्गुण निरामय । भक्तां करितो आनंदमय ॥ ७ ॥ ज्ञानगंगाचंद्रभागा । आहे तटाकीं उभा ॥ ८ ॥ निश्चय पुंडरीक जेथें । देखोनी जवळिच आहे तेथें ॥ ९ ॥ निराकार निर्विकार । जेथुनि उमटला ॐकार ॥ १० ॥ आरंभरंभास्तंभ । सोहिरा म्हणे निरालंब ॥ ११ ॥

### पद २ रें.

विठ्ठल रुक्मिणीरमण । चुकवी अनेक भ्रमण ॥ ध्रु० ॥ जीवा नुरवी जीवपण । समूळ न्हेतो मीतूंपण ॥ १ ॥ त्याचे लक्षुनि चरण । अनन्य यावें कीं शरण ॥ २ ॥ त्याचें घेतांचि दर्शन । करितो मन हें समाधान ॥ ३ ॥ कूर्मदृष्टी निरीक्षण । करितो भक्तांचें रक्षण ॥ ४ ॥ जो कां योग्यांचा एकांत । तो हा लक्ष्मीचा कांत ॥ ५ ॥ जगबुद्बुदाचें जळ । सोहिरा म्हणे हा गोपाळ ॥ ६ ॥

# (१) श्रीकृष्णपर पदें.

### पद १ लें.

आणी आणी सये यदुराज ॥ ध्रु० ॥ स्वरुपानुसंधानीं, श्रोत्रत्व वेधुनी तोंचि निजकानीं कुंडलें विराज ॥ १ ॥ जगदाभास हा अभिन्नपणीं, देखति नयनसरोज ॥ २ ॥ एकवर्ण हे शामतनु दिसे । पुरुषार्थ चतुर्भुज ॥ ३ ॥ अंतरदृष्टि हे त्रिकुटावरी, भाळीं तिलक देख रज ॥ ४ ॥ कदंबावरुनि हरि गोधनें चारी, मुखीं अनाहतवेणु वाजे ॥ ५ ॥ मूर्ति मोहनीं आणुनियां मनीं, सोहिरा योजी निजकाज ॥ ६ ॥

### पद २ रें.

गिरिवरधर गोविंदा, त्या नंदनंदना वंदा ॥ ध्रु० ॥ तपें तपति जे मुनिजन जपती, त्यांची विपत्ति नाशित श्रीपति, तो हा कुंजवनाप्रति, यौवनयुवतिजातिप्रति, प्रतिदिनिं हा अति विलसत रतिछंदा ॥ १ ॥ सज्जनजनमनरंजन, हा भवभंजन निरंजन निर्गुण तो गर्जन करि हरि, व्यंजन भरी त्या भुवनत्रयमूळकंदा ॥ २ ॥ अंतवंत जीवजंत नेणसी, खंत उपजुनि दंत विचकिसी, तंत नाहीं तुज अनंतभजनीं, संतसमागम न रुचे तुजला न सुचे, कांहीं विस्मृतिनें मतिमंदा ॥ ३ ॥ खगासनावरि अघनाशन, जो ग्रासन करितो प्राशन सकळिक, काळकलित हा, दुरित त्वरित हरि स्मर नित्य अनित्य सर्वहि सोडुनि धंदा ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा यदुवंश-दिनमणि, कीं दुर्धर रणीं, विजय सुरगणीं, नमियला धणी, जगाचा वेषधारि जो शेषशयन हा सदैव दे आनंदा ॥ ५ ॥

पद ३ रें.

गोविंद वंद्य तो नंदसुत आनंदकंद आराम ॥ ध्रु० ॥ मंद अनिळ सुगंध शीतळ निश्चळ चंद्रीं व्योम । सुंदर मेघश्याम मनोहर कुंजर गोपिंसि काम ॥ १ ॥ वसंत अवघें पसंत वन करि शांत मदनोद्दाम । अति रति करितां बल्लवयुवती पावती मोक्ष निजधाम ॥ २ ॥ हाटति तपियें दाटिति पवना आटिति इंद्रियग्राम । म्हणे सोहिरा सर्व घटीं हरि देखति आत्माराम ॥ ३ ॥

पद ४ थें.

चार चारती धेनु रे ! । गोपाळ वाजवी वेणु ॥ ध्रु० ॥ उषःकाळीचे समयीं, गिरिधर प्रेमलयाच्या ठायीं । नुपुरें वाजती रुणझुणु ॥ १ ॥ शुक बोलत होते शब्द ऐकोनि झाले स्तब्ध । नादीं लुब्धला हरिणु ॥ २ ॥ तर्कस लाउनियां, पारधियें ओढिली कां नाडी । ऐकोनि विसरला तो बाणु ॥ ३ ॥ गुण ऐकोनि दुर्लभ, सोहिरा म्हणे होतो लाभ । ऐशा कैसा ध्यानीं नाणूं ॥ ४ ॥

पद ५ वें.

तो हरि गोवर्धनधारी आधारी ॥ ध्रु० ॥ गोपवधुमुखमधुर-पान करी, सुरस तान बनवारी । रासरंग रसदंग अनंग नटीं, नटत हे कुंजविहारी ॥ १ ॥ दानवमर्दन जनगुणवर्धन, रूप साकारी । सज्जनजनमनरंजन, वंद्य तो नंदसुत पूतनारी ॥ २ ॥ बाललालन यौवनलीला, व्यासमुखें उच्चारी । सद्भावें भागवतश्रवण करि तया दीनजनां उद्धारी ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा रूपरेखविण अनंतरूप हें निर्गुण निराधारी । वैकुंठभुवनिंचा रमापति हा पूर्णसुख अवतारी ॥४॥

पद ६ वें.

तो हरि स्मर गोकुळिं काना ॥ ध्रु० ॥ मधुसूदन मुखकमल आमोदीं मधुकरवत् प्रीति गोपवधू त्या रति सुखलालन अमृतपाना

॥ १ ॥ फणिवरमर्दन धरि गोवर्धन हरि गुणवर्धन करित जनार्दन प्रताप नाना ॥ २ ॥ द्वैत नाशुनी ज्ञान प्रकाशुनि पारंपर उपदेशुनि उद्धव उद्धरिला सद्भक्त निदाना ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा नाम जे जपती विपत्ति नासुनि संपत्ति पावती मोक्ष परम श्रीपतिवरदाना ॥४॥

पद ७ वें.

मुकुंदा ! आनंदकंदा ! ॥ ध्रु० ॥ तुजलागीं ध्यातां । हृदयीं दिससी सर्वदा ॥ १ ॥ निजस्वरूप देखतां भवबंध तुटतां । नलगे जनां हे आपदा ॥ २ ॥ सनकसनंदना योगिया दुर्लभा । तें सुख निजपदा ॥ ३ ॥

पद ८ वें.

या हो या ! वर गिरिवरधारी रंग बहार ॥ ध्रु० ॥ मोहन मूरत सांवळी सूरत । मोर मुकुट आभार ॥ १ ॥ नेसी पीतांबर, निजमुखीं सुस्वर । मुरलीध्वनि हे नभभर ॥ २ ॥ सोहिरा म्हणे तुझे कृपेकरुनी । न धरेचि हा भवभार ॥ ३ ॥

पद ९ वें.

येई बा ! हरि सांवळिया ॥ ध्रु० ॥ अहर्निशीं गोधनें चारिसी न दिससी गोवळिया । सहस्र गोपींत तूं खेळसी आनंदें घालिसी गोंधळिया ॥ १ ॥ कदंबाचे तळीं मुरली वाजतां ऐकुनि येती मज कळवळिया । सर्व रूपीं तूंचि एक देखोनि सोहिरा म्हणे गातों लळिया ॥ २ ॥

पद १० वें.

शरण ये तूं रमापती । पाव मोक्षसुखसंपत्ती । शेषशयन हरि कमलनयन स्मर यमदूत हे कांपती ॥ ध्रु० ॥ शामसुंदर

वैजयंती गळां चारी भुज विराजती । किरीट कुंडलें मुकुट मेखळा क्षुद्र घंटिका वाजती ॥ १ ॥ श्रीवत्स कौस्तुभ गोपीचंदन नामें सूक्ष्म साजती । श्रीललित नीलतनुवरी पीतवसनी विज्जु लाजती ॥ २ ॥ माळ मंजरी गदापद्म धरी शंखचक्र चहुं हातीं । दीनोद्धार उदार कृपानिधि मुनिजन ज्याला ध्याती ॥ ३ ॥ मत्स्यरूप धरी प्रवेशे सागरीं शंख मारि महामति । वेद उद्धरी धर्म सिद्ध करी प्रथम अवतारी रीति ॥ ४ ॥ कूर्मरूप धरी पृथ्वी पृष्ठिवरि दानव प्रबळ बलोद्धति । हिरण्याक्षिया दमुनि सोडविली वराहरूपें हे क्षिति ॥ ५ ॥ भक्तराज प्रल्हाद वैष्णव स्मरणा नाहीं विस्मृति । तया पितया कारण नरहरि प्रकट स्तंभाप्रति ॥ ६ ॥ आत्मनिवेदन बळी प्रतिग्रह वामनद्विजरूप यथास्थिति । पाताळ भुवनिचें राज्य देउनी द्वार रक्षितो परमप्रीति ॥ ७ ॥ क्षत्रिय मारिले वचन पाळिलें जंनानि रेणुकासती । परशुरामें शितीं लावुनी शर हा फिरविला अपांपति ॥ ८ ॥ लंकापतिप्रति युद्धप्रसंगीं वानर ज्याचे जुत्पति । दाशरथीराम रंगधीरवीर रामचंद्र सीतापती ॥ ९ ॥ नंदसुत अद्भुत पराक्रमी प्रवर्तला अति नति । गोकुळिं काना नाना लीला गोपवधूंशीं करि रती ॥ १० ॥ बौद्ध कल्की युग कलीचें प्रस्तुत अदृश्य गति । म्हणे सोहिरा भक्त रक्षितो प्रकटुनि युगायुगाप्रति ॥ ११ ॥

पद ११ वें.

शामसुंदर घननीळा ! ॥ ध्रु० ॥ तुझा तूंचि एकचि साचा । तुजवीण नाहीं वेगळा ॥ १ ॥ थोरथोरां देव सुरवरां । नाकळेचि तुझी लीळा ॥ २ ॥ आत्मानुभवें प्रेमस्वभावें योगियांसी जिव्हाळा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निजदेहीं सुखामृत । पूर्ण तूंचि कीं चित्कळा ॥ ४ ॥

### पद १२ वें.

शार्ङ्गपाणी आणि आणि हो ! ॥ ध्रु० ॥ विरहपणें मज नाहीं निजीं निज । विषयसुख नयनीं नाणीं ॥ १ ॥ मथुरेसी जाउनी सर्वेचि घेउनी । येईं सये वो ! साजणी ॥ २ ॥ गोरस घेउनी नित्य सेवितो । सोहिरा वंदि हो ! निजदानी ॥ ३ ॥

### पद १३ वें.

स्मर कानया कृष्णा ॥ ध्रु० ॥ सज्जनरंजन हा भवभंजन व्यक्तिवितृष्णा । आनंदनादबिंद्वाविरहित विशिष्ट उत्पत्तिष्णा ॥ १ ॥ रविरूप हे सत्ता ज्याची कडाडीत उष्णा । शशिमाजीं भूतरसात्मकीं हें जीवनरूपें पुष्णा ॥ २ ॥ वाढविसी बहु कशासि मृगजळीं आशा आणि तृष्णा । तनुमनधन अपहारचि केलेंसि उदरा आणी शिस्ना ॥ ३ ॥ कर्मं योनीबंधन घडतें न सुटे भोग उसणा । जन्मा येउनि सुखदुःखा मग कशासि हो रुसणा ॥ ४ ॥ भक्तीला भाळतो देव मग हृदयीं करीं घृष्णा । म्हणे सोहिरा एतद्विपयीं करणेंचि प्रश्ना ॥ ५ ॥

## (१०) श्रीरामपर पदें.

### पद १ लें.

रामभजन मनरंजन ॥ ध्रु० ॥ मीपणनाशक निजप्रकाशक । सर्वें करी भवभंजन ॥ १ ॥ ध्यानीं जो निपुण आपेंचि आपण । होउनि ते जन विजन ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निशिदिनीं । प्रेमें गाती ते निज सज्जन ॥ ३ ॥

### पद २ रें.

राम धणी माझा अलग देखेन मी कधीं हो ! ॥ ध्रु० ॥ माया अहंकार सर्वहि निरसुनी शर्वपदीं सम मानिं तदीं हो ! ॥ १ ॥ सर्व सुदीन हरि दुःख निवारीं । पार करीं भवनीरनदी हो ! ॥ २ ॥ निजज्योतिकळा दावीं घननीळा । सोहिरा शरण तव निजपदीं हो ! ॥ ३ ॥

### पद ३ रें.

रामा काय तुज विसरूं रे ! ॥ ध्रु० ॥ पाहतां नयनीं जन तद्रूप अवघे । दिधलासी पूर्ण अभेदवरू रे ! ॥ १ ॥ समसाम्य समावुनि निजरूप दावुनी । ठेविसी निजनिलयासी स्थिरू रे ! ॥२॥ बोलवेना बोलें ऐसें तुवां केलें । सोहिरा म्हणे देहींच तरूं रे ! ॥३॥

### पद ४ थें.

निजजिवीचा जिवलग राम बोल ॥ ध्रु० ॥ तनुमनध्यान करोनि निमग्न । घे अनुभव सखोल ॥ १ ॥ जिवशिव दोन्ही

वेगळे नाहीं । ऐसें ज्ञान गमेल ॥ २ ॥ प्रेमानंदीं धरोनि विविधीं । चित्त स्वरूपीं जडेल ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मग निवृत्ति पावोनी । प्रवृत्ति दिसे नवल ॥ ४ ॥

पद ५ वें.

श्रीराम वदनीं वद बा ! रे ! प्रियकर भक्ता ॥ ध्रु० ॥ दोन्ही करकमळ सज्जित, टाळी पिटीं कीं रे ! निभ्रांता । घोष करीं नाम गर्जत, आणीं निजनयनीं अव्यक्तव्यक्ता ॥ १ ॥ लक्ष निजस्वरूपीं लाहें, त्यांत परब्रह्म आहे । दुजें निजदृष्टिं न पाहें मार्ग लक्षिती तुज निजमुक्ता ॥ २ ॥ माया प्रवृत्तीचा भास, व्यर्थ सर्वचि होत शोष । जातो वयाचा नाश, सोहिरा प्रार्थितसे निजस्वरूप उक्ता ॥ ३ ॥

## (११) संतमहिमापर पदें.

### पद १ लें.

आणि या संतांचें दर्शन नित्य रूप घ्यावें हो ! ॥ ध्रु० ॥ येउनियां मृत्युलोकीं । आत्महित अवलोकीं । अध्यात्म ऐकावें मुखीं । असावें कीं सदा सुखी । स्वस्थ भावें करूनियां, त्याच अर्थी चित्त द्यावें हो ! ॥ १ ॥ स्थूलदेह नासुनि जाय । मग कोठें आहे काय । याचा मोह धरोनि काय । वैराग्य हें हृदयीं होय । ऐसें आत्मज्ञान पूर्ण मनाला या व्हावें हो ! ॥ २ ॥ तन्मयें तद्रूप व्हावें । स्वरूपीं सुदृढ भावें । सर्वभूतीं तेंचि ध्यावें । अखंडित तेंचि गावें । ब्रह्मरस पिउनि महाआनंदांत यावें हो ! ॥ ३ ॥ वर्णिलें जें वेदांतीं । चैतन्य हें आदिअंतीं । सांगितलें नानाग्रंथीं । साधन हें नानापंथीं । अलक्षीं हें लक्ष लावुनि एकांताला न्यावें हो ! ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे हेंचि माग । याचि मोक्षकामा लाग । भ्रांतीचा हा फिटेल डाग । विश्व नाहीं तेथ जाग । असोनि कीं याचि देहीं, नलगे मग भ्यावें हो ! ॥ ५ ॥

### पद २ रें.

ऐसा असला तरीच साधू म्हणूं आम्हीं त्याला । समाधीचें स्मरण होतां अद्वयअम्मल प्याला ॥ ध्रु० ॥ प्रथम ज्यानें मी हा कवण विवेक पाहिला । दोन्ही पाहुनि झाला पिंडब्रह्मांडावायिला । मग जें उरे परब्रह्म होउनि राहिला ॥ १ ॥ घृतासाठीं दूध पोटाळुनि जन्मवरी । असला तरि तें बा ! तोंडीं न पडे लौकरी । तैसे सगुण चाळुनि ज्ञानें चाळविल्या निर्धारी ॥ २ ॥ सृष्ट्यादि

अवतार ज्याला तरंगाप्रमाणें । ते ते ठायीं जाईना तो, मुळिचेंचि जळ जाणें । व्यापक ज्याचें मनचि गगना, नाहीं येणें जाणें ॥ ३ ॥ न शोधितां ज्यानें नाथसंकेत साधिला । रेचक-पूरक-कुंभकाविण, वायुचि हा प्याला । नवहि द्वारीं चळतां, दशवें द्वारीं स्थिरावला ॥ ४ ॥ ज्या वर्णाचे देह ते ते हाट नच मोडी । मोलें रडती तैसी प्रपंचमाया हे न सोडी । श्रवणमननिदिध्यासें घेतो निजसुखाची गोडी ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे भेटेल तव्हां, तोचि आमुचा देवु । न्हेइल तेथें त्याचेसंगें सुखें आम्हीं जाऊं । त्याचे चरणीं माथा आम्हीं वेळोवेळां ठेवूं ॥ ६ ॥

### पद ३ रें.

ऐसे जाणावे ते भक्त । तेच योगी तेचि मुक्त ॥ ध्रु० ॥ पराक्रमळ परपराग । तेथ गुंतति जैसे भृंग ॥ १ ॥ निरंजन हेंचि गुळ । तेथ मुंगीच केवळ ॥ २ ॥ अनाहत नागसर चांग । तेथ जैसे कीं ते भुजंग ॥ ३ ॥ समाधिधन निजज्योति । तेथ पायाळचि म्हणविती ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे सत्रावीचें जीवन । तेथ निःसिम जैसे मीन ॥ ५ ॥

### पद ४ थें.

तो भगवन्ताचा दास । ज्याचें मनचि नित्य उदास ॥ ध्रु० ॥ टाकुनियां खेदास । न भुले मास आणि मेदास । निरसुनियां भेदास । अक्षय पावे ब्रह्मपदास ॥ १ ॥ जेवीं भुजंग हा नादास । किंवा चकोर हा चांदास । चिंतनीं देव पावे सादास । अखंड भोगी सच्चिदानंदास ॥ २ ॥ शास्त्रें नलगेचि शोधास । किंवा प्रवर्तेना वादास । जेवीं भ्रमर आमोदास । सेवी सुमनमकरंदास ॥ ३ ॥ कोठें न पावेचि बंधास । जो कां देखे मूळकंदास । लागे भजनाच्या छंदास । नित्य आठवी गोविंदास ॥ ४ ॥ न करी विषयाची आस ।

सोहिरा म्हणे हें वरदास । योग्य जो सद्गुरुच्या वरदास । न चुके आपुलिया बिरुदास ॥ ५ ॥

पद ५ वें.

निज निलय निवासी जोगी हो ! ॥ ध्रु० ॥ नित्य निरंजनीं निद्रा । चिन्मय लेउनि कानीं मुद्रा ॥ १ ॥ अखंडित सोऽहंजप । शिरीं तन्मयाचा टोप ॥ २ ॥ सर्व वृत्ति तांगाडिया । चाले पश्चिमे गोदडिया ॥ ३ ॥ भक्ति–वैराग्यें वाहविलि । शुद्धसत्त्व ज्याची सैली ॥ ४ ॥ अनुहातशिंगी वाजे । तेणें गगनमंडळ गाजे ॥ ५ ॥ नादबिंदु कला ज्योति । अंगीं लाउनि विभूती ॥ ६ ॥ भोगी असतां जो वितरागी । सोहिरा म्हणे राजयोगी ॥ ७ ॥

पद ६ वें.

मनीं चिंती तो भगवान् । प्राणी मोठा भाग्यवान ॥ ध्रु० ॥ थोर आणि लहान, ज्याला सर्वही समान । न धरी कोणाची गुमान, कांहीं नलगे आदरमान ॥ १ ॥ पुढें जाणुनि निदान, आधींच देह करी दान । हरिगुणानुवादान, नित्य करी पवित्र कान ॥ २ ॥ चाले वेदनिरोपान । अवरोधी प्राणापान ॥ ३ ॥ जन्ममृत्यूचिया भयान, त्याचें जतन करी ध्यान । सोहिरा म्हणे झालें त्याला, पूर्ण ब्रह्मज्ञान ॥ ४ ॥

पद ७ वें.

साधु या प्रकारचे हो ! प्राणी । तूं ध्यानीं आणी । दृश्यभासाला दृष्टीं नाणी । ज्याचे पिढीं नांदते तूर्याराणी जाणा हो ! जाणा ॥ १ ॥ अद्वैताचें भजन करीत । हा लाभ त्वरीत । घेउनि बैसति आनंदभरीत । सहजसमाधिवनितेला वरीत जाणा हो ! जाणा ॥ २ ॥ जन्मा येउनि परम दक्ष । साधिति मोक्ष । लाविती

निरंजनीं लक्ष । सकळ व्यापक स्वरूप हें अलक्ष जाणा हो ! जाणा ॥ ३ ॥ केवळ संतोषाचे गोळे । हृदयींचे भोळे । मन हें प्रेमामाजी लोळे । लागती ज्यांचे परब्रह्मीं डोळे जाणा हो ! जाणा ॥ ४ ॥ टाकुनि इतर सकळ धंदा । लागति छंदा । भेदुनि गेले हो नाद-बिंदा । जाउनि मिळाले जगदादिकंदा जाणा हो ! जाणा ॥ ५ ॥ जे जे समयीं जें घडलें साहती । पाहण्याला पाहती । निजींचा निदि-ध्यास वहाती । अखंडीत जे निरालंबिं राहती जाणा हो ! जाणा ॥ ६ ॥ सोहिरा म्हणे हो त्यांचे तोडी । नाहीं दुसरी जोडी । त्यांची त्यांनाच ठावी गोडी । परमामृतसागरीं दिधली बुडी जाणा हो ! जाणा ॥ ७ ॥

पद ८ वें.

संत जातीचे सर्वांसीं अद्वेषी । हकनक त्यांला हे सर्वहि जन कीं द्वेषी । वरती दाविती गवलता हे देशी । त्यांच्या सन्मानें परम होती क्लेशी ॥ ध्रु० ॥ गायी हिंदूसी परम पूज्यमान । देखुनि दुश्चित मनिं हे मुसलमान । खाउनि दुभतें कीं निदानीं हे बेइमान । सुंदर वनितेचा कामिक पुरुष दुस्मान ॥ १ ॥ वृक्ष आहे कीं उगाचि आपुले ठायीं । वाटे न जातो तो मौजेन घाली घायी । तो तंव कोणाचें कांहिच खात नाहीं । अन्यायाविणें घडती हे अपायी ॥२॥ चंद्रोदयीं कीं समस्त सुखी होती । तस्कर देखोनि परम दुःखी चित्तीं । अस्त व्हावा हें सतत हृदयीं चिंती । निंदक जनांसी साधुची तैसी खंती ॥ ३ ॥ हंस सेवितो सहज मुक्ताफळें । स्वाद कैसा तो नेणती कावळे । त्यांच्या अंगिचें जरि का मांस मिळे । मूर्ख साधूंच्या लांछनीं देती डोळे ॥ ४ ॥ ज्याणें साधुची संगती करावी । त्याणें आधींच पुरती पारख घ्यावी । जीवींची खुण हे जातिनिशीं समजावी । सोहिरा म्हणे परतुनि प्रीत विटों न द्यावी॥५॥

पद ९ वें.

संतसमागम हाचि सुगम ॥ ध्रु० ॥ ज्यांचे कृपादिठी, वस्तुसि भेटी । निजीं निजसुख उगम ॥ १ ॥ ज्यांचे वचनोक्तीं लाभे मुक्ति । जहीं मौनावले निगम ॥ २ ॥ सोहिरा म्हणे, चित्सागरीं । मिळे त्रिवेणीसंगम ॥ ३ ॥

पद १० वें.

संतांचे दुर्गुण टाकुनि श्रेष्ठचि गुण घ्यावा ॥ ध्रु० ॥ सुमनीं सुवास येतो मोठा । शेवंती सर्वांगाला कांटा ॥ १ ॥ दीपाअंगीं अवगुण असती । प्रकाश होतां अवघे न दिसती ॥ २ ॥ द्वाड वनिता हे रूपवति । कामिक पुरुपा प्रियकर होती ॥ ३ ॥ धनाची मोट ओझें भारी । केंवी त्यागिति नर संसारी ॥ ४ ॥ समुद्र क्षार न शमवी तहान । पुण्यासाठीं करणें स्नान ॥ ५ ॥ हिरा कठीण नव्हे अरुवार । लेइल्या होती तालेवार ॥ ६ ॥ क्रूर स्वभाविया रणशूर । त्याला अवश्य पाळी धूर ॥ ७ ॥ बाळ उन्मत्त पिशाच्च साधु । मात्राचि घ्यावा ब्रह्मबोधु ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे ग्राहक ज्याचा । तोचि संग्रह करील त्याचा ॥ ९ ॥

पद ११ वें.

ज्ञानगंगातीरवासी वैरागी ॥ ध्रु० ॥ हांसत खेळत डोलत बोलत नित्य वैरागी । तन्मयवीजा सेउनि सहजा रंगे निजरंगीं ॥ १ ॥ चिन्मय गोपीचंदन नामें उजळी सर्वांगीं । बोधकमंडलु दंडविवेक त्रिवेणीमार्गीं ॥ २ ॥ चालत चालत पश्चिमपंथीं मध्यमा सुरंगीं । भोगुनि त्यागी जो वितरागी सोहिरा म्हणे राजयोगी ॥३॥

---

## (१२) सद्‌गुरुमहिमा व सद्‌गुरुभक्तिपर पदें.

### पद १ लें.

गुरुकृपें आजि अविनाशसुख जोडलें ॥ ध्रु० ॥ दर्शनें विदेहाच्या, देहाचें भान मोडलें ॥ १ ॥ पूर्ण प्रेम पिणें, न कल्पिणेंचि हें सोडिलें ॥ २ ॥ सोहिरा म्हणे शून्येंचि, चैतन्यीं हें मन ओढिलें ॥ ३ ॥

### पद २ रें.

गुरुजी ऑलख निरंजन ॥ ध्रु० ॥ व्यक्ति ना वर्ण, तें ऐकोनि कर्ण । निवालें अंतःकरण ॥ १ ॥ ज्याचेनि दयेन, समाधिशयन । स्थिर झाले नयन ॥ २ ॥ दिवस ना राती, तैल ना वाती । उजळली दीपज्योती ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे आरंभरंभास्तंभ विकासला निरालंब ॥ ४ ॥

### पद ३ रें.

मजमाजी जागली हे । सहजेंचि सद्गुरूची कृपा ॥ ध्रु० ॥ स्वात्मसुखाचा उगम मीनला । अनुभव हा सोपा ॥ १ ॥ आपआपें देखोनि ठेविलें । दूरीच पुण्यपापा ॥ २ ॥ दृश्य हारोनी दर्शनीं भरिलें । द्रष्टत्वाच्या मापा ॥ ३ ॥ सकळ जप हे टाकुनि होय । जपाचि हा अजपा ॥ ४ ॥ जाणिव तम हा हारोनि उजळिलें । स्वयंप्रकाशदीपा ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे म्यां मीनलों । निवृत्तिभुवनाचिया भूपा ॥ ६ ॥

पद ४ थें.

लागलें मन हें गुरूच्या चरणीं ॥ ध्रु० ॥ टाकुनि अग्र पवन। गगन आपहि धरणीं ॥ १ ॥ नाना कुंभीं हा प्रतिबिंबी । एकचि तरणी ॥ २ ॥ जो कां अनाम आत्माराम । आराम नामस्मरणीं ॥ ३ ॥ आगमांनिगमां न कळे ज्याची । अघटित हे करणी ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे म्यां पुनरपि । न पडे जन्ममरणीं ॥५॥

पद ५ वें.

श्रीगुरुप्रसादें आनंद ॥ ध्रु० ॥ एकीएक हा सर्व समूहा । दावुनी खंडितो भेदाभेद ॥ १ ॥ कायाकमळीं मन हा भ्रमर । बैसोनि सेवितसे आमोद ॥ २ ॥ सोहिरा म्हणे निजज्ञान बरवें । ज्याचेनि होय सर्व सिद्ध ॥ ३ ॥

पद ६ वें.

श्रीगुरुसी भजें आजि मना रे! ॥ ध्रु० ॥ चंचळपण टाकुनि घेई । सहजसुख हें मजमाजी मना रे! ॥ १ ॥ निरंजनीं रंजोनियां उमज कीं हें निजकाज मना रे! ॥ २ ॥ सोहिरा म्हणे आपणापें। तूर्येचा धरिं माज मना रे॥ ३ ॥

पद ७ वें.

सद्गुरुकृपावृष्टिं उघडे दृष्टी ॥ ध्रु० ॥ नित्य अनित्य पाहोनी। ज्यांहीं निजस्वरूपीं लय लावोनी । दिधली अवभासासी पृष्ठी ॥१॥ भवभ्रमासी हेळोनी । सर्वे निज उगमासी मेळोनी । हरिली जीवदशेची गोष्टी ॥ २ ॥ ज्याचेनि निज हरिखें । सोहिरा जीवशिव हे नोळखे । ज्याला तूर्यपद समेष्टी ॥ ३ ॥

पद ८ वें.

सद्गुरुचे कृपेनें झालें मनचि हें तन्मय ॥ ध्रु० ॥ दिठीची उफराटी मिठी पडोनी । मीनलें निरामय ॥ १ ॥ अपरा हारोनि परा मिळाली । उपरतिसुख हें अप्रमेय ॥ २ ॥ अहंसोहं हें नुरवुनि आलें । मजमाजि चिन्मय ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे मग वाटे आला । हा बरवाचि समय ॥ ४ ॥

पद ९ वें.

सद्गुरुसी हटका । आतां करा आपली सुटका । दृश्यभास नाश पावे । स्थीर नोदे घटका ॥ ध्रु० ॥ लिंगदेह यमदूतां सांपडेल अटका । आत्मज्ञानें उमजुनियां आधींच तुम्हीं सटका ॥ १ ॥ करितो लीला टिळेमाळा । प्राणि नीटनेटका । केव्हां नेणों पाठिवरी । काळ मारिल मुठका ॥ २ ॥ भजनावांचुनि वेळ कधीं । घालवुं नका लटका । मनीं राम मुखीं नाम । करीं मार चुटका ॥३॥ सोहिरा म्हणे राहुं नका । घट जसा फुटका । निरंजनीं पूर्णबोध प्रेम पिवा घुटका ॥ ४ ॥

# (१३) स्फुट पदें.

पद १ लें. ( जोशी. )

आजी चंद्रासारिखा हाता आला, सूर्यासारिखा भय पडला, गगनासारखा घांट जेथ ॥ १ ॥ आजी आत्म्यासारिखा समर्थ, विरक्तिसारिखा परमार्थ, बोलासारिखा अर्थ, हाता आला ॥ २ ॥ आजी करणीसारिखी चाल, मौन्यासारिखा बोल, विवेकासारिखें नवल घाटलें जेथ ॥ ३ ॥ आजी अकर्त्यासारिखी करणी, जित्रंता-सारिखा मरणीं, वैराग्यासारिखी हरणी, निवाली जेथ ॥ ४ ॥ आजी अकर्त्यासारिखें वर्म, अजन्मासारिखें कर्म, भ्रांतीसारिखा भ्रम, हरला जेथ ॥ ५ ॥ आजी अलक्ष्यासारिखी माता, गगना-सारिखा पिता, वायुसारिख्या सुता, जन्म झाला ॥ ६ ॥ आजी तेजासारिखी लेंक, उदकासारिखा लेक, पृथ्वीसारिखा मोदक, दिधला हातीं ॥ ७ ॥ आजी जनासारिखें वन, अभिन्नासारिखें भिन्न, चैतन्यासारिखें चिन्ह, दिसतें कीं हें ॥ ८ ॥ आजी आइत्या-सारिखा यत्न, चैतन्यासारिखें वतन, अमोलासारिखें रत्न, जोडलें कीं हें ॥ ९ ॥ आजी निरंजनासारिखी वस्ती, सोहंबिजासारिखा हत्ती, बोधासारिखी मस्ती, आंगा आली ॥ १० ॥ आजी ऑलेखासारिखा जोगी, अनुहातासारखी शिंगी, अरूपासारिखा सोंगी, भासला आजी ॥ ११ ॥ आजी प्रेमासारिखा पूर, गगनासारिखा अंकूर, कैवल्यासारिखा आगर, पिकला जेथ ॥१२॥ आजी ज्ञानगंगेसारिखें स्नान, अनुभवासारिखें भोजन, समाधी-सारिखें शयन, मिळालें आजी ॥ १३ ॥ आजी सोहिन्यासारिखा जोशी, सद्गुरुसारिखा पोशी, संतोषासारिखा सुखराशी, करोनि ठेला ॥ १४ ॥

पद २ रें. (गारुडी.)

ऐसा गारुडी गारुडी । आपणिया भूली पाडी ॥ ध्रु० ॥ मृत्तिकेचें करुनी भांडें । आंत भरियलीं लांकडें ॥ १ ॥ पाणी भरोनि त्यामध्यें अग्नि पेटविला सन्निधें ॥ २ ॥ झंझा झणझणाटें बैसे । घडवट हालतें आपैसें ॥ ३ ॥ घडवटासि दश टव्वाळें । आपण त्यामाझारी खेळे ॥ ४ ॥ दशव्या टव्वाळांत जो बैसे । नवही प्रयोजलीं भूलिवशें ॥ ५ ॥ पहिल्या टव्वाळ्यांतुनि संतीं । जोडिल्या चौथिया सतती ॥ ६ ॥ पहिली तंती वाजविली । तिघा-जणांसि पडली भूली ॥ ७ ॥ दावी स्त्रियेचें जो रूपडें । तेणें झाले अनेक वेडे ॥ ८ ॥ कापुसासि अनेक रंग । देउनि केलें ज्ञान भग ॥ ९ ॥ पाषाणांत बहु झळाळी । पाहतां बुद्धिच ते आंधळी ॥ १० ॥ लोहासमान होय धातु । मध्यें दावी पिवळी मातु ॥ ११ ॥ फालस समता होय पदार्थु । त्यांतहि दाविला बहू स्वार्थु ॥ १२ ॥ येही नवल करुनि आड । होउनि दावी जो पडिपाड ॥ १३ ॥ ऐसा गारुडी जो न देखे । सोहिरा गारुड्यातें ओळखे ॥ १४ ॥

पद ३ रें. (भागीरथी.)

गंगे ! निजजननि भागीरथी ! ॥ ध्रु० ॥ चहूं वाचे वाचाळ, धुवोनियां निर्मळ । न्हेईं शांतिचिया पंथीं ॥ १ ॥ शमदम शांति तूष्णीं, तटाकांचे स्वामिणी । तुजविणें योगाचि हा नाथी ॥ २ ॥ कलिमलनाशिनी विमलाक्षलक्षिणी । सोहिरा म्हणे जीवन हें मंथीं ॥ ३ ॥

पद ४ थें. (जोहार.)

जोहार मायबाप जोहार । सारासार सांगतों विचार ॥ ध्रु० ॥ कवणाचा कोण हा कोठिल जाणोनियां नेणा कीं जी ! । जाणिवेशीं

नेणपण लया गेलें निज निर्जीं! कीं जी! ॥ १ ॥ सत्ता जेथ हरपली, माध्यान्हीं जैसी सावुली । मन बुद्धि हे ठकली नसोनि कीं जी! ॥ २ ॥ नाहीं माय नाहीं बाप नाहीं रेख नाहीं रूप । रूपाचा हा स्वयंदीप लावितां लाविला निश्चळ उमजोनि कीं जी! ॥ ३ ॥ सेखींचें सुख, हारपे जेथ नामरूपाचा चळथ । निरालंबीं पहुडे नाथ, अरुवार उन्मनिशेजीं ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे धरोनि सोडा, कल्पनेचा करोनि घोडा । धांव घ्या महाशून्यामाजीं कीं जी ! ॥ ५ ॥

पद ५ वें. (दळण.)

दळू बाई ! दळू तोंवरीच गाऊं । दळण विसावे तें सुख सेवूं ॥ ध्रु० ॥ अभ्यासाचें जातें । विकार कणवट । दळूनि करूं पीठ । वासनेचें ॥ १ ॥ मनपवन दळणारी । बारा सोळा नारी । कारणाचें घरीं । पीठ न्हेवुं ॥ २ ॥ विवेकपाणियें । शून्याची पितळी । मळूनि करूं गोळी । ऐक्यत्वाची ॥ ३ ॥ त्रिकूटचूलवणी । वैराग्याचा अग्नि । कल्पनाइंधनीं । जाळ करूं ॥ ४ ॥ भक्तीचा हा तवा । निश्चयेंशीं ठेवूं । साम्यते बसवूं । नीट ऐसा ॥ ५ ॥ व्यतिरेकगोळी । अन्वयेंशीं चढवूं । अभेदचि घडवूं भाकरी हे ॥ ६ ॥ एकवेळ परतूं । सृष्टि नाहींपण । परतुनि मीपण पुरतें भाजूं ॥ ७ ॥ काढोनियां ठेवूं । आनंदें निववूं । परेपरतें सेवूं । लागों पुढें ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे ऐशी । सेवितां भाकरी । नलगेचि चाकरी । करणें आतां ॥ ९ ॥

पद ६ वें. (भाट.)

भाट, आम्हीं परब्रह्मींचे भाट । जगा दावूं मोक्षवाट ॥ ध्रु० ॥ आत्मासाहेब येतो घरा । दृश्याहुनि परते सरा ॥ १ ॥ वैराग्य हें चोपदार । मागां विवेकसरदार ॥ २ ॥ योग भालदार हाकाटी ।

मारी नियम वेतकाटी ॥ ३ ॥ मनपवनाचा हा थाट । सोहंबोध हा गजघांट ॥ ४ ॥ अनाहतघंटा गळां । नादब्रह्मचि हा आगळा ॥ ५ ॥ ज्याचे इंद्रियग्राम तपें । भजनाचा कारभार घेपे ॥ ६ ॥ जेथें तन्मयप्रधान । चिन्मयराज विराजमान ॥ ७ ॥ सोहिरा म्हणे भाटविला । आवघा अनुभव आणिला ॥ ८ ॥

पद ७ वें. (पिंगळा.)

वैराग्य हें लागेल राबा, अंतरसुख हें जागेल बाबा!, निशाण हे शून्याची भेटी, होईल चैतन्याची दृष्टी ॥ १ ॥ दृश्यातीत-वृत्ती-पैसा, समर्थ तुज जोडेल ऐसा ॥ २ ॥ सहज करूं नकोचि यत्न, अमोल्य रत्न जोडेल दादा! ॥ ३ ॥ जगबुद्‌बुद एकचि अंबू, बोध हा होईल बाबू! ॥ ४ ॥ अनुतापाचें उगवेल साळक, विवेक पोटीं होइल बाळक ॥ ५ ॥ निद्रेमाजी होसिल जागा, मनपवनाच्या बांधसिल पागा ॥ ६ ॥ अबोल वाचे बोलसिल बाबा!, सोहंबीज-हत्ती झुलतील दादा! ॥ ७ ॥ निःकामीं हे वृत्ति बुडती, काम-धेनुचीं चवरें पडती ॥ ८ ॥ झालिच नाहीं दिसेल काया, समाधि तुज एक जोडेल राया! ॥ ९ ॥ भक्तिमुक्तिसीं विवेक भाई!, कैवल्यसुख हें पिकेल बाबा! ॥ १० ॥ सोहिरा बोले पिंगळा ऐसा, देहीं असोनि वेगळा दादा! ॥ ११ ॥

# (१४) प्रासंगिक पदें.

## (१) विठ्ठल-विवेकसुधापंचक.

### पद १ लें.

तुम्हीं भोगा पररमणी । निजसुखवर्धक जी धमनी ॥ ध्रु० ॥ करितां संगा या निःसंगा । कामाचि भंगा हा असत्ता ॥ रमतां रमतां हरत अहंता । मायबाप ते पळत झणीं ॥ १ ॥ कन्यासुतद्वय पोरें व्याली । जामातातें धरि पदरीं ॥ सासू सदरी देखुन नदरीं । त्रिवेणि भदरी जी तरणी ॥ २ ॥ गीतेमाजी दुर्जी आठवा । साहसष्टींत म्हणे किरिटी ॥ याविण सृष्टि सुख ना दृष्टि । रत तत्कंठीं प्रिय करणी ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा विठ्ठल वदनीं । वेदहि हाची धर्म वदे ॥ गुरुकृपेविण वर्माचि न कळे । यास्तव लागा तच्चरणीं ॥ ४ ॥

### पद २ रें.

तूं निंदुं नको सुजना । कुजना यम दंडिल रसना ॥ ध्रु० ॥ स्वगृहधंदा टाकुनि मंदा । टळटळ फिरसी अनुवादा ॥ शक्तीहर कीं येईल गिरकी । पडसिल नरकीं कीं जीवना ॥ १ ॥ परऐश्वर्या पाहुनि जळसी । तोषसि ऐकुनि पररंध्रा ॥ दुष्टी पापी लोकां तापी । त्रास कदापी साहावेना ॥ २ ॥ खद्योतासम तेजहि नसतां । भास्कर म्हणवुनि मिरविसि भा ॥ सज्जन सदसीं निजयश वदसी । लाज न घेसी केविं मना ॥ ३ ॥ संतच्छल श्रीसंततिनाशन । कां न मानिसि या वचना ॥ जन्मापासुनि काय मिळविलें । अघविरहित या कर मनना ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा विठ्ठल वदनीं । पाहतां

निंदक स्नान करा ॥ दुर्जनसंगति देत अधोगति । भीष्मगुरूप्रति फल निधना ॥ ५ ॥

पद ३ रें.

तोचि पहा तूं देव । सत्-चित्-आनंदाची ठेव ॥ ध्रु० ॥ निराकार--निर्विकार ज्यासी । वेदहि वदति अतिहर्षे ॥ नसतां सकरीं आकर्षण करि । सुत्रप्रचारीं शव ॥ १ ॥ शक्तीची निज-अंतरशक्ति । भक्तीची निजभक्ती तरि । मुक्तीची निजमुक्ति विराजे । जगदादंबर भर पेंव ॥ २ ॥ म्हणे सोहिरा विठ्ठल वदनीं । शून्य म्हणों तरि जग भरलें । कर्महि हरलें ज्ञानहि सरलें । एकचि उरलें तेंचि अचेव ॥ ३ ॥

पद ४ थें.

विषवत् या विषयां । त्यजाना जाल तरीच लया ॥ ध्रु० ॥ आत्मसुखातें हरण कराया । विरचित यांसि विरंची ॥ स्त्रीधनतेजें खड्ग विराजे । अवचित तोडील काया ॥ एकेकातें सेउनि गेले । पांचहि रमणीठाया ॥ तद्रतिसंगास्तव या अंगा । काळचि दंगा करिल भया ॥ १ ॥ माझे माझे म्हणुनी जन हे । लंपट गेले पाहत तयां ॥ कटकट करिसी कटकट धरिसी । झटपट भुलसी लुट घ्याया ॥ २ ॥ म्हणे सोहिरा विठ्ठल वदनीं । धरा विसर जाणुनि माया ॥ या निरसंगा करिं संभव भंगा । तरिच सुरंगा पावसि या ॥ ३ ॥

पद ५ वें.

स्थान बरें जलवास । जेथें स्वप्निं नसे खलत्रास ॥ ध्रु० ॥ घर वर पाथर आसन विराजे । स्वार सजे महाराज ॥ जलदेवता नवविध कान्ता । दिव्य सुमनता दे हातास ॥ १ ॥ ज्ञानतोय

हे तरणिच पाहे । इतरचि नोहे जें बुडवी ॥ 'गंगा गंगेति यो ब्रुयात्'चें । दे फल साचें हरत भवास ॥ २ ॥ चंफा माताऽऽचार्यचि त्राता । होतां संगविलास ॥ संचित ज्यालें निमित्त ठेलें । सहज घडे संन्यास ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा शेषशायी हा । झाला विठ्ठल-दास ॥ खल मित्रासम मानुनि केला । क्षिरसागर हा वास ॥ ४ ॥

## ( २ ) महादजी-अहंताहरण-पदत्रयी.

### पद १ लें.

अवधूत नहीं गरज तेरी हम बेपर्वा फकीरी ॥ ध्रु० ॥ तुम हो राजा । मै हों जोगी । पृथक् पंथका न्यारा ॥ चार कोट जहा-गीर तुमारी । ओही पंथ हमारा ॥ १ ॥ सोना चांदी हमकूं नहिं चाहिये । अलखभुवनका बासी ॥ महाल मुलुख सब झांट बराबर । हम गुरुनामोपासी ॥ २ ॥ तुम ढाली बन हम झोली बन । चार कोट जहागीरी ॥ तीन कालमो दुवाय फिरती । घर घर अलख पुकारे ॥ ३ ॥ तुमबी डूबे हमबि डुबाये । तेरा हम क्या लीया ॥ कहे सोहिरा सुनो महादजी । प्रकाश जोग गमाया ॥ ४ ॥

### पद २ रें.

दौलत देख दिवानी मेरी । आपना मौज न करना फेरी ॥ ध्रु० ॥ कोहि दिन बनीयांके दुकान । कोहि दिन पर्वतपर ठिकाण ॥ १ ॥ कबहू बभुत फुल्लगवाना । कबहूं पगरीकूं बंध-वाना ॥ २ ॥ तनके करत कारभार । हमारे छत्तिस खिजमतगार ॥ ३ ॥ मनपवनकी पागा । सोऽहं पिलखानेकी जग्गा ॥ ४ ॥ करमकारखाना । हमारा नशीब जामदारखाना ॥ ५ ॥ अहंकार कूं शींछा । तीनों मुलुख हमारी भीछा ॥ ६ ॥ जब सोहिरा तक्तपर बैठे । तब सब दुनियां लंडपर बैठे ॥ ७ ॥

पद ३ रें.

स्वरुपीं मजरा लावीं ठीक । उदरा मागुनि खाणें भीक ॥ ध्रु० ॥ स्वइच्छ असणें, अलक्ष पाहणें । भजन करूं नको दांभीक ॥ १ ॥ अचिंत्य स्मरणीं, अगम्य करणीं । अनादि आरं-भीक ॥ २ ॥ म्हणे सोहिरा निराकारीं, निराधारीं । मन करणें राबीक ॥ ३ ॥

( ३ ) निर्वाणीचें पद.

दिसणें हें सरलें । अवघें प्राक्तन हें मुरलें ॥ ध्रु० ॥ आलों नाहीं गेलों नाहीं । मध्यें दिसणें हे भ्रांति । जागृत होतां स्वप्नचि हरपे । कर्पुरन्यायें जग हरलें ॥ १ ॥ दिसणें हाची जन्म योगियां ना दिसणें हा मृत्यु म्हणा । गैबिप्रसादें गैबचि जाहलें । आप-आपणामध्यें लपलें ॥ २ ॥ मच्छिंदर गोरख जालंधर हे । न्याया आले स्वस्वरूपीं । जातां जातां गमनग्राम तें । समूळ कोठें ना गमलें ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा सत्रा चौदा । मधुमासाच्या नवम-दिनीं । सगुण स्वरुपीं निर्गुण ठेलें । अनुभव हरले स्वरुप कळे ॥ ४ ॥

# (१५) स्फुट सवाया व स्फुट श्लोक.

[ स्फुट सवाया—१ ते ४२. ]

( १ )

संसारीं विटेना भ्रांतीहि फिटेना तोंवरि भेटेना देव तया । जातीचा निष्ठुर केवळचि क्रूर नाहीं जयासि ते भूतदया । अंतरीं मळ बाहेरि निर्मळ करुनि आलाही काशी गया । सोहिरा म्हणे यम दंडितसे कीं शेवटीं घालितसे निरया ॥

( २ )

नित्य स्मरीं हरि ध्यान हें अंतरीं जीव हा उद्धरीं येणेंचि गा! । सिद्धचि हें सुख रूप नाहीं रेख अज्ञानें हें तुज नेणवे गा! ॥ देह हें येणेंचि दुःखाचें पेणेंचि भ्यालासि या भवभेणेंचि गा! । सोहिरा म्हणे तुला नासुनि हेतुला आत्मा आंतुला नेणवे गा! ॥

( ३ )

देख देह तृण अंतरिंची खुण टांकुनि त्रिगुण राहें किं गा! । आपुला अभाव दृश्य दिसे माव कल्पनेचा घाव पाहें किं गा! ॥ आत्मा हा अरूप साक्षि जसा दीप त्याचाचि ध्यास तूं वाहें किं गा! । सोहिरा म्हणे हें संचित वंचित विदेहि होउनि राहें किं गा! ॥

( ४ )

दावितसे देवा आत्मस्वयंमेवा संतांची ती सेवा कारण हो! । जीव ते शिवचि होउनि तल्लिन पावले दीन उद्धारण हो! ॥ जीवन्मुक्तत्वीं कीं युक्तचि होउनी उक्तचि योग सुधारण हो! । सोहिरा म्हणे मूळबिंदु आनंदु हाचि भवसिंधुतारण हो! ॥

( ५ )

विश्व विचित्र हें चित्राचि पाहति राहति निमग्न नित्य किं हे । सूख सारुनी दुःख निवारुनी असतांचि पाहति भग्न किं हे ॥ हारोनि सर्वहि फिरोनि देखति दूरुनि दृश्य संलग्न किं हे । सोहिरा म्हणे त्या संपत्ति दैविशिं देहिंच लाविती लग्न किं हे ॥

( ६ )

संकेतें जाण हा लिंगदेहावरि लंकेंत राम जसा र्का रिघे । आसुरि संपत्तिमाजि हे सर्वहि राक्षस मारित गूण तिघे ॥ अन्वय स्थापि विभीषण बोध हा लोक चिरंजीवचि अवघे । सोहिरा म्हणे जीवीं सर्वहि जाणुनि आणुनि ध्यानीं हे चवघे ॥

( ७ )

दृश्य हें आटलें सूखचि वाटलें तेंचि किं दाटलें अंतरीं हें । मिथ्याचि हें देह फिटला संदेह विदेह ब्रह्म निरंतर हें ॥ बुद्धिचें बोधव्य चित्ताचें चेतव्य मीपण झालें अवतारी हें । सोहिरा म्हणे मग्न झालें मन अनुहातनाद वाजंतरिं हें ॥

( ८ )

येवढें भूमंडळ ज्यावरि भासत औघेंचि नासत दृश्य किं हें । अनादिब्रह्म हें अगम अगोचर इंद्रियांतीत अदृश्य किं हें ॥ अनन्यभक्त विरक्तचि मुक्त जे तयांप्रति आहे सादृश्य किं हें । सोहिरा म्हणे योगी जैसा जो पाहत त्याप्रति जाणत दृश्य किं हें ॥

( ९ )

भक्ति करि तया सन्निध श्रीहरि पावतो लवकरि वेळ नसे । संसार खेळ हा हेळसुनी मनिं त्यांतचि त्याला किं टेळितसे ॥

वर्मांचि जाणुनी चर्म वृथा किं हे कर्मचि ब्रह्मिं तें मेळत असे । सोहिरा म्हणे चैतन्य सनातन लक्षुनि प्रेमेंचि लोळतसे ॥

( १० )

ब्रह्मचि लाभलें तेणेंचि कीं भलें नरदेह शोभलें यास्तवची । अनारिसें जनिं विरक्तची मनिं करितों निरंजनिं वास्तवचि ॥ वेदांची गति अनिर्वाच्यें ध्याति अतीत गति मति हा स्तवची । सोहिरा म्हणे निजानंदचि दाटला संसार वाटला नवलची ॥

( ११ )

दृष्टिसि बाणलें शून्यचि आघवें देहाच्या लाघवें गुंतेचिना । भितो कीं यमाला न चुके नेमाला योगक्षेमालागिं कुंथेचिना ॥ सर्वांचि भोग हा रोग दिसे वरि इंद्रियांच्या घारिं येतचिना । सोहिरा म्हणे देव संतचि पाहति मिथ्या हें चित्तीं घेतिचना ॥

( १२ )

आदि नसे देह अंतींहि नाहींच मध्यें हें वांईच भासतसे । योगानें सोडिला भोगानें वेढिला रोगानें कोंडिला त्रासतसे ॥ संग करितां हा रंग दिसेवरी क्षणोक्षणीं किं हे नासतसे । सोहिरा म्हणे जीव नाथिलाचि भव शाश्वत मानुनि आसतसे ॥

( १३ )

संसारिचें सुख हें मिथ्याचि आहे किं उगाचि वाहतो ध्यास किं हा । अवघाचि हा भ्रम केवळचि श्रम नोहिं आराम अभ्यास किं हा ॥ ब्रह्मीं हें अर्पण कर्म करूं नेणें मीपणावीण संन्यास किं हा । सोहिरा म्हणे कीं हा देहाचि देखतो विसयें नेणें शून्यास किं हा ॥

(१४)

चित्तचि चैतन्य होउनि राहिलें सर्वचि पाहिलें शून्यचि हें । भिन्न न मानि हें चिन्ह तयाप्रति नाहिं जगाचें पैशुन्यचि हें ॥ अंतर बाहेर अंबर दाटलें देह न वाटलें शून्यचि हें । सोहिरा सहजें आहेचि पाहत आपेंचि पातलें मौनाचि हें ॥

(१५)

देहाचे संगति व्यर्थ गेलि मति अंतिं नाहीं गति ज्यासि किं हे । सर्वकाळीं धंदा हाचि मतीमंदा संताचि ते निंदा ज्यासि किं हे ॥ व्यर्थचि हें जिणें आत्मज्ञानाविणें अन्वय नेणोंचि न्यास किं हा । सोहिरा म्हणे खुणे पावलियाविणें कांहीं नेणें अभ्यास किं हा ॥

(१६)

आठवितां हरिसुख हें अंतरिं ब्रह्म सर्वांतरिं व्यापिलें हें । स्थावर जंगम दृष्टिसि हा भ्रम अज्ञानें कर्म आरोपिलें हें ॥ शरिरें हिं साजिरीं मुकुंडीमाझारिं संसार आजारिं खपलीं हें । सोहिरा म्हणे तुज स्वहिताकारणें केवळ तत्त्व निरूपिलें हें ॥

(१७)

हें नरदेह गमावुनि विभ्रमें संसार करणें व्यर्थ किं हा । कोठिल कोण मी काय वाहतसें विस्मयें नेणोनि अर्थ किं हा ॥ स्वार्थचि मानुनि दृश्य पदार्थीं अवघाचि भोगि अर्थ किं हा । सोहिरा म्हणे देहरोग भोगची आत्मवियोग किमर्थ किं हा ॥

(१८)

संतसमागम दुर्लभ मानुनि सुलभ लाभ अलभ्य किं हा । आत्मानिदर्शन सर्वत्र निरसन वर्षे चिद्घन लभ्य किं हा ॥ मानव-

योनींत वंद्य तो आनंद सर्वभूतिं समसाम्य किं हा । सोहिरा म्हणे तो सज्ञान सज्जन चंदन ज्ञान सौरभ्य कीं हा ॥

( १९ )

सुमन देहिं सुगंध तसा हरि वारि हें व्याप्य कीं रामरसा । जेविं घटीं मठीं व्यापक अंबर देख दिगंबर देव तसा ॥ लक्ष हें लावुनि नित्य निरंजनीं असोनियां किं देहांत नसा । सोहिरा म्हणे परब्रह्मसुखांत आंतले आंतचि स्वस्थ बसा ॥

( २० )

कोठिल कोण कसा भि हें जाणुनि इंद्रियें रोधुनि नित्य राहा । निर्गुण निर्मळ शांत सदोदित तेथिलची निजध्यास वहा ॥ आसत नासत सर्व प्रपंच हा शून्यचि राहिलें त्यांत रहा । सोहिरा म्हणे तें पाहणें पाहतां अलक्ष्यीं लक्ष्य आनंद महा ॥

( २१ )

रूप रेख दिठीविणें देखतो अवधूत दिव्य दिगंबर हा । ज्याचिये पोटिं ब्रह्मांडें हिं कोटि अनंत अपार चिदंबर हा ॥ सर्वत्र व्यापक भूतकलापक ज्ञानप्रकाशक ईश्वर हा । सोहिरा म्हणे तो संतसमागमें सुलभ होय निरंतर हा ॥

( २२ )

संसाररोग हा भोगची मानुनी शोक कीं करिती ते लोक पिसे । धांवत मृग मृगजळ देखत तेविंच दृश्य हें स्पष्ट दिसे ॥ क्लेशाचि पावती देहमिषें परि ईश्वरभक्तिचा लेश नसे । सोहिरा म्हणे मन भ्रमीत होउनि केवळ पावले जीवदशे ॥

( २३ )

विस्मय पावुनि जीवदशें हरि अंतरिंचा किमपी न दिसे । तर्कचि नाकिं कुतर्क वसे मनिं केवळ अज्ञान बाधतसे ॥ माति घटीं

पटिं तंतु वसे तेविं सर्व घटीं हा देव असे । दृष्टिंत सृष्टि भरे म्हणे सोहिरा संतसमागम ज्यासि नसे ॥

(२४)

सज्जनरंजन नित्यनिरंजन अंजन ज्ञानसूर्यनयनीं । निर्गुण निर्मळ नित्य सदोदित जागृत होउनियां शयनीं ॥ अधृति जाउनी धैर्य स्थिरावलें मग्नचि होउनियां गगनीं । सोहिरा म्हणे गुरुगम्य सुखामृत दीवस ना आणि ते रजनी ॥

(२५)

संतजनां देव गुप्त निरंजन मूर्खजना देव पाषाण हा । नैराश्य भाषण ज्ञानिजनांप्रति आनचि तें कथि मूढ किं हा ॥ चोरचि आपण थोराचि मी म्हणे घोराचि वाहतो औघा किं हा । सोहिरा म्हणे त्याचें दर्शन कांसया साधका त्याग तूं स्पर्शनिं हा ॥

(२६)

आच्छादिला कीं हा तंतु पटीं दिठिं विस्मय पावला माति घटीं । देह हें देखोनि विस्मृति होतसे आत्माचि हा नटला किं नटी ॥ पूर्विल पुण्य हें पूर्ण गुरुकृपें ज्योतिच वेगळि हे निवटी । सोहिरा म्हणे तो हा सर्वचि त्यागुनि शेवटिं बैसला मोक्षपटीं ॥

(२७)

जन्मासि आलासि संसारिं धालासि त्यांतचि झालासि गर्क किं गा! । न घेसि अनुभव बाधतो हा भव कांहीं न चाले तर्क किं गा! ॥ क्षोभचि अभ्र हे लोभ किं यामिनि आच्छादिला ज्ञान अर्क किं गा! । सोहिरा म्हणे तूं नेणोनि वर्तसी फुकट भोगिसी नर्क किं गा! ॥

(२८)

नरदेह नर्म चर्म दिसे वरि नेणासि अंतरिं वर्म किं हें । पांचाचें पंचक लिंगदेहात्मक वर्तत वासना कर्म किं हें ।। सुख स्वधर्म हे देतचि आघवें दुःखचि देत विकर्म किं हें । सोहिरा म्हणे जीव ब्रह्मचि होतो मुक्तचि होत अकर्म कीं हें ।।

(२९)

केऱ्हांचि नासत नकळत हें देह यास्तव ईश्वरभक्ति करीं । अज्ञान जावया सज्ञान व्हावया सत्वर संतांचि कास धरीं ।। अनुभव घेउनि अंतरिंचा हा अक्षयची निजशांति वरीं । सोहिरा म्हणे देव विस्मरों नये येणोंचि सर्वहि दुःख हरी ।।

(३०)

न लागे आवडि आत्मरुपीं जया कारण कीं भया तेंचि तया । चैतन्यचालक नेणोनि पालक देखत देह हें भूलवाया ।। नेणोनि वाढ हा भूत गुणत्रय आत्माचि ध्यावा हें नाहिं जया । सोहिरा म्हणे तो पापिया जाय किं घेतसे एकाकीं निरया ।।

(३१)

चारीहि खाणित दृष्टीसि नाणित शोधितसे किं हा देव दुजा । जाणुनि नेणति मूर्ख हे जन पाषाण भावुनि करिति पूजा ।। जेथुनि झालें हें दशम अग्र कीं विसरोनि जाती त्या मूळबीजा । सोहिरा म्हणे किं हे दुःखाचि पावति नेणोनियां गुरुगम्य गुजा ।।

(३२)

चौऱ्यांयशीं लक्ष योनिमध्यें हें नरदेह अलभ्य लाभ तुला । यामध्यें ईश्वर आहे तरि कसा अनुभव घ्यावा किं हा आंतुला ।।

नीघ भवांतुनि रीघ निरंजनिं वा ! गूणचि तीघ हे बद्ध तुला ।
सोहिरा म्हणे हाचि कर्मसंन्यास न ऐसें त्रिविध या हेतूला ॥

( ३३ )

मिथ्याचि मानुनि वर्तत्तो या देहीं नैराश्येंचि जीव शुद्ध किं हा । देखे निरामय निर्गुण निर्भय जितांचि मुक्त प्रबुद्ध किं हा ॥ विरळाचि मानव योनिमध्यें तो सर्वहि साधन सिद्ध किं हा । सोहिरा म्हणे तो ब्रह्मचि होउनि सर्वचि सांडि विवीध किं हा ॥

( ३४ )

ईश्वरें उत्पन्न सर्वचि केलें हें जें यांतील उपमा कीं । त्यासि शून्य हें व्यापक ज्ञानप्रकाशक चैतन्य त्यांत अतीत असे ॥ योग हा साधला देव आराधिला निश्चयें लाधला दैववशें । सोहिरा म्हणे स्वयंब्रह्म हें सन्निध अंतरीं निश्चयें दृढ वसे ॥

( ३५ )

साधुच्या अंतरिं काय वसे जें नकळेचि केवळ मूर्खजनां । सर्वांचि सारिखें नरदेह हें देखे न दिसे संत असाच मना ॥ हा दृश्य पदार्थ किं साचचि मानुनि चिंति अनेकचि या कामना । सोहिरा म्हणे तो हा सर्व जाण परि चित्त नयेचि किं हें दमना ॥

( ३६ )

विश्वास जयासि किं पूर्ण असे, भगवंत तया जवळीच असे । अंतरसाक्षि हृदयिं वसे, कीं प्रसन्न असे वीतरागदशे ॥ आत्मरूपीं कीं आत्मचि होउनी, कांहिंच ज्या मनिं काम नसे । सोहिरा म्हणे तो हा शांत सदोदित, चित्तासि आलें कीं तेथें बसे ॥

( ३७ )

भगवंतकृपा विषयांत नसे, अविनाश कीं देतसे मोक्षदशे । सर्व जीवांसि हें ज्ञान नसे, विरळा कोणि भक्तचि मुक्त असे । अज्ञानी तयां ओळखीति कसे, सर्वांचिसारिखें देह दिसे । सोहिरा म्हणे कोणि आर्त असे तरि, श्रेष्ठचि देखुनि चित्त डसे ॥

( ३८ )

उन्मत्त-बाल-पिशाचदशा वरि, ब्रह्मचि आपण हेचि निशा । रूपचि नाहीं अशाचि कीं देखत, चिन्मयें व्यापिल्या दाहाहि दिशा । बोध-चित्सूर्य-प्रकाश-प्रकाशक, हारपली विपरीत निशा । सोहिरा म्हणे शरणागत यावें कीं, तन्मयभावें गुरूसि आशा ॥

( ३९ )

गूढहि उकलुनि दावितसे वरि, मूढही त्यासवें कीं तरती । वैराग्यदशा किं हे शीघ्रचि पावती, अंतरीं वेगळेचि सरती ॥ चित्त स्वरूपीं रमेचि दमे मन, अक्षय-प्रेमेंचि जे भरती । सोहिरा म्हणे शरणागत येउनी, शिष्य अशांसि गुरू करिती ॥

( ४० )

शिष्य करावा तो आर्तचि पाहुनी, शेखिं निभावुनि येत असा । मोक्षपदाप्रति आतुर कीं, चतुराइमधें उतरे किं कसा ॥ एक दुजें पुढिलें किं बुझे, उमजे निजबीज हें चित्त बसा । सोहिरा म्हणे जगीं पाहुनियां वरी शिष्य करावा तो हाचि असा ॥

( ४१ )

आळशी निष्ठुर नव्हेचि कीं क्रूर आसुरीभाव हा नाहीं जया । भूतचि हें कीं विभूति जया दिसे, हीतचि मानि कीं भूत-

दया ॥ प्रौढ वयांत भयाभित होउनी, मानशिं ना व्यभिचार तया। सोहिरा म्हणे वितरागि असे तरि शिष्य करावा हा या समया ॥

( ४२ )

मुळींच कीं जया बंध पडे भुले, देखुनि देह कीं हें रूपडें । क्लेशचि पावत्री वेष जया मति, द्वेष हा मानसिंचा नुपडे ॥ ज्ञान अशेष विशेष किं शेषहि, लेशाचि कानिं किं हा न पडे । सोहिरा म्हणे किं श्रमे जीव तो भ्रमे, त्यालागिं मागुति येणें घडे ॥

[ स्फुट श्लोक—१ ते ९१. ]

( १ )

नीरालंब निरंजना मुळिं जिवा होऊनि जा गर्क हो । तेव्हां होतिल एकरूप समता इंदू आणि अर्क हो ॥ जेव्हां राहिल हा तुझा विविध कीं औघाचि कूतर्क हो । सोहीरामत दूर होइल तुझा तेव्हांचि हा नर्क हो ॥

( २ )

अर्थज्ञानचि कांहिं स्वल्प समजे तेणोंचि गर्वा चढे । आम्हां-वांचुनि अन्य या महितलीं ज्ञानी दिठीं नापडे ॥ साधुत्वा मिरवी सदा अविधि जो पाखांडवादी उडे । सोहीरामत ऐशियासि तरि हो कैसेनी मुक्ती घडे ॥

( ३ )

नाना पंथ वितंड काढुनि भल्या कोणा तरी आडवी । त्याहूनी मज सुज्ञलोक वदती प्रौढी किं हे वाढवी ॥ जितकें उत्तम आपणासि असणें आशावी हे औढवी । तो प्राणी जणुं सोहिरा वदतसे अज्ञान वीभांडवी ॥

( ४ )

भक्तीनें भगवंत नित्य वरुनी कालासि या दौडिजे । योगाभ्यास निरंतरीं असुनियां या इंद्रियां जिंकिजे ॥ दीर्घद्वेष परस्त्रिये जपति ते वाचेचिये डंकिजे । सोहीरामत कीं तयांशिं सहसा संसर्ग हा ना किजे ॥

( ५ )

दुष्टाला जरी संतसंगति घडे सद्बुद्धि नाहीं तया । दुर्गंधीच अपानद्वारिं उपजे सौगंधही खातया ॥ प्रेमें क्षीरचि पाजिलें अहि बहु संपत्ति हाला तया । साधूसंगति भक्तिवांचुनि असे कीं तोचि वैरी तया ॥

( ६ )

ज्याला देखुनि सर्वभूतिं उपजे सामान्य नोहे दया । तो सुस्नात सदैव जाण मग त्या येथेंचि काशी गया ॥ जो व्यापी सकलांभुतीं अगम जो दृष्टीस आला जया । सोहीरा वदतो समान निरखीं रंका अणी राजया ॥

( ७ )

सर्वत्रीं बघतां उदासिन मना कांहींच ना वाटतें । ही पंचात्मक सर्व विश्वरचना संभूत हें आटतें ॥ ना पाचारित अंगिं येउनि बहू वैराग्य हें दाटतें । सोहीरामत भ्रांतिचें वसन कीं निभ्रांत हें फाटतें ॥

( ८ )

निर्गूणीं लय लावितां उपरमे हा जीव जातां भितो । काढी तर्क कुतर्क मूर्खमणी हा वाच्यांश आरंभितो ॥ लोकां दावित सोंगढोंग बरवें साधू नव्हे दंभि तो । सोहीरामत तत्त्वसार विवरीं जाणा मुखस्तंभि तो ॥

( ९ )

ब्रह्मानंदिं निमग्न होउनि असे तो जाण साधू भला । येऊनी नरदेहिं यासि बरवा आत्माचि हा लाभला ॥ राहो या किं जनीं किं थोर विजनीं कोठें तरी शोभला । सोहीरामत जाण पंचविषयीं निःसीम जो क्षोभला ॥

( १० )

धेनूवर्ण अनेक भासति परी दुग्धांत नाना नसे । यावत्स्थावर-जंगमादिकिं असे जो चाळितो मानसें ॥ होणें आपण हो जयासि बरवें सर्वांहुनीं सानसें । सोहीरामत बीज हें समजणें निर्गूण नीदानसें ॥

( ११ )

कोण्याकारणिं भास नाश जगता शोधासि लागें मना । बोधें गुह्य किं डुह्य तूं प्रतिदिनीं सांडी दुजी कामना ॥ हा मी कोण शरीर चालत कसें कां तूज हें फामना । सोहीरामत याविना निजखुणें चित्सूख आरामना ॥

( १२ )

जो नेती निगमा जितेंद्रियदमा जो ना गमे आगमा । भक्तीनेंच सुसाध्य कीं सहज तो साधूचिया संगमा ॥ दावी लावि मना परे परथडी जो आपुल्या ऊगमा । सोहीरा समजोनि किं उमजला पंथेंचि या सूगमा ॥

( १३ )

शाखापर्ण अनेक भासति परी एकाचि वृक्षाचिया । तैसें विश्व विवीध कीं नगालिला चिद्ब्रेम मुख्याचिया ॥ वाटे जाउं नको निमीषभरिं तूं या सर्व लक्षाचिया । लक्ष्यीं तूंचि अलक्ष्य लाव लय हें शब्दांत लक्षाचिया ॥

( १४ )

निद्रेमाजि भ्रमांत स्वप्न दिसतें तैसें किं हें भासणें । तें नासे किं तयेक्षणीं विलसतां जागर्ति संकाशणें ॥ ज्ञानाग्नी हुतकर्म हें करुनियां सर्वेंद्रियां लासणें । सोहीरा मग हो म्हणे निजपदीं आनंद उल्हासणें ॥

( १५ )

वाचेचें मुळ जाणुनी गुळकरीं वाचाचि हे गातया । प्रासीं मानसदासि होउनि कळों तेथील सूगा तया ॥ चित्सिंधू मिळणी मिळोनि मिळतें हे चित्तगंगा तया । तैसें ऐक्याचि सोहिरा म्हणतसे या आत्मलिंगा तया ॥

( १६ )

पिंडींचा रहिवासि तो न म्हणवे ब्रह्मांड रोमावळी । ज्याची तो किं समर्थ हा जगपती साकार हा मावळी ॥ सद्भक्तांप्रति सानुकूल विभु तो जो सर्व कामावळी । हे वाचे स्मर सोहिरा म्हणतसे त्याचीच नामावळी ॥

( १७ )

नक्षत्रेश सुधीं चकोर सेवके कें दूसरें खाइल । निर्गूणीं मन वेधलें तनुचिया कीं पोषणा जाइल ॥ देवा ! तूं नच देसि काय जन तें देऊनियां देइल । स्वप्नींचें धन सोहिरा म्हणतसे कीं जागृतीं येइल ॥

( १८ )

लोकीं आश निराश अंतरीं जया हा जाण सन्यासि हो । संसारीं सम सारिखा दिसतसे आलिंगि शून्यासि हो ॥ कोणी आदरभार फार करितां संकोच मान्यासि हो । सोहीरा मत चिन्मयाशिं रमला प्राशूनि मौन्यासि हो ॥

( १९ )

मिथ्या कल्पितसे भ्रमासि मन हें घ्यावाच याचा खुन । हे जिव्हे रस गुप्त वाहत असे घ्यावा किं या चाखुन ॥ अंतर्ज्ञान तराजिं घे समजुनी हा जीव कीं जोखुन । सोहीरामत कोण चिंतित पहा मी हेंचि नीरेखुन ॥

( २० )

या संसारपुरास मी बघतसें मिथ्याचि आकार हा । माया-व्यापक जाण हा बहुविधा साभास वीकार हा ॥ हे गूणत्रय साम्यकीं प्रसवली तैसाच ॐकार हा । सर्वांचें मुळ सोहिरा म्हण-तसे अंतीं निराकार हा ॥

( २१ )

मर्यादेवरि सागरा गिरिवरा कोणी धरीली धरा । तारा सूर्य शशांक व्योमिं वरुषे हा कोण धाराधरा ॥ चोवीसांवरि एक पंच-विसवें स्फूर्ती कशी पंधरा । सोहीरा उमजीं म्हणे मम मना त्या भक्ति गंगाधरा ॥

( २२ )

संसारीं रमसी मना भ्रमसि तूं कां भोगिशी आपदा । अभ्रींची जसि साउली दिसतसे कोणाचि हे संपदा ॥ शाल्यन्नोदन दिव्यभोग रति हे कीं नूपजे श्वापदा । सोहीरा म्हणतो विवेक नसतां आरूढुनी ज्या पदा ॥

( २३ )

हीं भूतें धरिता धरा स्थिरचरा कोणी नसे गोचरा । कीं पिच्छें उठतां उठोनि सुटतां ठावें नसे खेंचरा ॥ ज्याव्द्यत्वें तनु-संगतेवरी सरी पावों नको भूचरा । सोहीरामत लक्ष हें अनुदिनीं लावीं किं सद्गोचरा ॥

( २४ )

आकाशावरि अभ्र भासत असे तैसेंच कीं हे जन । त्यांचा सूड धरी विवेक करितो सर्वज्ञ कीं सज्जन ॥ नित्यानित्यविचार-सार करितां येणें भवा भंजन । सोहीरामत राजयोगि सदनीं जो भोगि नीरंजन ॥

( २५ )

बोलाचें रुप देखुनी अनुभवें तूं बोल हा राम रे ! । तूर्या-कामिनि कांत जो जगपती एकांत आराम रे ! ॥ शब्दांचीं पठणें बहू शिकवुनी तीं काय कीरास रे ! । सोहीरामत जाण चेष्टित तनू निश्चीत वाराभरें ! ॥

( २६ )

या देहीं असतां जया दिसतसे जैसा मी ऊकाशि हो ! । ऐसें ज्ञान टिके तरी मग तया येथेंचि हे काशि हो ! ॥ ज्ञप्तिमात्र निखील हो निवटिलें एकीं अनेकांसि हो ! । सोहीरामत दृश्य तें स्वरुप कीं ना येचि तूकासि हो ! ॥

( २७ )

हे राया ! करिं बा ! दया अनुभवें ब्रह्मांड हें भेदिन । प्रापंचावरि इंद्रियां निघतयां वरचेवरी छेदिन ॥ आनंदोत्तर मग्न होत असतां आम्हांसि हा सूदिन । द्यावें हें मज सोहिरा तुजकडे मी मागतों कीं दिन ॥

( २८ )

एकीं एकचि हा अनेक दिसतो नाहींच कीं दूसरा । ऐसें राहुनियां मनीं अनुदिनीं भेदासि या संहरा ॥ आपूलें रुप हें अरूप गमलें हें ज्ञान ज्याशीं सरा । सोहीरा जड या जना म्हणतसे त्याचा करा आसरा ॥

( २९ )

जोडीं सद्गुरुसी विलोकुनि तयीं होसील निर्बंधन । विश्वाचा धनि कोण हा करुनियां आरंभि आराधन ।। इंद्रीयें दमुनी निराळ गमनीं योगासि या साधन । ज्ञानाभ्यंजन सोहिरा म्हणतसे हें सिद्ध सन्मर्द्दन ।।

( ३० )

सांडूनी तुजसारिख्या प्रभुवरा आणीक कोणा भजों । ऐशी यावरी जोडली तनु असे या मानवा लाभ जो ।। ब्रह्मांडीं किं अनेक चित्र उमटे मायेसि आरंभ जो । सोहीरामत जाण तूं अचल हा तूर्याभुमिस्तंभ जो ।।

( ३१ )

हा देहांतरिं कोण पाहत असे साक्षीच कीं शोधिला । योगें आकळिला मनासि कळला सर्वांचियें आदला ।। आनंदेंचि निमग्न होउनि तया म्यां नित्य आराधिला । सोहीरामत पाक हा गग-निंचा अग्नीविणें रांधिला ।।

( ३२ )

जो स्वामी सकळां जगा प्रसवला त्याचेंच घे दर्शन । जो दूरीं असतां अलिप्त विषयीं सृष्टीस सुदर्शन ।। होणें नाहीं गुरुविणें करिं मना साधू-पद-स्पर्शन । सोहीरा सविवेक तूं करीं म्हणे संकल्प कीं नाशन ।।

( ३३ )

पाशीं देव असे तुलाचि न दिसे तें आड अज्ञान हो ! । त्याचा नाश करिं निरंजन वरीं प्रख्यात हें ज्ञान हो ! ।। तेंही पात्र-लिया किं जाय निलया तें शुद्ध विज्ञान हो ! । तें भोगीतिच सोहीरा म्हणतसे ते मुक्त सज्ञान हो ! ।।

( ३४ )

प्रारब्धाधिन देह हें किं असतां कोणावरी कोपसी । रात्रं-दीवस खेद हा करुनियां भक्तीसि कीं लोपसी ॥ आतां सांगतसे किं सर्वहि मना जें ईश्वरीं ओपिसी । सोहीरामत विश्व हें मग तुला निष्कीं दिसे ओपसी ॥

( ३५ )

प्रारब्धास्तव हें घडे तंव पडे देहासि या भोगणें । या जन्मार्जित कर्म भोगवि यया जैसें किं हें ऊसणें ॥ ऐसें हें कळुनि उगें विकळुनी कोणावरी रूसणें । सोहीरामत पंथ हा सुगम कीं चोरासि कीं पूसणें ॥

( ३६ )

रामावीण कुनाम घेउनि जनीं कां वाउगा झांकसी । चौहाटावरि हे निधी किं दिसतां कां नेत्र तूं झांकिसी ॥ पूर्णस्वानु-भवाविणेंचि टकणें पाखांड हें शीकसी । सोहीरामत मुक्तपंक्ति-जवळी तूं फालसें वीकसी ॥

( ३७ )

गोडी मानुनियां मनीं अनुदिनीं संसार बांधी गळां । तो मायाजळिं मीन आमिषभुली आसूडला हो गळा ॥ लक्षूं धांवति इंद्रियें बहुवसें दृश्यावरी आगळा । सोहीरा जरि पाहिला तरि म्हणे ज्ञानाविशीं आंधळा ॥

( ३८ )

अज्ञानें बहु भास भासति परी एकाचि तंतूपटीं । तैसा विश्वविलासवेश धरितो ऐक्येंचि हा कापटी ॥ जो संकल्प विवीध भासवि तया ठेवूं नका नेहटीं । सोहीरा इतुकेनि बैस म्हणतो अजरामराचे पटीं ॥

(३९)

आदी अंतिं नसे जगातित असे ज्याचेनि सर्व दिसे । ती सत्ताच अनंतरूपिं विलसे हें ज्ञान संतीं वसे ॥ चित्ताला नुमसे अहंकृतिवशें ते प्राणि जाणा पिसे । सोहीरामत पातले जिवदशे लुब्धोनि दृश्यीं कसे ॥

(४०)

शाली आंगरखे नरूचुनि रुचे वन्यासि या घोंगडी । कीं नीरीं बुडणेंचि गोडि गमते त्यासी नको सांगडी ॥ अज्ञानें भ्रमितासि नावडतसे साधूगडी वांगडी । सोहीरा म्हणतो पराभव तया कें होय मायागडीं ॥

(४१)

हा इच्छातरु खांडुनी करिसि तूं कां हींवरा कूप हो ! । झांकूनि किरनेत्र मंडल पहासी आविसां रूप हो ! ॥ अव्हेरूनिच सूरभी दुभतिये घे कूर्मीचें तूप हो ! । सोहीरामत बुद्धिहीन नर तो अज्ञान आमूप हो ! ॥

(४२)

कैसी प्रीति बसेल त्या हरिपदीं निष्काम पुण्याविणें । इच्छूनी फलकर्म हें करि तया संसार ओढी जिणें ॥ दारापुत्रकलत्रवित्तमदिरा हालाचि जैसी पिणें । सोहीरामत जाण बा ! पुनरपीं यातायतीं जुंपणें ॥

(४३)

या ब्रह्मार्पण कर्म हें करुनियां नैराश्य कीजे फळा । येणेंवीण कळा किं जाण सकळां ज्ञानेंविणें निष्फळा ॥ वैराग्यासि अहर्निशीं धरुनियां अंतर्गता चोखळा । सोहीरा म्हणतो किं नागलतिका बीजाविणें सूफळा ॥

( ४४ )

घेऊनी समता शरीरममता सांडूनि सत्संगती । गाती ध्याति अनंत ईश्वररुपीं सानंद सद्रंगती ॥ बैसूनी बहु एक मेळ सरिसे अर्थाचिये पंगती । सोहीरा म्हणतो पुजूं भगवती अर्धांग ऊपांग ती ॥

( ४५ )

तूं राजा असती परी न दिससी या मानसा पायिका । तूझा तूंचि जनीं जना वळख तूं कीं आपणा नायिका ॥ तूझ्या संनिध गा ! जगा प्रसवली ही प्रकृती नायिका । सोहीरामत देव सूलभ तया ज्ञानप्रदा नायिका ॥

( ४६ )

होतो होड अगाज कीं परि पहा ते केवढीसी बती । सत्ता सूक्ष्म सन्निधानि किं तसी सर्वेंद्रियीं राबती ॥ ओढी हातभरी बरोनि सरतें दूरी किं हो ! लांब ती । सोहिरामत ज्ञानवर्म कळतां हे कल्पना थांबती ॥

( ४७ )

गूणाशीं समता तरी न म्हणवे रत्नासि पाषाण हो ! । गाईचें बघतां पवित्रपण तें विष्ठा नव्हे शेण हो ! ॥ चिंधी हातभरी परी मिरवलें जें राजनीशाण हो ! । सोहीरामत संत मानव तरी कैसेनि ते दोषि हो ! ॥

( ४८ )

सर्वां सज्जनता सुनिश्चित वरी शत्रुत्व पैसा किं हो ! । आटाआटि करोनि वेंचिति बहू जे प्राण रेसा किं हो ! ॥ जैसा त्या हिरव्या तृणा लगबगां म्हैसाचि धांवे किं हो । स्वानंदाविण सोहिरा म्हणतसे आम्हांसि कांहीं न हो ! ॥

( ४९ )

हा गोविंद सुवंद्य नंदसुत तो गौळ्यांत साकार हा । वेणू वाजवि धेनु चारित उभा राहात नौतार हा ।। योगी भोगिति गोप-वृंदवनिता पाहूनि नौतार हा । सोहीरामत जाण अंतसमयीं स्वामी भवा तारि हा ।।

( ५० )

आम्हां दुर्लभ गोपिवल्लभ हरी जो वश्य भक्तां तया । ध्याती अंतरिं जे निरंतर मुखें सद्भावनें गातयां ।। सिद्धांतीं रमती कळा किं गमती ही संतसांगातया । सोहिरा चुकवूनि दुर्गति म्हणे मोक्षासि या जा तया ।।

( ५१ )

हे पारंगत ग्रंथ सर्वहि करी आनंद नाहीं मना । जिज्ञासू किं विजाति होउनि जनीं मान्याचि हे कामना ।। आत्मा अंतरला अनंतरुपि हा चित्तींच हे फाम ना । सोहिरामत जाण तूं मग तया कल्पांतिं आराम ना ।।

( ५२ )

चंद्राचे उदयीं समग्र भरती येते जसी सागरा । उद्यानीं सुमनें वसंतसमयीं वृक्षासि कीं डोंगरा ।। वस्तू संनिध गा ! जगा प्रसवली हे प्रकृती नागरा । सोहीरा म्हणतो जळेंशिं निपजे हे लोण मायागरा ।।

( ५३ )

भ्रांती ही दमती कळाचि गमती चिद्वृत्ती उद्दाम ती । बुद्धी ये समती विवेक रमती अभ्यास मुद्दाम ती ।। आनंदें गमती

करोनि वमती तन्मात्र लुब्धामती । सोहीरा कुमती प्रपंचिं घुमती आत्म्यासि बेफामती ॥

(५४)

हा वैकुंठपती मनांत जपती त्यां पातकें कांपती । देहासंगहि रापती तमरजें ब्रह्मार्पणें घापती ॥ देतो हे सुमती कधींच कुमती संसारिं ना लिंपती । सोहीरा मत ना कधीं विलपती संरक्षि त्यां श्रीपती ॥

(५५)

हें तापत्रय देखुनी उपजला संत्रास चित्तास हो ! । तें सद्ब्रह्मपदीं सदींच मिळतां ना लभ्य हा त्रास हो ! ॥ माया भासत व्यापकें पटचि हा जो एक सूतास हो ! । सोहीरामत सर्व ब्रह्म दिसतें सद्गूरूसूतास हो ! ॥

(५६)

हा विष्णू भगवान् संकटिं हरी दासांसि जो सारथी । स्वामी आपण अर्जुनारथीं बसे प्रख्यात जो भारतीं ॥ देखोनी कुलगोत्र श्रेष्ठ गुरु ते तो वीर हा वीरथी । सोहीरा म्हणतो किं युद्धिं भविली हे ज्ञानभागीरथी ॥

(५७)

आकारीं भगवंत देख बरवा कैशापरी वर्ततो । डोळा कान किं नाक मूख दिसतें वर्ताचि वीवर्ततो ॥ सत्ता आपुली आपणाधिन असे तो शून्यि किं पर्ततो । सोहीरामत तोचि संत समजा आनंदिं कीं नर्ततो ॥

( ५८ )

देवापाशिं तुझा सुनेत असतां तोटाचि नाहीं तुला । कोणी एक विशीं अपूर्ण न करी कल्पीत या हेतुला ॥ अदृश्यीं असतां प्रकाशत भला आत्माचि हा आंतुला । सोहीरामत भक्त हो मग तुला संसार हा केतुला ॥

( ५९ )

औटीहात शरीर बंदिं पडतां आम्हीं म्हणों थोर हा । पांचांचें सुख सेवुनी संवकला कायेमधें चोर हा ॥ मिथ्या आदरितो किं या मृगजळीं संसारची घोर हा । सोहीरामत नर्क भोगि पुढती माहान दुर्वार हा ॥

( ६० )

नित्यानित्यविचार नित्य करितां उद्धार होतो जिवा । जैसा तो सुविकास होत बरवा सूर्योदयीं राजिवा ॥ तेवीं संतसमागमें उमजुनी चिंचिंतनीं ताजवा । सोहीरामत जाणुनी अनुभवा स्वानंदची राजिवा ॥

( ६१ )

ज्या वर्माविण कर्म हें करुनियां शुद्धांश जो सांडिसी । राखोंडी फुकणें कणेंविण उगा कोंडाचि तूं कांडिसी ॥ टाकूनी सुटका वरी किं लटका व्यापार हा मांडिसी । सोहीरा निजधैर्यदुर्ग म्हणतो ज्ञानेविणें पाडिसी ॥

( ६२ )

ही सृष्टी सकळैक वर्तत असे ज्याच्या निरोपावरी । त्या ज्ञानेंचि उदास होउनि मना घे भक्तिची पायरी ॥ दृष्टी देउं नको निमीषभरि तूं या दृश्य रोपावरी । सोहीरा लय लाविं तूं म्हणतसे या नीजरूपावरी ॥

( ६३ )

आत्म्याचें निजरूप चर्मदिठिला कैसेंनि तें भासतें । जेथें-तेथाचि पाहतां गगन तें शून्यींच आभासतें ॥ आलें नामरुपा सगूण-पण तें तत्काल हो नासतें । सोहीरामत ब्रह्मरूप उगमीं ठायींच तें आसतें ॥

( ६४ )

आशा तूं कवणाचिही धरुं नको त्या ईश्वरावांचुनी । कोण्या आचरणीं कृपा करि हरी ग्रंथीं पहा वाचुनी ॥ अभ्यासें मन लाव शून्यभुवनीं पाहा कसें लांचुनी । सोहीरा म्हणतो भवांतुनि पुढें नरकासि या कांचुनी ॥

( ६५ )

चित्सूर्योदयिं ती प्रकाशत मती संसार नाशी तमा । तें मी कोण असें निरेखुनि पहा बोधासि या उत्तमा ॥ ऐसें कोण करी तरी परि शिरीं सद्गूरुचा हात मा । सोहीरा म्हणतो जनीं मग तया कोणाचि नाहीं तमा ॥

( ६६ )

त्याला प्रीय असो अरण्य गृह कीं राहेल तैसा असो । जो सर्वाद्य अनंत विश्वरुपि तो पाहेल तेथें दिसो । आम्हां कोण सुअर्थ स्वार्थ बरवा आनंद चित्तीं वसो । सोहीरामत तोचि संत समजा बैसेल तेथें बसो ॥

( ६७ )

जन्मा येउनियां जयासि बरवा आत्माचि हा लाभला । तो प्राणी किं घरीं वनांतरिं असो कोठे तरी शोभला ॥ देवा गात सुध्यातसे मनिं खुला जाईल तेथें भला । ज्याणें कीं दृढ सोहिरा म्हणतसे वीराग आरंभिला ॥

( ६८ )

सद्भक्तीकरितां जयावरि असे श्रीनाथ संतुष्ट हा। नाहीं मान अमान कांहिं न धरी नामामृतें पुष्ट हा ॥ नाहीं क्लेशहि लेश मानसिं नसे उद्देश ना दुष्ट हा। सोहीरामत देव पाहत असे सृष्टींत अदृष्ट हा ॥

( ६९ )

योगाचें बल पूर्ण तूं करुनियां नीरंजनीं न्हे मना। तेव्हांची तुज सोडि नित्य प्रतिती संसार कूकामना ॥ नीरालंब अनंत सत्य-स्वरुपीं होणें घडे सामना। सोहीरा म्हणतो स्तवीं किमपिही केव्हांचि बेफाम ना ॥

( ७० )

भावार्थेंचि पतीतपावन हरि भक्तांसि जो भेटतो। मिथ्या दावि भवासि सांग करितां औंधीच कीं वेंठ तो ॥ त्या मोहांतुनि काढुनी मनचि हें नीरंजनीं दाटतो। सोहीरामत दृश्यसंगतिविना आनंदची वाटतो ॥

( ७१ )

देवाला स्मर तूं दुरीत हर तूं संदेह नीवार तूं। कांहीं हार-विहार तूं करिं परी भ्रांतीस नीवार तूं ॥ चित्तालाचि सुधार तूं अनुभवें हा जीव उद्धार तूं। सोहीरा लय लाविं तूं म्हणतसे त्या नित्यशुद्धींत तूं ॥

( ७२ )

पाठीं स्वामि समर्थ देव असतां भक्तांसि कें वाण हो!। आधीं संकट पाडितो परि पहा पाहात निर्वाण हो! ॥ तूर्याकामिनि या सुवासिनिस दे सन्मानसा वाण हो!। सोहीरा मग तें म्हणे मिळतसे हे सिद्धि कल्याण हो! ॥

( ७३ )

या कामासि मनीं प्रवेश घडतां मोहीत रामांकिं रे ! । नोहे हें सुख जाण केवळचि तूं पीसी मदीराचि रे ! ।। ज्या यंत्रीं नलिकेचिया पडतसे पाशींच मोहें किरें ! । तेवीं मूकसि सोहिरा म्हणतसे मोहेंच रामीं किं रे ! ।।

( ७४ )

आत्माग्नीवरि हा जिवत्व नग तूं सर्वेचि ऊलाख हो ! । सांचोटीं पडती वरीहि कढती नेणीव कीं लाख हो ! ।। हेमीं भेद नसेचि डांक मनची हें द्वैत सूलाख हो ! । सोहीरामत सृष्टि हे निपजते अश्वत्थि या लाख हो ! ।।

( ७५ )

लंडी दंडि वितंडवाद करितो तो मूर्ख पाखंडि हो ! । काढी कल्प उगोंचि अल्पमतिनें मध्येंच मूषांडि हो ! ।। बोधना जड तो विजाति पढतो काढीत कुष्मांड हो ! । सोहीरामत साधुसूर्य उदयीं हा राहु घुष्मांड हो ! ।।

( ७६ )

हा पूर्वार्जित भोग योग बरवा देहासि या भोगवी । या जीवा शिवरूप लाधत वरि आयुष्य हें जोगवी ।। निर्वीकल्पस्थिती असूनि सहजीं हा संग आरोगवी । सोहीरामत अंतरीं विहिन तो बाह्यीं दिसे सोंगवी ।।

( ७७ )

आपूल्या समसाम्य मानित मनीं साधूसि संसारि हो ! । त्याला पाहत दानवावत वरी क्षोभेल कंसारि हो ! ।। मूका अंध बधीर कुब्ज घडवी जन्मींच दारिद्रि हो ! । सोहीरामत जेथ जाइल तया कोणीहि धिःकारि हो ! ।।

(७८)

आनंदें भजिजे सदांच पुजिजे आकाशिंचा कुंभ हो ! । इंद्रीयें सुमनें वरी झडकरी दे वायुचा धूप हो ! ॥ सोऽहंगंध सुगंध लेपुनि पहा तूं आपुलें रूप हो ! । सोहीरामत तीनि पालटुनि तूं सद्ब्रह्मची पूर्ण हो ! ॥

(७९)

हाते होड असूनि काय करणें प्रीती लघू केतकी । मोठा वृक्ष असूनि काय बघ तो काजासि ये केतकी ॥ तैसें मायिक जाणुनी उमजला जो नाथसंकेत कीं । सोहीरा म्हणतो हिरा निपजला विश्व-स्फटीकांत कीं ॥

( ८० )

हेंची कारण म्यां म्हणें तुज मना जा आपुल्या ऊगमीं । गंगा जैशि मिळे रुळे अनुदिनीं सिंधूचिया संगमीं ॥ मातें भासत तूं बहू उमजसी कुंठीत जैं नीगमीं । सोहीरामत ध्यावि चित्कमळिं तूं हे तृप्ति सारंगमीं ॥

( ८१ )

जैसा त्या जळिं हा विकास कमळां देखोनियां कीरणी । आकारींच असोनि चित्तिं मनिं तो कूटस्थ चूडामणी ॥ ज्ञानाचा अधिकार पावुनि दिसे सद्बुद्धिचूडामणी । सोहीरामत जाण मुक्तपणिं तो जींवंत विद्वन्मणी ॥

( ८२ )

योगें आकळुनी किं प्राणपवना ब्रह्मांडिं जो न्यावया । आत्मा-रामसमुद्रपर्वणिंत जो उत्सूक कीं न्हावया ॥ आपेंआपण तद्रुपीं विलयता सद्दर्शना घ्यावया । सोहीरामत हेंचि कारण मुळीं वैराग्य बिंबावया ॥

( ८३ )

पिंडामाजिहि सर्व जाणिवकळा साक्षीच लक्षीतसे । व्यत्यारेक मुखेंहि भासत मनीं दृश्यासि भक्षीतसे ॥ जाणूनी निजनेणिवीं रमति जे विज्ञानदक्षी तसे । सोहीरामत एकदेशि नव्हती सर्वत्र पक्षी तसे ॥

( ८४ )

परब्रह्मरूपेंचि हे लोक सारे । जगद्रूप आहे तरी तो कसा रे ! ॥ न ठावें तरी सद्गुरूसी पुसा रे ! । म्हणे सोहिरा त्याविणें वैरि सारे ॥

( ८५ )

विवेकें पहातां तदीं देह नाहीं । जया दृश्यद्रष्टत्वि संदेह नाहीं ॥ जिवन्मुक्त आहेचि संसार सारा । वदे सोहिरा देख तूं ब्रह्मसारा ॥

( ८६ )

धरीतोसि ही वावुगी आस कीं गा ! । मुलीचे मुरांरचि हे आस कें गा ! ॥ असोनी घरीं अन्न उपास कां गा ! । म्हणे सोहिरा देव उपासकां गा ! ॥

( ८७ )

जनीं येउनी लागतो ब्रह्मलागा । हरीभक्त सज्ञान वाटे मला गा ! ॥ जयासी समाधीविणें आसवेना । म्हणे सोहिरा दृश्यि जो आसवेना ॥

( ८८ )

मी कोण देहीं जरि या कळेना । निश्चीत हा देव तया कळेना ॥ साधू जया संगतिला मिळेना । त्या सोहिरावाक्य गती मिळेना ॥

( ८९ )

असंगोंचि राहा नको हा टका हो ! । प्रपंचीक मेळा नको हाट कां हो ! ।। निजानंदसूखींच कीं मग्न व्हा हो ! । म्हणे सोहिरा संसृतीं सूटका हो ! ।।

( ९० )

जगद्बुद्बुदाचेंची पहा एक वारी । तयाचेनि संगोंचि भंगेल वारी ।। मिळूनीहि तेथेंच तूं ऐस कीं गा ! । म्हणे सोहिरा त्याग ती आस कीं गा ! ।।

( ९१ )

पंथ हा सुगम रे ! सुचवीला । लाग तूं सुरस या सुचवीला ।। ऐशियें गुरुदया तुज आहे । सोहिरा म्हणत विद्गद पाहें ।।

## ( १६ ) अभंग.

( १ )

स्थूल कोणी हें केलें । तेथें मन माझें गेलें ॥ १ ॥ चळत्याची हे अनावडी । चाळवित्याची आवडी ॥ २ ॥ नाशिवंत नाठवतें । अविनाश आठवतें ॥ ३ ॥ मधलें कोणासी पडलें । आदि अंतीं लय जडलें ॥ ४ ॥ हाता आली तत्त्वभिंती । जगच्चित्रें उठती किती ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे कीर ऐसें । अंतःकरणाचि झालें तैसें ॥ ६ ॥

( २ )

ऐशी अव्यक्त हे भिंती । विश्वचित्राकारें मिरवती ॥ १ ॥ 'अहं ब्रह्मास्मि' हा चुना । काढुनि लेपें योजिलीं नाना ॥ २ ॥ पंचभूतांचा हा रंग । भरोनि प्रकृति हें अष्टांग ॥ ३ ॥ कल्पना हे चितारिणी । करी नामासारिखी रेखणी ॥ ४ ॥ लेप उपटती जाती क्षय । परि भिंती हे अक्षय ॥ ५ ॥ भिंती नाहीं आदि अंत । हाचि योग्यांचा सिद्धांत ॥ ६ ॥ सोहिरा म्हणे लेपाचा पसर । मोडिल्या भिंतीचा पडे विसर ॥ ७ ॥

( ३ )

ऐशी राऊत राहाटी । बैसे मनपवनाचे पाठीं ॥ १ ॥ घेउनि विवेक मालकाठी । लागे भेदाचिये पाठी ॥ २ ॥ आंगीं वैराग्य चिलखत सूये । लागों नेदी द्वैताचा घाये ॥ ३ ॥ शांतीचें हें ठेवुनि जीन । वरि घातलें आसन ॥ ४ ॥ धरी शमदम लगाम । अन्वयव्यतिरेकें सुगम ॥ ५ ॥ धारणेचा हा चाबुक ।

धरी षट्चक्रांचा टोंक ॥ ६ ॥ सोहिरा आधारींहुनि मारी । निघे ब्रह्मरंध्राभीतरीं ॥ ७ ॥

( ४ )

स्थूळ नव्हे आमुचा देश । केला परेपरता वास ॥ १ ॥ येथ नाहींच कांहींच काम । ओळखिलें निजधाम ॥ २ ॥ निरालंबघरा । रिघालों दशव्या द्वारा ॥ ३ ॥ अभ्यासाचे संगें । आलें सुषुम्नेच्या मार्गें ॥ ४ ॥ इडापिंगळा टाकिली । निजसमाधी लागली ॥ ५ ॥ अनेकत्व ना अवलोकीं । दृष्टी मिळाली हो एकीं ॥ ६ ॥ उघडिलें ककारमुख । सोहिरा म्हणे आम्हीं आलख ॥ ७ ॥

( ५ )

मुद्रा लागली खेचरी । परतुनि नये चराचरीं ॥ १ ॥ स्वानुभववनीं । स्वसुख सहज निरंजनीं ॥ २ ॥ टाकुनी सकळ लक्ष । आजि हे अलक्ष ॥ ३ ॥ मनुबुद्धिसि ना गोचर । ऐशी अगम्य अगोचर ॥ ४ ॥ अहंकार हा समूळ । जाउनि सांपडलें मूळ ॥ ५ ॥ सर्वांचा आरंभ । विकासलें निरालंब ॥ ६ ॥ महाशून्यीं करोनि वास । म्हणे सोहिरा उदास ॥ ७ ॥

( ६ )

सद्गुरुकृपेचें हें देणें । समाधान केलें येणें ॥ १ ॥ पावविलें ऐसें खुणें । जेथ नाहीं येणें जाणें ॥ २ ॥ सुखें सुखांताचि लोळणें । प्रेम नयेचि बोलणें ॥ ३ ॥ निका तुटला भेदाभेद । जाहला सहज आनंद ॥ ४ ॥ विकासलें निरंजन । उन्मळिले हे लोचन ॥ ५ ॥ मना नाहीं हो ! संचार । ऐसें अगम्य अगोचर ॥ ६ ॥ नामरूप नाहीं ज्याला । ऐसा गैबचि झाला ॥ ७ ॥ मज बैसविलें स्वस्थ । जेथें उदो नाहीं अस्त ॥ ८ ॥

पडे मेघाविण पाऊस । चांदणेंविण प्रकाश ॥ ९ ॥ हें परमामृत-पारणें । मज झालें सोहिरा म्हणे ॥ १० ॥

( ७ )

संकट निरसीं गा ! जगदीशा । हेचि मज तुझी आशा ॥ १ ॥ हरीं या मनाच्या कल्मषा । दावीं मज स्वयंप्रकाशा ॥ २ ॥ सर्वही तुझा तूंचि ईशा । परि व्याकुळ हे जीवदशा ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे विशेषा । मी या पुनरपि नये देशा ॥ ४ ॥

( ८ )

तरि धन्य ते संसारीं । इंद्रियें वळविति जे माघारीं ॥ १ ॥ वृत्ति नेती त्रिकुटावरी । मिळोनि जाती निराकारीं ॥ २ ॥ मी हा कोण ऐसें पाहती । तटस्थ होती नेत्रपातीं ॥ ३ ॥ जे जित्वताची मेले । मरोनि पुढती जीवे झाले ॥ ४ ॥ उदो नाहीं अस्त । तेथ झाले समाधिस्थ ॥ ५ ॥ तयां कैसे हो गणावें । देव मानव कीं म्हणावें ॥ ६ ॥ डोळां आलिया कवळ । चर्मदृष्टि दिसते स्थूळ ॥ ७ ॥ त्याचि घ्यावी पैं कळाची । काया जाणावी मृगजळची ॥ ८ ॥ अवयव आनंदाचे । जे अंकुर चैतन्याचे ॥ ९ ॥ सोहिरा म्हणे मी हो ! पाहीं । जयां मीपण नाहीं ॥ १० ॥

( ९ )

सर्वीं सर्वत्र तूं पाहें । येथें कोणाचें काय आहे ॥ १ ॥ पंच-भूतांचें हें देह । तूं कां वाहसी संदेह ॥ २ ॥ प्रपंचभूमीचें हें चित्र । हें तव तुझेंचि कीं सूत्र ॥ ३ ॥ दृश्य दिसतां गोड वाटे । जेथुनि आलें तेथ आटे ॥ ४ ॥ जाणें आकाशींच्या वोहरी । चैतन्य-सिंधूच्या लहरी ॥ ५ ॥ ऐसें ज्ञान जेथुनि झालें । देखणें त्यांत सामावलें ॥ ६ ॥ सोहिरा म्हणे जगीं आलों । बोल बोलूनि बोलासि प्यालों ॥ ७ ॥

( १० )

काहीं बोलावेंसें नाहीं । रुप डोळ्यांवीण पाहीं ॥ १ ॥ वाचेवीण बोलणें । जेथ पायावीण चालणें ॥ २ ॥ कानेवीण घेतों साद । जिव्हेवीण चाखें स्वाद ॥ ३ ॥ त्वचेवीण घेतों स्पर्श । भोगीं चित्तावीण हर्ष ॥ ४ ॥ नासिकावीण वास । पडे मेघावीण पाऊस ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे इये खुणे । एक अनुभविया जाणे ॥ ६ ॥

( ११ )

तेव्हां झाली तुझी दया । निखिल निश्चयें सद्गुरुराया ॥ १ ॥ झाली नाहींच दिसेल काया । मग सहजेंचि तुटली माया ॥ २ ॥ वृत्ति स्थिरावली शून्या- । माजी, प्रकाश चैतन्या ॥ ३ ॥ मन-मीठपणाची मुद्रा । विराली तुजशीं चित्समुद्रा ॥ ४ ॥ जग-बुद्बुदीं तोय एक । जरि जागला विवेक ॥ ५ ॥ आरंभरंभा-स्तंभा । गैब विकास निरालंबा ॥ ६ ॥ निजसुखाची पडली वोल । गोड लागति उदास बोल ॥ ७ ॥ सोहिरा म्हणे विसर घडलें । आंगीं अद्वय अम्मल चढलें ॥ ८ ॥

( १२ )

न धरावा दुजा भाव । जवळी असोनियां यदुराव ॥ १ ॥ प्रेमें पुजीं निजसखा । निजीं घेईं निजसुखा ॥ २ ॥ गृहीं असोनि कामधेनु । कां बा ! घ्यावा याचक मानु ॥ ३ ॥ नित्यावनीं चारी गाय । तेथ दुजा पाड काय ॥ ४ ॥ धणी माझा आपा-डाचा । ठाक विषय पाडाचा ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे नसोनि असे । दिसे तें हें भ्रमपिसें ॥ ६ ॥

( १३ )

आतां केशव गीतीं गाऊं । आम्ही निजसुखासि पावूं ॥ १ ॥ केशवाहुनि नाहीं थोर । हेंचि भावूं निरंतर ॥ २ ॥ केशव आठं-

विता मनीं । मन बैसे समाधानीं ॥ ३ ॥ केशव निरसी हा संसार । देई संसारांतील सार ॥ ४ ॥ केशव भावोनि स्वामी माझा । भेद मोडूं माझा-तुझा ॥ ५ ॥ केशव माझा मायबाप । लया न्हेतो पुण्यपाप ॥ ६ ॥ सोहिरा म्हणे स्वरुपीं पाहूं । केशवचि होउनि राहूं ॥ ७ ॥

(१४)

हरि नको मजला सोडूं । दुजे पांगीलागीं पाडूं ॥ १ ॥ निजभक्तांचा हेळाडू । देउनि लावीं आपुलें वेडू ॥ २ ॥ तुझें नित्य स्मरण गोडू । काय म्हणोनियां सोडूं ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निज हें गाढूं । निरसुनि निजीं निजसुख जोडूं ॥ ४ ॥

(१५)

ब्रह्मरूप ते ब्राह्मण । हेंचि जाणावें प्रमाण ॥ १ ॥ ज्याचें घेतां चरणतीर्थ । सकळ पातकें होती व्यर्थ ॥ २ ॥ ज्यांचिया आशीर्वादें । मन बैसे निजानंदें ॥ ३ ॥ तयांहूनि आन थोर । सृष्टिं नाहीं निरंतर ॥ ४ ॥ सोहिरा वंदी त्यांच्या चरणा । चुकावि आपुलिया भ्रमणा ॥ ५ ॥

(१६)

शुद्ध भावार्थाचें घर । परब्रह्म निरंतर ॥ १ ॥ तनुमन आणि ध्यान । रिघालें हें निरंजन ॥ २ ॥ पृथ्वी आणि व्योम । यांचा न धरी जो संभ्रम ॥ ३ ॥ नामरूप जया नावडे । तया सांपडे सुरवाडें ॥ ४ ॥ देवा नुरे देवपण । सोहिरा म्हणे तो आपण ॥ ५ ॥

(१७)

ऐसे जाणावे भक्त । तेचि योगी तेचि मुक्त ॥ १ ॥ पराकमळ पर पराग । तेथ गुंतति जैसे भृंग ॥ २ ॥ अनाहत नाग-

सर चांग । तेथ जैसे कां भुजंग ॥ ३ ॥ निरंजन हेंचि गुळ । तेथ भुंगीच केवळ ॥ ४ ॥ समाधिधन निजज्योती । तेथ पायाळचि म्हणाविती ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे सत्रावीचें जीवन । तेथ निःसिम जैसे मीन ॥ ६ ॥

( १८ )

आम्हां न कळे ध्यान मुद्रा । पावलों चित्सुखसमुद्रा ॥ १ ॥ मन बुद्धि मोडुनि ठेलें । आघवें तन्मयचि झालें ॥ २ ॥ बोलावया नकळे युक्ती । आंगीं बाणली विरक्ती ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे टाकिला मेरू । झाला परपार उतारू ॥ ४ ॥

( १९ )

आनंदें नाचे हा श्रीरंग । वाजवी अनाहातसारंग ॥ १ ॥ मोठा होताहे गजर । नादें दुमदुमिलें अंबर ॥ २ ॥ बारा सोळा त्या गोपिका । माजी तूर्या हे राधिका ॥ ३ ॥ देख काया हे कदंब । यमुना सत्रावी स्वयंभ ॥ ४ ॥ इंद्रियें गोधनें चारिताहे । विवेक रक्षक उभा आहे ॥ ५ ॥ पेंदा सुदामा संवगडा । भक्ति-ज्ञान-वैराग्य वांकुडा ॥ ६ ॥ ब्रह्मरंध्रीं गिरिवरधारी । सोहिरा प्रतीति तयावरी ॥ ७ ॥

( २० )

तो मज आवडतो परम । भक्तकाजकल्पद्रुम ॥ १ ॥ ज्याची सत्ता अगोचर । एवढें चाले हें शरीर ॥ २ ॥ असे तंव संसारीं झुलवी । परि मज त्यामाजीं न भुलवी ॥ ३ ॥ अनेक लाघव मांडी । परि मज भ्रमांतून काढी ॥ ४ ॥ वैराग्यवनवसंत । अक्षय देव सदा संत ॥ ५ ॥ अनेक रूपीं एक । अनंत–ब्रह्मांड–नायक ॥ ६ ॥ सोहिरा म्हणे केली दया । आतां न विसरों तया ॥ ७ ॥

( २१ )

तुझा तूंचि कीं दातारा । घेसी अनेक अवतारा ॥ १ ॥ तूंचि कल्पने कर्तारा । तूंचि स्त्रियेच्या भर्तारा ॥ २ ॥ तूंचि चंद्रमा कीं तारा । तूंचि तिमीर कांतारा ॥ ३ ॥ तूंचि जीव या उद्धारा । शिव भवसिंधु उतारा ॥ ४ ॥ तूंचि बाळही म्हातारा । तूंचि गोकुळासि थारा ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे तूंचि सारा । सारा परता त्यांतिल सारा ॥ ६ ॥

( २२ )

निरंजनसेजे । सुलीनकलावंती । भोगिती सतती । योगीराज ॥ १ ॥ काम-क्रोध बंधु । आशा-तृष्णा बहिणी । त्यागिल्या कामिनी । बारा सोळा ॥ २ ॥ अविद्या हे माता । अहंकार पीता । टाकिली ममता । कन्या कीं हे ॥ ३ ॥ निष्ठूर होऊनि । मिनले परद्वारा । मन-बुद्धि संसारा । मोहर नेघे ॥ ४ ॥ होउनि सचाड । सेविति रतिचाड । इंद्रियां कवाड । देउनियां ॥ ५ ॥ असतांचि उघडीं । इंद्रियें झाकिलीं । वृत्ति संवकली । तया ठायीं ॥ ६ ॥ रात्री कीं हा दिवस । भोगितां हा नेणे । विरळा कीं या खुणें । बुजती कोणी ॥ ७ ॥ न गणिती जीव-शिव । दोन्हि भेदाभेदें । निजानंदछंदें । रंजले कीं ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे आम्हा । तेंचि कीं व्यसन । वासनावसन । न धरे अंगीं ॥ ९ ॥

( २३ )

देवाविणें काम । दुजें नसे धाम । तरि हा आत्माराम । भेटों सके ॥ १ ॥ देवचि चालतां । देवचि बोलतां । देवचि निजतां । समाधीशीं ॥ २ ॥ देवचि हेळतां । देवचि खेळतां । देवचि मेळतां । आपेंआप ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे दूजें । कांहिंच नसावें । होउनि असावें । देवरूप ॥ ४ ॥

(२४)

देव भावीं नित्य । स्वरूपीं अनित्य । भक्तीचें हें सत्य । थोर आहे ॥ १ ॥ भक्तीचीया भावा । भेटे स्वयमेवा । आत्मअनुभवा । पाविजेतो ॥ २ ॥ देवाहूनी थोर । नाहीं निरंतर । ऐसें हें अंतर । निर्वाळीजे ॥ ३ ॥ भक्तीचीये चाडी । गुंतला आवडी । अविद्येचि बेडी । तोडिजेते ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे मग । भक्त तोचि देव । यदर्थीं संदेह । नाहीं नाहीं ॥ ५ ॥

(२५)

ऐसें हें कौतुक । देख अलौलिक । वैकुंठनायक । भेटला तो ॥ १ ॥ भेटीवीण मज । निर्जीं नये नीज । सर्वे यदुराज । देखिल्यावीण ॥ २ ॥ आनंदें भावीन । होईन समाधान । सर्वेचि निदान । गोड करी ॥ ३ ॥ ऐसा हा श्रीहरी । वदावा वैखरीं । बोधाचे सागरीं । बुडवील ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे माझा । भावीं जीवलग । निवृत्ति निर्वाणांग । भोगीन तें ॥ ५ ॥

(२६)

हरीभेटीसाठीं । साधन आटाआटी । तो मज शेवटीं । आंतुडला ॥ १ ॥ ज्याच्या रूपालागीं । श्रमताती योगी । तो मज पूर्णांगीं । वोडवला ॥ २ ॥ ऐसा हा निर्गुण । धरोनी सगुण । एकीएक खूण । जाणियेली ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे तो हा । न्हे विश्रांतिगेहा । ज्याणें निःसंदेहा । मेळविलें ॥ ४ ॥

(२७)

जयाचें तें स्वरूप । वेदांसी अमूप । तेथें कोण माप । करूं सके ॥ १ ॥ जयाचे पवाडे । बोलों जातां तोंडें । ब्रह्मादिक वेडे । झाले जेथ ॥ २ ॥ ऐसा आत्माराम । भावोनि आराम ।

जेथ सर्व काम । हारपले ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे ज्याचा । परिकर साचा । आपुले मूळींचा । ठाव दावी ॥ ४ ॥

(२८)

आनंदें आनंद । जोडे निजपद । खंडी भेदाभेद । अंतरींचा ॥ १ ॥ ज्याला नित्य ध्यानीं । जाणिला निदानीं । सर्वें या साधनीं । काज काय ? ॥ २ ॥ काजावीण ज्याणें । पावविलें खुणें । तेथ वाखाणणें । काय मग ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निज- । बोध हा सहज । तेथ सर्व काज । हारपलें ॥ ४ ॥

(२९)

जेथ पूर्ण ज्योती । भाविली सततीं । भवभ्रमभ्रांती । दूर झाली ॥ १ ॥ आनंदाचे जळीं । देतां बुचकळी । कल्पनेची मळी । झाडियेली ॥ २ ॥ जेथ पूर्णपण । आंतुडे प्रमाण । चैतन्य उगाण । झालें जेथ ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे निर्जीं । निजेला सहजीं । स्वरूपाचे शेजीं । पहूडला ॥ ४ ॥

( ३० )

आनंदाचे जळें । भरियले डोळे । चैतन्यसोहळे । भोगियेले ॥ १ ॥ ज्यासि शांतिपथ । आंतुडे सनाथ । सवें आदिनाथ । भेटला तो ॥ २ ॥ सोहिरा म्हणे माझा । सखा जिवलग । जेणें हें सर्वांग । वसविलें ॥ ३ ॥

( ३१ )

देवावीण येथ । दुजा नाहीं नाथ । त्याविण सनाथ । कोण करी ॥ १ ॥ देवावीण आतां । मज नाहीं दाता । नीज हें तत्त्वतां । कोण दावी ॥ २ ॥ देव माझा बाप । देवचि स्वरूप । देव दिव्यरूप । रूपातीत ॥ ३ ॥ देवचि हें सार । देवचि संसार ।

देव निरंतर । वेगळाचि ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे एकीं । एकचि होऊनी । सर्वे समाधानीं । राहावें गा ! ॥ ५ ॥

(३२)

भावीन सहजा । निजयोगिराजा । मनाचिया काजा । दूर करी ॥ १ ॥ मुळींचा गोसावी । घराचार भावी । पाहतां नागवी । सदांचा जो ॥ २ ॥ वेढिला लेंकुरीं । बाळब्रह्मचारी । कैसा तो अंतरीं । जाणावा गा ! ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे वांझीं । निपजला पुत्र । चोज हें विचित्र । पाहावें गा ! ॥ ४ ॥

(३३)

तुझें तूंचि केलें । पाप पुण्य ठेलें । तेथ माझें गेलें । काय पां तें ॥ १ ॥ करोनि अकर्ता । धरोनि न धर्ता । तूंचि एक हर्ता । सुखदुःख ॥ २ ॥ निजरूपीं लया । लावीं यदुराया । सर्वेचि हे माया । दूर करीं ॥ ३ ॥ चित्त हें केवळ । तुजशीं प्रेमळ । दुजेयाचा आळ । आणूं नको ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे बापा । अनुभव सोपा । करीं नीजकृपा । आपुली ही ॥ ५ ॥

(३४)

निःस्पृह झाला । संसार सुटला । परब्रह्मीं भेटला । आपेंआप ॥ १ ॥ न गणी देह हें । न गणी इंद्रियें । जाहला जितेंद्रियें । निरालंबी ॥ २ ॥ न गणी हे जन । न गणी वीजन । भोगी निरंजन । अखंडित ॥ ३ ॥ न गणी हे पृथ्वी । न गणी हें व्योम । पावला आराम । भ्रमरगुंफे ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे कर्म । करोनि निष्कर्म । अवचटेंचि वर्म । हाता आलें ॥ ५ ॥

(३५)

डोळ्यांतील डोळा । देखिला निराळा । भोगिला सोहाळा । सत्रावीचा ॥ १ ॥ न होतां उत्पन्न । देखिलें हें जग । वोळंगे

राजयोग । नित्य ऐसा ॥ २ ॥ पाहतां नुरे जन । बुद्धि आणि मन । जाहला निरंजन । रूप कीं हें ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे नुरे । मग हें मीपण । सर्वत्र आपण । तोचि झाला ॥ ४ ॥

( ३६ )

गर्जतां नवघन । मयूरचि नाचे । येरां काय त्याचें । प्रयोजन ॥ १ ॥ वाजतां नागसरी । नागचि तो डोले । आणि दिवड चाले । आपुल्या काजा ॥ २ ॥ पंचम आलाप । ऐकत्या सोहळे । बहिऱ्या काय कळे । त्याचें प्रेम ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे होतां ब्रह्म । साधु समाधान । उपसर्ग अज्ञान । तया नाहीं ॥ ४ ॥

( ३७ )

हंसाचा चारा । न इच्छिती वायस । आणि मेल्या मांस । भक्षितील त्यांचें ॥ १ ॥ नागसरीचें सूख । दिवडा केविं कळावें । उंदीरचि गिळावे । त्याणें पैं गा ॥ २ ॥ अग्निमाजी सती । एकलीच जळे । आणि पाहावया मिळे । सकळ जन ॥ ३ ॥ तैसा कोणी न झोंबे । साधूच्या आनंदा । आणिक करावया निंदा । कित्येक मिळती ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे यांत । आमुचें काय गेलें । तुमचेंचि केलें । पावाल तुम्हीं ॥ ५ ॥

# ( १७ ) हिंदी पदें.

## पद १ लें.

अजरामर साहेब मेरा । मैं नमाज़ पढ़ूँ हुकूम है तेरा ।। ध्रु० ।। उनका नाम सुखी हो गाऊँ । तब संसारमें फेर न आऊँ । दसवें द्वार सदर पर जाऊँ । मुझमें बैठ रहे दरबारा ।। १ ।। जो कोइ भक्त बच्चा धेनू । जो कोइ मो बिनु बजावत बेनू । जो कोइ तूर्या बिराजत रेनू । मुदित मुदारा ।। २ ।। जिन्नें मनपर मारा मेख । ताकूँ रूप नहीं बे रेख । सब दुनियाँमें व्यापक एक । बडा दिलदारा ।। ३ ।। शून्य भुवनमें गाजा । आपहि मग्न रहे मनराजा । कहत "सोहिरा" बाजत बाजा । दिनरात नगारा ।। ४ ।।

## पद २ रें.

अपनी सूरत फेर फेर पलखसें देखो तुम, जोगी । बाजत बाजा लगन गगनमें अनहत तुमरी शिंगी । नवद्वारकूँ छोड़ छोड़कर दसवें द्वारकूँ जावो । तनके पास तो सबका रहना, मनपवना अलख जगावो । भगत लच्छकूं लेता नहीं ओही करार रखना बंद । तेरी अखियाँकूं करे चकियां उनकी समाध पुनवा चंद । ज्ञान ध्यानकर मगन बैठ, तब उनका पीना दूध । जोग जुगतसें चढते जावो, । तोषगिरीऊपर है गौवा । कहत "सोहिरा" जिन्ने भरि है नादबिंदकी पेटी । अंदर है सो बाहिर रखना, चिंता रखना, झूठी ।। १ ।।

## पद ३ रें.

अॅलेख अॅलेख कर फेर जोगी औटकर बनीं । नगरीमें निज मठकूँ जानेकूँ बिचार करे मनीं ।। ध्रु० ।। नाडि बंद के अचल

चित्तकी कौपीन लगावे । षट् वैरी बैरागी पिचकर वो बभूत चर्चावे । अवधूत नामें श्रवनीं अच्छा मुद्रा बतावे ॥ १ ॥ अहं फाड़कर कफनी करकर आंगि चढ़ावे । भावकी झोली करकर भक्तिकूँ बिचमें रख तावे । सबकी समता वंदुनि शिरपर छया बतावे ॥ २ ॥ विनति वंदन करिजो तेरे जोडूँ करकमल । मेहरबानीसें करिजो मेरा चित्तके गंगाजल । कहत "सोहिरा" ॥ ३ ॥

पद ४ थें.

आव गगन महलका राजा, हरदम अनुहातका बाजा, दिनरातसें गाजा, आप सूरतसों साज्या ॥ १ ॥ आव निरंजन तखत, बडा बखत मनका, राऊत पवनका घोडा, आगमकी चलन, निगमकी रैन ॥ २ ॥ आव धरत्रीका पाया, छोडकर माया, ज्ञानकी गया, मगन भया भूपका भूपाल, सब दुनियाका लाल ॥ ३ ॥ आव बिबेक पंजरका राम, तूर्या उनका आराम, ज्ञान ध्यान तीरथमें अस्नान ॥ ४ ॥ अमृतअनुभवका पान, भगत उनकी भान, समाधके पेटमें पैदा, संत उनका बेटा ॥ ५ ॥ आव ! प्रेम उनका गांजा, बिन पावेसे माज्या नहि धर्ते लाजा, एकछत्र उनका राजा ॥ ६ ॥ आव ! निगम जलका मासा, सब आलमका तमाशा । खाने पीनेकी उनकी खुजरत, दिल लालका साईं हजरत ॥ ७ ॥ आव ! जोग पंछी फल मुमुखकी जपमाल, अनुतापका तप, अजपका जप, नादबिंद कला ज्योत उनकी तलब ॥ ८ ॥ आव ! आनंदका अजब, नजरका नचब । सब इंद्रियोंसें न्यारा, कहत "सोहिरा" सोहं महल हमारा ॥ ९ ॥

पद ५ वें.

आहा रे ! जोगी ! अॅलख ! अवधूत ! ॥ ध्रु० ॥ बिबेक बैराग्य दोरा सूँ अजब टांग दिया । निरंजनकी बस्तीकीये बढी

गोदडिया ॥ १ ॥ मूँ बीन बजावे सुनों, गम्मत नाद होंगी। मन बे भूल गया अच्छी अनुहात शिंगी ॥ २ ॥ तन मोकूं दिया लिया पिया अर्धचंद्रा । चिन्मयका उलटा–जोग खेचर–मुद्रा ॥ ३ ॥ औरत बिवुरत कोई नहीं, नहीं उनके बाल । आप बिन बात नहीं, आगेका अच्छा लाल ॥ ४ ॥ सब तमाशा छोड़-कर नटिया संसार झूठमें । त्रिकूट श्रीहाट, उलट बैठे गोहाटमें ॥ ५ ॥ औटपीठ समाधमें, भ्रमर गुंफका बासी । पर्तबिंब बे नहीं निरालंब सन्यासी ॥ ६ ॥ ज्ञानगंगा तीरथ पच्छिम पंथ चिदं-बर । शबे द्वारकूं निद्रा कीजे नाथ दिगंबर ॥ ७ ॥ नादबिंद कला जाके तनकी बभूत । रूप नहीं रेख देख जग जागति ज्योत ॥ ८ ॥ आवतां जाता पुरुख नहीं लग्या पैशूनता । अपनें खेलसें खेलता "सोहिरा" कांहीं नहीं सुनता ॥ ९ ॥

पद ६ वें.

इंद्रियसें निकलगया, मगन हुआ मन ॥ ध्रु० ॥ रूपरेख नहीं उनकूं मिले निरंजन ॥ १ ॥ अनुभव हाटका बनियाँ सब दुनियाँका लालन ॥ २ ॥ उनकी चर्या बढी तुरिया औरतसे खेलन ॥ ३ ॥ कहत "सोहिरा" जलाल, उनका महाल योग गहन ॥ ४ ॥

पद ७ वें.

उलट किया मैं पलख अलखसें लगन लगी हर बखत । मगन-मस्त मैं गगन महलमें गैब हमारा बख्त । नारीपुरुख नहीं रूपरेख, वो देख निरंजन तख्त । कहत "सोहिरा" त्रिकूट पलंगपर मलंग फकीर मैं फक़त ॥ १ ॥

पद ८ वें.

और कौन करे भजन जिन ॥ ध्रु० ॥ दिल मेरा विसरों आपके बिचमें । सब झडती लीनी लंपट जनन ॥ १ ॥ सबकी

करामात उनके पास । संग विसंग सब कारण मन ॥ २ ॥ गये जनमका सांचा तो बडा । सो धन्य नर कोहि मगन उन्मन ॥ ३ ॥ तीन्हों ग्रामसें घटमठमें रहता । किसे मालूम भगवान् ॥ ४ ॥ म्लेच्छ बातसे ज्ञान बताया । "सोहिरा" करे तेरा ध्यान ॥ ५ ॥

पद ९ वें.

रब साहेब गैब निरंजन दिलमें रहता राम । उलटपलट सब पोथी करी है नहीं मूँ में तेरा नाम । ऐसा होके पेटके खातिर दुनियांकूं करे सलाम । कहत "सोहिरा" मुरुख आदमी तब काहे कूं लिया था जनम ॥ १ ॥

पद १० वें.

गगन कुवां कूं चली पानियां मैं ॥ ध्रु० ॥ नवद्वार कूं ढूँडत ढूँडत सुजानि गौलनि, गुनग्यान गोरसके मंथनि, मन पवन बिबेक लोनी बिकने कूं, चलत है, त्रिकूट घाट गिरिगपट बाट कूं उलट हाटसें खडी बदनयां मैं ॥ १ ॥ अनुहात मुरली बाजे, घन गाजे गगन, बनमें मगन मयूर, मन चित्त चकोर, चंद्र धरति जल, दिन पवन गगनकी, मूरत सूरत बिन गैब साहेब, रब रहते सब दुनियाँ पालन लालनलील, निरंजन निर्गुन, राजे बिराजे कान्हा मैं ॥ २ ॥ कहत "सोहिरा" पवन बंद कर । फंद रहे सब मंद मंद, महदानंद मुकुंद, नादबिंद कला ज्योति, आनंद आद समाध लगी उन्मनि रजानिया मैं ॥ ३ ॥

पद ११ वें.

गुरुबिन नहिं आवत ध्याना रे ! परदेशि गारुडी ॥ ध्रु० ॥ निराधारमों पैदा किया, पवन पानि अस्माना । अभ्र खम् अगन अनंग बनायी धरति तेज भुल जाना रे ! ॥ १ ॥ कहत आप सें सुनत आप सें चलत मकाना । आप सें रसना आस करके रस श्रोत्र

शब्द सब बास उठावत घ्राणा रे ! ॥ २ ॥ औरत रंग रसाल सकाम रतीभेटपर ध्याना रे ! । दिवाना होकर पीछे लगत है पुरुख बडा मर्दाना रे ! ॥ ३ ॥ इत्ता दिखावे, इत्ता छिपावे, अजब नजरबंदखाना रे ! । कहत "सोहिरा" झूठ साँच सब दिलकूं दिया दरम्याना रे ! ॥ ४ ॥

पद १२ वें.

गुरुनें बंद किया है नव दरवाजे ॥ ध्रु० ॥ तनका चोर अहं मूआ, दिल खुष हुशार हुआ । अविनाश तख्त बडा तख्त, निरंजन बनके राजे ॥ १ ॥ अलख देख्या ध्यानमें, चौंफेर मैदानमें । दशवें द्वारके गुमानमें हम्मेश नौबत बाजे ॥ २ ॥ ज्ञानका अंश, लेकर हुआ परमहंस । रहे तनका भेद, मशक ओहि लगावना लाजे ॥ ३ ॥ मुद्रा लगी अनंतकी, आदिनाथ पंथकी । "सोहिरा" कहे बोध कैफ पिये गुल्ल गाजे ॥ ४ ॥

पद १३ वें.

घर आये ओ जान नंदनंदन बंधनकी ॥ ध्रु० ॥ याहीं गुन समझ करे सो प्रान पुराना, और सब नरकूं भ्रम भूली कर कर काल लेजावे ॥ १ ॥ सूरत सुभाया देख बिनतनसें बैस समझ समझावे ॥२॥ प्रेम प्रीतका देखनवाला, श्रीगुरुका प्रसाद "सोहिरा" सहज अंतर गावे ॥ ३ ॥

पद १४ वें.

जागत जोगी, गैब गगनसें अॅलख निरंजन देख, गाढा साहेब ठाड़ा सबमें उनकूं नहीं है रूप रेख ॥ जुगत जुगतसें पवन चढ़ावे, दिल पर देना मेख । कहत "सोहिरा" अपना प्यारा बहुत भेखमें एक ॥ १ ॥

पद १५ वें.

जोरू लड़केका क्या करना। दिलमें गुरुपद रखना ॥ ध्रु० ॥ जीव तो अपना रहेगा। ये मट्टीमें मट्टी रहेंगा ॥ १ ॥ धन तो बहुत पड्या खोलीमें। बखत तो कुछ नहिं झोलीमें ॥ २ ॥ पेटमें कुदरतसें करे हजम। कहांसो पेट हुआ नहीं मालुम ॥ ३ ॥ जब छूटती नहीं वासना। तब फेर जनम कूं आना ॥ ४ ॥ "सोहिरा" करार करेंगा दिल्ला। खडा जोवत साहेब अल्ला ॥ ५ ॥

पद १६ वें.

डरमियां सब बिकार मियाँ दे दरसन परसन ॥ ध्रु० ॥ जायी अलख पलखकी जोग जुगतसें। तलक खलक बन जायी। त्रिकूट पारपर बैठे जोगी। अनाहत शिंगी बजायी ॥ १ ॥ अनु-लाप पकरकर, आलाप कर कर। विलाप सबसें गायी। रंग ढंगका संग छोडदे, दिल अदमकूं मिलायी ॥ २ ॥ शून्य सागर, नागर हिंमत, मच्छी होकर जायीं। कहत "सोहिरा" नकल छोडकर। अकल बढीसों लिजायीं ॥ ३ ॥

पद १७ वें.

तखत बडा निरंजन, बाबू, बखत बडा अविनाश। कोई बखत पडेंगा तुमपर, मैं तो फकत फकीर उदार। माया जपतके दफ्तरमें जितना तितना पोहोंचत नाश। कहत "सोहिरा" सब तो मृगजल हकनाहक क्या करते आस ॥ १ ॥

पद १८ वें.

तनकी सुहबत दिलकी मुहब्बत, जीवकी किल्लेदारी है। साचा बूरा देखत जाने, मनकी जुमलेदारी है ॥ ध्रु० ॥ इंद्रिय ताबेमें हुजूर अम्मल, अपरिचित्त राजी है। बिचमें ढूंढत काम, क्रोध और मोह, मुवाचि पराचित्त राजी है ॥ १ ॥ खाना

पीना, आना जाना, दुनियांकों तो मिलना है । गैबका जब हुकूम होंगा उस घड़ि हम कूँ चलना है ॥ २ ॥ करम का तो शिल्लक झरना, नसीबसें यही लड़ना है । हयात पुरना, तब तो जाने दो दिन मेरा गुत्ता है ॥ ३ ॥ कहत "सोहिरा" गुरुगम्य ओहि, बात करे सो भला है । अलख, पलख में, खलक जायगा, रहे न रहे सो अल्ला है ॥ ४ ॥

पद १९ वें.

तुम अच्छा हुक्का पीना ॥ ध्रु० ॥ अलख तमाखू ग्यान अगन सें । जला कर माया धूर छोड़ देना ॥ १ ॥ ब्रह्मरंध्र में त्रिकूट चिलीम । प्राण अपान सें दम्म पर दम लेना ॥ २ ॥ कहत "सोहिरा" संतसंग धरना । अहं मलीं सें नली खलील कर देना ॥ ३ ॥

पद २० वें.

तेरे बिन नहीं और मुद्रा, अब क्या कहूं ! खुदा । धीर बीर कोइ पीर पैगंबर दगा न किया खुदा ॥ ध्रु० ॥ घस्त ग्यान की हस्त महल में । मस्त हाल में ख्याल में । दिल बंद कर फंद छोड़, कर बिलंदर अंध जंजाल में ॥ १ ॥ तेरे दास हो कर आस करेंगी, भवबंध पाश खलास की । यहिं तमामा दमामा बाजत नौबत है यहि खलासकी ॥ २ ॥ बाट जंगलकी घाट त्रिकुट उलाट मन मैदान में । औटपीठ पर पैठ प्रत्यंत ओहि गत उड़त पक्षि निदानमें ॥ ३ ॥ धरत्री छोड़ जल पवन छोड़ कर दहन ढूंढ़त दर्म्यान में । पांच पंचकी फौज काटत मौज लागत अस्मान में ॥ ४ ॥ आदमशाह की सब मजालिस तो जाकूं हिंदू कहत है पाहि माम् । एक बिंद अबिंध कहत रहिम अज नमाज तो या इमाम ॥ ५ ॥ ये मशार हुशार हो कर ले मशाल खुषाल की । कामक्रोध का शीस काट बकशीस लेवे दुशाल की ॥ ६ ॥ अव्वल

की कोई नहीं बात सुनत, कुरान पढ़त किताब सें। अरथ मोल-पर, भरम खोल कर वहांसे निकल शिताब सें ॥ ७ ॥ सख्त हो कर शून्य तख्त में गैब, वख्त दिये किल्ला। कहत " सोहिरा " बारोबार तूं नमाज कह, तेरे या अल्ला ॥ ८ ॥

पद २१ वें.

दिया बे, तो दिल दान, फकीरा दिया बे, तो दिल दान। लगी तो लगन गगन बन में, मगन में मस्तान ॥ ध्रु० ॥ नाद नहीं, और ज्योति कला अकेला। तकिया में बैठे तो गर्क भये प्यारे, जहाँ वहाँ करे गुजरान ॥ १ ॥ अलख में दोनों गये, तो पलख खप गया खलक। हकीम बीनसों हुकूम क्या करे ? सुरत है सुलतान ॥ २ ॥ कहत " सोहिरा " देखो अमीरा, गैब बड़े बादशाही। त्रिकूट अलंग उपर पलंग, पलंग में पड़े मलंग में बाबू ॥ ३ ॥

पद २२ वें.

दिया है निज धन, लीया है तन मन, लगन गगन पर मगन हुवा मन ॥ ध्रु० ॥ अनाहत डंका बाजे, दशवें द्वार के राजे, गैब निरंजन ॥ १ ॥ निरालंब का महाल, सब दुनियाँ का लाल; सब अर्धनार का खेल, देख अच्छा ओ जोबन ॥ २ ॥ अहं मूआ अब सोऽहं हुआ, तब प्रेम पिया, मैं ओही कहे जान, प्रेम पूर के गगन ॥ ३ ॥ लगा लगन ग्यान अम्मल सें हुआ मगन। " सोहिरा " कहे ब्रह्मरंध्र मों गैब मनपवन ॥ ४ ॥

पद २३ वें.

दिल मेरा आराम पाया। भगवान सुरत सब जमीन अस्मान में नज़र में आया ॥ ध्रु० ॥ मृगजल माया उननें बनाया। झूठी काया, क्या जानों मैं कब मर जाया ॥ १ ॥ इबरत, लाया पवन

कमाया । दश नादों की शिंगी बजा कर अलख जगाया ॥ २ ॥ कहत "सोहिरा" खुदा मिलाया । उन्नें फरमाया, निर्गुण गाया, निरालंब की लगन लगाया ॥ ३ ॥

पद २४ वें.

दुनियाँ के हर हुनर देख । सूरत सब नबी रतन पर जड़ित जवा जतवा ॥ ध्रु० ॥ उलट पलख पर दर्शन ले कर आधाचंद्र पीया । अहं धरम को ही गरम नरम यही सब का दरद मुआ ॥ १ ॥ नाद बिंद के ऊपर दोहती, अनाद ग़ैब गौवा ॥ २ ॥ ऊर्ध्व शून्य में दिल कूं गारत अमृत क्षीर पिया ॥ ३ ॥ कहत "सोहिरा" नैनों में देख्या तीन्हों लोक की हवा । जल थल पवन गगन छोड़ कर लगन में मगन हुआ ॥ ४ ॥

पद २५ वें.

दूध के बीच में घी का रहना ओ तो साची बात। सगुन में निर्गुन तैसा रहते उन कूं न लागत हात । गुड़ में सें तो सक्कर आवती कछु तो करामत लगती । कहत "सोहिरा" जोग जुगुत बिन कैसे मिले अंदर की ज्योति ॥ १ ॥

पद २६ वें.

देखो बे अवधूत ग़ैबी निरंजन निर्गुनवाला, पीवे प्रेमप्याला, शब्द सद्गुरु सुरत चेला, सब घटव्यापक है अकेला ॥ ध्रु० ॥ काया पूर शहर के नव गल्लिया फेरी सें आया, जुगुत जुगुत के बड़े अवलियां । पुकारे सहज पवन सें, नव नाडी के नलियाँ, ब्रह्मी बैठे जब भ्रमर कमल कलियाँ ॥ १ ॥ उलट पछिम पंथ से चलना, तीन्हो संधी मिलना, गगनमंडल से जब दम खुलना फेर आंख सें दिखने की बात कहना ॥ २ ॥ नहिं बे बोध कूं आवना ज़ाना, रहे

दिल दरम्याना, निर्बान रहना जब आत्मा ना, हर घडि में आनंद अम्मल में झुलना ॥ ३ ॥ कहत "सोहिरा" कछु नहिं बाकी, मेहरबानी वाहां की, तन में कछु चीज नहीं वहिया की उनके वास्ते जब तब याद आदिनाथ की ॥ ४ ॥

पद २७ वें.

नहीं यही खुदा हुए मेहरबान ॥ ध्रु० ॥ गगना जावे, पवना जावे, अगन जमीन जल जावे, तीन्हों लोक के हकीम जावे, नबी रहे निर्बान ॥ १ ॥ कहत "सोहिरा" बनाया जीव, जवा हवा के लाल । दरवेश हुवा दिल बाघ बंध के उलट जोग जवान ॥ २ ॥

पद २८ वें.

परबत पर किल्ला, तुम ऊपर करो हल्ला । उलट पलट चाल तेरी, फत्ते करे अल्ला ॥ ध्रु० ॥ गनीम की फौज बड़ी बैठे, घेर बारी । काम, क्रोध, लोभ, मोह बड़े धनुकधारी ॥ १ ॥ दस बुरुंज बांके न वाक बगारी । मत्सर सें वहीम बदलाम की दोरी ॥ २ ॥ यम नेम करत जाव आछी मोर्चेबंदी । जोगजुगुत धीर बड़े बीर धारबंदी ॥ ३ ॥ चोर हेर ले, बातमी पाखंड रस्तखाना । पवन की मारो बत्तीसे लगाव तोफखाना ॥ ४ ॥ ग्यान ध्यान तोप में तो आंच देना दारू । बैराग्य बत्ती लगा देना सरबत का मारू ॥ ५ ॥ ब्यतीरेक गोला अन्वयकी रजगीरी । हरदम सें करते जाव बड़ी मारगीरी ॥ ६ ॥ कोई मुए कोई रुए जेरदस्त हुए सब । जोगराज ताबिन से खोल देना तब ॥ ७ ॥ हस्तगत किल्ला हरकत रहेला । तीन्हों लोक आप हुए अम्मल का जिल्ला ॥ ८ ॥ मर्दुमी बड़ी सलामत का आगाज तो करना । दसनाद अनाहत नौबत बजावना ॥ ९ ॥ अस्मान में तो लाल

बडा निशान लगावना। एकबार जाना तो फेर नहीं आवना ॥ १० ॥ तखत में तो सक्त हुवा फस्त लूट फना। "सोहिरा" हुए खुष हुवा गैब आलम पन्हा ॥ ११ ॥

पद २९ वें.

परवत परवत मैना खड़ी ॥ ध्रु० ॥ बीन पंख, पगवा-बिन, नख चंचुवा; जी की लगी लगन नयनसें बढी ॥ १ ॥ अलच्छ पच्छिर्नी शुभ सल्लुच्छनी, ऐशी की प्रीत मन में जड़ी ॥ २ ॥ कहत "सोहिरा" मर्द मर्जी का, लाल गुरुजी का; इतर कोई भेद जानत, बिरला गड़ी ॥ ३ ॥

पद ३० वें.

फक्कीरा हरदम प्याला पी ॥ ध्रु० ॥ झूठ फक्कीरी देख तुमारी, काय कूं करना भेक। भूक के खातिर मांगत भीख वे कहां मिले रोटी घी ॥ १ ॥ बोध की भंग, करे बज्रंग, तुम चंगर हो पीकर दंग। झूल मातंग तुम जंग, हो पीर पैगंबर जी ॥ २ ॥ हरकत हीला छोड़ दे दीला मिल जावे साहेब अल्ला। बिस्मिल्ला के गैब गुहा में, अमीर को बरकत नव नव ॥ ३ ॥ जोग जुगुत की कमायी चाहिये, जीव का हुए शीव। कहत "सोहिरा" तन बिन देखे आप कूं आप चिरंजीव ॥ ४ ॥

पद ३१ वें.

फत्तरफूल तो सहज फुले उन बन में जैसे बसंत। विषय भोग लगावे सब इंद्रिय तन से मन से न्यारा संत। खुजरत करने-वाले चेले, मौन में बैठे महंत। कहत "सोहिरा" उनका पाया लगता नहीं वे अंत ॥ १ ॥

पद ३२ वें.

बांस कूं खोदत भृंग दिवाना उनका दिल दस्तूर । बेटीचोद कूं मालुम नहिं है तेरे बेंबी में कस्तूर । निर्गुन निरंजन आप में है आदमी साधन पर चातुर । कहत "सोहिरा" राम कूं खोदत नहिं बे कामातुर ॥ १ ॥

पद ३३ वें.

बैठा रे तू फकीर अपने बंगले में, बंगले में ॥ ध्रु० ॥ जिम्नें दंगा, इतना मंगा, जल बिल गंगा गयी बिहंगा । उड़ गयी अस्गान में निर्गुन जंगल में ॥ १ ॥ हाट छोड़ कर लगट बाट का, घाट चढ़ेंगा पवन फाड़कर । त्रिकुट श्रीहाट दोनों उलट कर; गोलहाट में ॥ २ ॥ ये बिसमिल्ला, रहिमान मुल्ला, हजरत मुल्ला, जगत् जलल्ला, मत कर हिल्ला अल्ला रखता नजर में ॥ ३ ॥ कहत "सोहिरा" देखो अमीरा, मिले गौवांका दूध । दूध पिया और मगन हुआ, राव रंक नहिं नजर में ॥ ४ ॥

पद ३४ वें.

भगवानके बंदे ! रे बाबू ॥ ध्रु० ॥ ऊर्ध्व बनमें आराम होकर । अनाहतके नादे रे बाबू ॥ १ ॥ जोगजुगुत जागता जोगी । अंतर आनंदे रे बाबू ॥ २ ॥ अजब नजब संसार झूठा । छोड्या सब धंदे रे बाबू ॥ ३ ॥ "सोहिरा" कहे महाशून्य में रहता । लग्या उन्मनि छंद रे बाबू ॥ ४ ॥

पद ३५ वें.

मानस मेरा मगन करे जब, तब देखों राम ॥ ध्रु० ॥ अजब नजर सें, छूटा सब सें, लग्या चित्त में ध्यान । ग्यानविज्ञा-न सें आया मेरी सूरत घनःश्याम ॥ १ ॥ प्रेम अम्मल की चढ़न

चढ़ायी कुंड में उनका पार । आँखन देखना बड़ा जोम ॥ २॥ रंग अनंग में जोरा हो कर जिह सोजानी नार । मर्द नार का हुक्का देखे "सोहिरा" दिनरैन ॥ ४ ॥

पद ३६ वें.

मुंडा दिल नहिं, नहिं रहे, न जान । अरस परस पर घन बरसत, दिन आदर्श हुआ ॥ ध्रु० ॥ ईर्षाका नहीं बे किसी का बैठत, दिल कूं नहीं हिसका । जिस कूं चिर आंख लगावे, अंदर नबी करे नदवा ॥ १ ॥ देखत है तू भेष तन्हां के, मुलुख रमते हवा । फकीर हुए, अम्मल पीवे, देवे सब दुनियां कूं दूआ ॥ २ ॥ कहत "सोहिरा" घटमठ अल्ला, अहं का दरखत मूआ । जलथल में ओही सांई देखत, हम्मेश खूष हुआ ॥ ३ ॥

पद ३७ वें.

मुंडे हुषार हुषार हो खबरदार । देखो अलम बढ़ा हुशार । कछु तो करामात सें होना सांई का बेपार ॥ ध्रु० ॥ अब तो मुंडे चुप, सब तो झुटा तेरा जप, और भला बुरा खप । आस्मान के खैर म्यान दर्म्यानसें कुंप ॥ १ ॥ अबे मुंडे ना लेले तेरे हिजडी का म्हाल, तेरी खापर काफर चाल । जहांका तहां सब तो रहे, अखेर तेरे हाल ॥ २ ॥ अबे मुंडे चट, सब हिस्का करो गट्ट, और घूसा करो मट्ट । आशापाश छोड़ मुंडे तेरे कूं जम करेगा गट्ट ॥ ३ ॥ अबे छोड़ बे मुंडे फंद अच्छा होना लंगोटबंद, अब क्यौं बे हुए अंध । उप्पर म्यान सें दोनों रहना सुलतान सें चंद ॥ ४ ॥ अबे मुंडे लाल, बढ़े हो तुम मगन मस्तबाल, झ्याडा ल्यावे बालोबाल, । अलख मानें खलक देखो, खुदाके तो ख्याल ॥ ५ ॥ सट बे मुंडे झट, खड़े दुनियां में नट, निकल चष्मका झट, सबहीं हंसगत तास्बिरी का धरत्री देखो पट ॥ ६ ॥ अबे मुंडे

लाल चंग, जोग जाहलि की भंग, तुम पीयो पड़े रहो दंग। जब हूं देख्या तब हूं होना खुषाली का रंग ॥ ७ ॥ अल्ला कहां खोद, मुंडे काट काम क्रोध, हरदम सें करो च्योद, और कहाँ ही बैठ कौन क्या करेंगा बेटिच्योद ॥ ८ ॥ झुल बे मुंडे झुल्ल, तुम अपने दिल में खुल्ल, देखो भव नदी का पुल्ल अल्लानें क्या कमती कीया क्यौं न करेंगा गुल्ल ॥ ९ ॥ "सोहिरा" कहे खाक़, मुंडे दिल रखो तुम पाक, देखो शून्य में चिर आंख। हुए जुवे क्या मर्द आदमी लाखों लाख ॥ १० ॥

पद ३८ वें.

मेरे घर में यही जुग जाग रही रे ॥ ध्रु० ॥ झंझा झन झनन बाजे बीना। नागर नार नाचत गावत जबहूं कही रे ॥ १ ॥ अढळ जंजीर में बखतानि बैठ्या। फेर आवन की बात नहीं रे ॥ ॥ २ ॥ तलपत प्रेम के नदिया बहात। हर बखत "सोहिरा" गहि रे ॥ ३ ॥

पद ३९ वें.

यहि हरदम के ऊपर झमके गये ग़ैबनाथ ज्योति ॥ ध्रु० ॥ एक घडी मन कूं देना। नयन में आलख लेना। उनके वास्ते काय कूं होना पोथी ॥ १ ॥ उनका ध्यान करत नहीं। दिल में ग्यान रहत नहीं। और आपने नशीब मुफत, दुनियाँ काय कूं रोती ॥ २ ॥ उनका मोल नहीं है मान। भरपूर भरावे अस्मान। बिच में खप गया दिनमान। काया शिंपी मय है मोती ॥ ३ ॥ "सोहिरा" कहे जहां सो आवे। तहां मो तो ऊर्ध्व जावे। सहज समाधी पावे। साधू उन्मनि में सोती ॥ ४ ॥

पद ४० वें.

लगी मेरे मन में प्रीत तेरी। तन मन धन उस पर बलहारी रे ! ॥ ध्रु० ॥ ग्यान कमल में, बोध अमल में, ज्योति विमल मैं

अलमेंश न्यारी रे ! ॥ १ ॥ दृश्य न आऊँगी, अदृश्य रहूँगी, क्या कहूँगी, उनकी बड़ी दिलदारी ॥ २ ॥ जल की मच्छी, और गगन का पक्षी, सुरत अलक्ष की अच्छी प्यारी ॥ ३ ॥ कहत "सोहिरा" मगन रहा मैं, जहाँ तहाँ सब सें जाकी पग बिन फेरी ॥४॥

पद ४१ वें.

सब दुनियाँ देखी मैं तो घन बिन मृगजलपूर। फजर, दुपर सें शाम नहीं हो, गैब सुरत भरपूर। तऱ्हां तऱ्हां की जहां कीं नौबत बाजत अनहत सूर। कहत "सोहिरा" उलट पलख सें वहां सा मैं महसूर ॥१॥

पद ४२ वें.

हजरत प्यारे खुदा हमारे, क्या करेंगे हाल ॥ ध्रु० ॥ अस्मान जमिन पर कछु नहिं देखा, नयन में नयन उजाल ॥ १ ॥ मीठा लगत है झूठा बे तन का, काय कूं बनाया महाल । हिस्का लगावे, इस्के ऊपर, कब क्या जानों ले जावे काल ॥ २ ॥ पग पंजा शिर पैदा कीये, काय कूं उठाया बाल। दरद दिया तो बड़े बड़े कूं, कोई पावेगा नजात ॥ ३ ॥ पेट के अंदर अगन किया तुम, भरभर कितना काल। एक बखत भरपूर किया तब, फेर फेर हुए खाल ॥ ४ ॥ अजब तुम्हारा गोष रगत का, बंद किया बे नाल। भर जोवन में अच्छा लगत है बढ़े जोरु के ख्याल ॥ ५ ॥ कहत "सोहिरा" पीछे लगाया, काय कूं सब जंजाल। बैठ न जाती नजर न तुम पर दील न होता निहाल ॥ ६ ॥

पद ४३ वें.

हजरतनें दरसन दीया। बड़ी बात बनाव किया ॥ ध्रु० ॥ काल काल में बाल भरम के हाल हाल कीये, लाल अलाल को ब्रीज महल को अजी अलम कूं न जात, तदबिर देख दीदार उदार मनोहर, रूप रेख बिन देख कर चकित तेज सें हुआ, तो अखियाँ जैसे तोहि

क्रिया, चकित रहे, जैसो चंद्र पर प्रेम शरद का, दरद पीया, तब ब्रह्मी हुवा आनंद का दिल, मंद का दिवा मंद कर, हृदीभुवन में ज्योत जागती जुगत जुगुत से मगन मगन हयाद हुजुर की, दया नजर की जरदस्त सब फौज पवन की, मौज मगन की रहन गगन की, संलग्न लगन सें, लगी, सुरत पर नंगी मुरत सें विराजमान्यसें ललित ललना नटत नटत, बिराजे बहुत भेख धर, पवन रसिता सुरत धारा व्यापक, ठारा है बिराना, नादबिंद सें आद पुराना, आगम-निगम सें पुकार पुराना, अनुहत डंका बाजत राजा निर्गुन निरमाया ॥ १ ॥ कहत "सोहिरा" निराकारसो ॐकार, अर्धाक्षर सें मकार उकार अकार सें भूतप सारा सारा, क्रीया ग्यानशक्ति सें बिच्छा शक्ति अव्वल सें तो पैदा गगना, अंतःकरना ब्याना श्रवणा बाच्या शब्द से ऊपर पवना, मन समाना, त्वचा पानी स्पर्शन होना, बुद्धि उदाना, नैना चरना, रूप विषय मों देखो दहना, चित्त सें प्राना रखना, छ छ नार छ रंग सें एको जीवना, अहं घ्राना अपाना। बाहना गुद गंध धरत्री कूं दिखना, स्थूल का घर सूक्ष्म का रहना, पंच पंच को पचास होना, एको मेकोंसें खिलना मिलना, मदत अदत सें आदब रहना, तन का रहना मालुम नहिं कुछ साच रशीपर साप होना, भूल अजब का पाक पकाना। छाये छटेकूं रसोय देना, झूठा खाना मुलुख में तो भुल कर जाना, स्थल स्थल की पवन की सेना, ज्यांहां सुं आया उस पर जाना, देखत हम कूं क्या? सब होना महांकारन उन कूं पछाना, चारों खानी का रखतखाना, स्थिर अचर कोई स्थावर जंगम बहुत बल्ली का बसंत महंत अंतक का, चिदाग पछिमपंथ पर मत्त ग्यान सें दत्त ध्यान सें, फक्त फकीर का तख्त निरंजन भक्त बडा दम पीया ॥ २ ॥

## ( १८ ) आरत्या.

( १ )

अकुल अगोत्र स्वयंभ स्वतंत्र । भक्तजनांसी मित्र परम पवित्र ।। याहुनि कांहीं दुजा नलगे मंत्र । इंद्रियें चाळवितो तो निखिल चिन्मात्र ।। १ ।। जयदेव जयदेव आनंदघना । अनेक तूझ्या लीला विश्व हें नाना ।। ध्रु० ।। अंतःकरण निरंतर निज निजरंगीं । मन हें जाउनि आजी लागली उन्मनि ।। झालें सुख तें देखों नयेचि नयनीं । वाचा झाली मुकी या महाशून्यीं ।। जयदेव जयदेव० ।। २ ।। चित्सूर्याचा झाला परम प्रकाश । चित्कलिके-माजी सहज उठला उल्हास ।। समूळचीं दृश्याचा मावळला भास । पाहूं जातां आपणा मीपणा नाश ।। जयदेव जयदेव० ।। ३ ।। अनादि हा देव जाणा अभंग । निजरंगीं रंगला आत्मा श्रीरंग ।। आनंदसिंधूचे उठती तरंग । सोहिरा म्हणे सहज निवृत्तिमार्ग ।। जयदेव जयदेव० ।। ४ ।।

( २ )

आरती उजळली, शुद्धसत्त्वाचिये ताटीं । मनपवनाची वाती, केली गगनाचिये पोटीं ।। प्रेमाचें हें तैल आंत, भरियेलें उपाटीं । प्रकाश हा प्रकाशितां, चंद्रसूर्या पडली मीठी ।। आरती उजळली० ।। १ ।। देखुनि ऐसें निरंजन, वरि ओवाळिले जन । ऊर्ध्व लक्ष लागतां कीं हे, उन्मळिले लोचन ।। कवणाचें हें कवण नोहे, ऐसें केलें कीं येणें । दोरावीण नवद्वारें, बद्ध केलीं कीं जेणें ।। तया ठायालागीं आजी, सिद्ध साधंचें जाणें । वासना

हे बुडे ऐसें, ज्ञानगंगेचें न्हाणें ॥ आरती उजळली० ॥ २ ॥ तयालागीं दोनी पंथ, विवेक सुषुम्नेची वाट । गुणत्रय टाकुनी वेगीं, त्रिकूट श्रीहाट गोल्हाट ॥ साम्यावस्था ककारमुख, सर्व-साक्षी औटपीठ ॥ आरती उजळली० ॥ ३ ॥ उन्मनी ते भ्रमर-गुंफा, निराकार निर्गुण । तये भूमिवरी विश्व चित्राकार हें जाण ॥ आलेगेलियाचें नका धरूं भूषण दूषण । सोहिरा म्हणे मीपण जाय, निजवर्म तें आपण ॥ आरती उजळली० ॥ ४ ॥

( ३ )

चिन्मयसुखसार निरामय सये ! । जेथें गेल्या दिठि हे परतोनि नये ॥ निर्गुण निरंजनीं मन हें विलय । होऊनि सहज आंगीं मुरलें चिन्मय ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय पूर्णज्योति । नादबिंदुकळा ज्याची विभूती ॥ ध्रु० ॥ आदिअंत नाहीं ज्या स्वरूपासी । नामरूप पाहतां मिथ्याचि त्यासी । निर्विकल्प समाधीचे उल्हासीं । रंजुनि ठेलों निरालंब गगनासी ॥ जयदेव जयदेव० ॥ २ ॥ जाणणें जाणतां ज्यानें जाणीव गेली । मज-माजी निजतां नीज उन्मनी लागली । बोलों जातां वाचा तटस्थ ठेली । सोहिरा म्हणे चैतन्यसत्ता बाणली ॥ जयदेव जयदेव० ॥ ३ ॥

( ४ )

तन से जोग कमाया, मन से गयी माया । उन्ने आप छपाया, मगन सबाह्या ॥ जय जय जी अॅलख गुरु गोरखनाथा । हरदम सें मिलाऊं मेरा प्राणदाता ॥ ध्रु० ॥ देखो प्यारा सब से न्यारा, दृष्ट नहीं लच्छी । आगम निगम गव्या ते, उरधजल की मच्छी ॥ शून्यमंदिर का राम, बात तो अच्छी । ध्यान मिला कर बैठा उनकी गति अच्छी । साधक सिद्ध साधो अवगाहनके

पच्छी ॥ जयजयजी ॲलख ॥ १ ॥ दुनियां जहांसे होगी, अनादिका जोगी । मूँ बिन बाजत उनकी, अनाहत छिंगी ॥ कब-हूँ गगन मगन, कब हूँ बितरागी । तन्मयकी कंथा अंतरसें रंगी ॥ जय जय जी ॲलख ॥ २ ॥ देखो जैसो तैसो घट मठ में अंबर । व्यापक सब सें तब सें अवधूत दिगंबर । चंद सूरज गये थे महां-छुनके अंदर । "देता लेता कहता, कोही तब नहीं; योगी हर ॥ जय जय जी ॲलख ॥ ३ ॥ भ्रमर गुंफा मठ में, गुरुजी अकेला । आवती जाती अम्मल नहिं पीनेवाला ॥ "सोहिरा" देखो लाल साहेब का चेला । अब तो पिता गुरुजी गैबका प्याला ॥ जय जय जी ॲलख ॥ ४ ॥

(५)

निरंजननिवासी देहातीत देवा । घडते इंद्रियद्वारें तुझीच कीं सेवा । मजमाजी सांपडला अनादि ठेवा । सेविला काय सांगों मुक्यानें मेवा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय लालनलीला । एकीं अनेक जग हें बुद्बुद्सलीला ॥ ध्रु० ॥ रूपावीण ऊभा अलभ्य लाभा । घडलें मन हें बुडलें विश्वाभ्रनभा । महदा-नंदसमुद्रीं भरियेलें कुंभा । मन हें तद्रूप झालें सकलादि रंभा ॥ जयदेव जयदेव ० ॥ २ ॥ दीपीं दीप मेळे जैसा कां उजळे । वाचा बोलों हालों विसरले डोळे । नेणों कैंचा ऐसा मज-माजी मेळे । सोहिरादास म्हणे अभिमान गळे ॥ जयदेव जयदेव० ॥ ३ ॥

(६)

मुनिज़नमानसहंसा सज्जन गा ! रामा ! । योगियांसी करिसी नित्य आरामा । यालागीं जपताती निशिदिनीं निजप्रेमा ।

स्वसुख देऊन माझ्या हरिं या भवभ्रमा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जयजी अनंता । आरती ओंवाळूं तुज कृपावंता ॥ ध्रु० ॥ ज्ञानेंद्रियें ताटीं कर्मेंद्रिय वाती । पंचप्राण प्रज्वळुनी करूं एक ज्योती । सोऽहं शब्दें दिसी अति प्रकाशें ती । शिवशक्ति समयोगें सहज विलसती ॥ जयदेव जयदेव० ॥ २ ॥ दृश्य द्रष्टा जेथींचे हरोनि गेले । मजमाजीं स्वस्वरूपीं दर्शन झालें । देहबुद्धि जाउनि मन हें मावळलें । सोहीरा म्हणे जन्ममृत्यु आकळले ॥ जयदेव जयदेव० ॥ ३ ॥

(७)

मनमोहन गहना चित्सुख चिद्घना । जगदखिल पालना लीलालालना ॥ भावातीत देवा अभिनवभावना । आरती ओवाळूं तुज निरंजना ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय सच्चिदानंदा । विद्यारविंदा देवा! पूर्ण प्रबोधा ॥ ध्रु० ॥ अनादि उदयो झाला पौर्णिमा इंदू । देखुनि उल्हासला महानंदसिंधू । भक्तजनचकोरा अनुपम्य स्वादू । पूर्णतेसी आलें अविनाश द्वंद्व ॥ जयदेव जयदेव० ॥ २ ॥ मायामय रजनी सरुनी प्रकाश झाला । दृश्यरूप खद्योत निस्तेज झाला । वैराग्याचा वना लवलव सुटला । विवेक भ्रमरा आंगीं आनंद दाटला ॥ जयदेव जयदेव० ॥ ३ ॥ तन्मय कोकिळेच्या कलरव ऊरीं । अंबरीं ऊठला नाद अनाहत गजरीं । सोहिरादास म्हणे मेरूच्या शिखरीं । वरियेली हे नार अरूप सुंदरी ॥ जयदेव जयदेव० ॥ ४ ॥

(८)

व्यक्त–अव्यक्ता जय मूर्त–अमूर्ता । शरण येतों तुजला निजमूळकांता । सकृप होऊनी मजला नेई एकांता । माझें मज हें निजगुज दावीं तत्त्वता ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय श्रीगुरुनाथा ।

आपेंआपणियांत करिं कां सनाथा ॥ ध्रु० ॥ व्यान उदान समान प्राण आणि अपान । श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा आणि घ्राण । शब्द स्पर्श रूप आणि रस गंध जाण । अंतःकरण मन बुद्धि चित्त अहंकार लीन ॥ जयदेव जयदेव० ॥ २ ॥ वाचा पाणि पाद शिश्न आणि गुद । आधार कमळांचा कवळीं मूळबंध । ओढियाणा आणि जालंधर घे विशुद्ध । त्रिकूट श्रीहाट गोल्हाट औटपीठपद ॥ जयदेव जयदेव० ॥ ३ ॥ भ्रमरगुंफेमाजि सहजचि मंद । होतां योगिराजा तुटती भ्रम भेदाभेद ॥ सत्रावीचें अमृत घेतां सुखस्वाद । सोहिरा म्हणे अद्वयबोधें सहजानंद ॥ जयदेव जयदेव० ॥ ४ ॥

(९)

सज्जन कूं दिल हर । तनु मन प्रियकर जो । सब रंगादिक दिखलावे जोगी अखियाँ जो । अरि दिल मुख नामी ज्या दंडन करिता जो । मेरा साहेब सब श्रुत सब सब मौजा करिता जो ॥ १ ॥ जय जय निराकार निर्गुन अवधूता । दिल ज्योति सुरप्रान आरति जननाथा ॥ ध्रु० ॥ तुम तर्फे जो जन है इनकूं निज सूरत । दिखलावे जी दाता । बसकर उस चित रहता । सबके दिलमें लड़के के मात । देखत सब में डारें बिबेक कर हाता ॥ जय जय० ॥ २ ॥ तुम पग में जो ध्यान कर कें निभता है तनुमन । जनहि छून्य जानत मंद जन । आगे पीछे देखो सबका निर्गुण । "सोहिरा" करि जो आपने तेरा अनुमान ॥ जय जय०॥ ३ ॥

(१०)

सहज केली हे आरती । चिन्मयाच्या वाती ॥ आनंदस्नेहेंशीं उजळुनी । चिन्मय निजज्योती ॥ ध्रु० ॥ देवचि नाहीं कीं

उरला । ओंवाळितांचि मुरला । भेदाभेद सहज हा हरला । परेपरता कीं सरला ॥ सहज केली० ॥ १ ॥ गातां गातां हा नाठव । कांहीं उरला नाहीं ठाव ॥ सोहिरा म्हणे मी कोठें जाऊं । पाहतां माझा मीच देवू ॥ सहज केली० ॥ २ ॥

# कवितासंग्रहांतील कठीण शब्दांचा कोश.

**अकट**–भलतें सलतें बोलणें.

**अद्वयकुमुदिनी चंद्र**–अद्वैतस्थिति हीच कोणी एक रात्रीं विकसणारी कमलिनी त्या स्थितीला विकसविणारा असा चंद्र.

**अधोभास**–विषयांचा भास.

**अनाहस्त**–सहज.

**अनाहत**–योगसमाधिमध्यें नगारे वगैरे-प्रमाणें उत्पन्न होणारे ध्वनि.

**अनुज, दनुज**–भाऊ व राक्षस.

**अपांपति**–सागर.

**अमला**-मादक पदार्थ.

**अलख** अलक्ष.

**अस्तु**–अस्त पावेल; नाहींशी होईल.

**अहा**–धन्य.

**अज्ञानपाति**–अज्ञानाशीं झालेलें सख्य.

**आतुडला**–सांपडला.

**आबादान** अविच्छिन्न, सुरक्षित, अखंड.

**आपाडाचा**–असाधारण.

**आपैसी**--यथार्थतेनें.

**आमोदीं**–सुगंधाच्या ठायीं.

**आवृत्त**–पुनःपुन्हां येणारा.

**ओपिसी**–अर्पण करशील.

**उगाण** व्याख्यान.

**उन्मळिले**–पुंजाळले.

**उबग** कंटाळा.

**उदो**–उदय.

**ओगर** वाढपी.

**ओवरीयेत (होवरीयेत)**–अंतःकरण हीच कोणी एक खोली तीमध्यें.

**औटपीठ** द्विदल अग्निचक्रावरील योग-शास्त्रोक्त स्थान.

**ककारमुख** काकी मुख ( ब्रह्मद्वार. )

**कदन**--हनन; मारणें.

**कदंब**–झाड.

**कल्मष**–डाग.

**कवळ**--भ्रमरूपी पडळ.

**कामाची**-उपयोगी.

**किर**--निश्चयात्मक सत्य.

**कीर**--पोपट.

**कूड**--सांगाडा ( देहाचा ).

**केशव**–या तीन अक्षरांवर तीन कडवीं साधली आहेत. (केशव–"उत्तम ज्याचे असती केश। किंवा हरिहरविधि ज्या वश। अथवा केशी दैत्याचा करी नाश। कर्ता म्हणूनि नाम केशव॥")-पृ० २४ पद १७

**कैवर्तक**–नावाडी.

**खुला**–मोकळा.

**खेचरी मुद्रा**--भ्रूमध्यावरून दृष्टि नेऊन अंतराळीं अवलोकन करणें अशी धारणा प्रकरणीं पहिली मुद्रा ती.

**गातों ललिया**–ललीताचीं पदें गातों. श्रीसोहिरोबाच्या वेळीं गोंधळ आणि

ळळींत हे दोन्ही प्रकार रूढ होते असें दिसतें.

**गुणातीत**–विशिष्ट गुणांनीं युक्त क्रिया होत असतां मन तद्रूप न होणें.

**गोपीनाथ**–हें पद गो पी ना थ हीं चार कडवीं मिळून साधलें आहे. (पृ. ६-प. २१)

**गोल्हाट**--ओठपीठावरलें योगशास्त्रोक्त स्थान.

**घस्त** पहारा.

**घुर्की** घोंट ( ब्रह्मरसाचा )

**चारी**–चतुर्वेद.

**चांदान**–चंद्रानें.

**चूड लागो**--आग लागो.

**चोंहाटा**–चार वाटा जेथें एकत्र मिळतात अशी जागा.

**छेद ( छंद )**--आवड.

**जगदभ्र अंबरा**--जगद्रूपी ढग ज्यामध्यें आहेत अशा आकाशांत.

**जननमरण धाम**--जन्ममरणाचें घर म्हणजे जीवदशा.

**जावळा**–जोडीचें.

**झाळकशी**( झळकशी )–प्रकाशतोस.

**टिसाळ, ढिसाळ**–मृदु.

**णकार**–महादेव, बिंदूचें ध्यान.

**तळगत**–भ्रमण करणें, गटंगळ्या खाणें.

**त्यजनी**--(स्वजनी असण्याचा संभव आहे.)

**त्यातीत** -(त्या+अतीत) त्याच्या पलीकडे.

**त्रिकूट**–इडा, पिंगला आणि सुषुम्ना या तिहींचा जो ऐक्यभाव त्याचें नांव.

**द्वंद्वधी**–द्वैतबुद्धि.

**दर्शी**–दर्शन म्हणजे इंद्रियद्वारा अनुभव.

**दाटतो** स्थिर करतो, घट्ट बसवितो.

**धावे ( धाये )**–तृप्त हो.

**नयनारविंद**--डोळेरूपी कमळ.

**नसरा**--न संपणारा.

**नागसरी**–सर्पाची एक जात.

**नादबिंद**–वैश्वानर नांवाचा शरिरांत होणार नादबिंदु = ॐकार.

**ना जन्मपत्र इ.**–"जेथें नाहीं जन्मपत्र तेथें कैचें कुळगोत्र" ही मराठींत म्हण आहे.

**नारायण** या चार अक्षरांवर चार कडवीं साधलीं आहेत. (पृष्ठ. २ पद. ६)

**निका**–उत्तमरीतीनें, पूर्णपणें.

**निके** मोजकें.

**निगा करितां**–काळजी किंवा राखण-करितां.

**निजउगाण**–स्वरूपाचा बोध.

**निजधामअंबरा**--स्वस्वरूप हेंच ज्याला वस्त्र आहे असा.

**निजवैभव**--मुक्ति.

**निदान**–शेवट, आदिकारण.

**निपटा**--पूर्णपणें.

**निरामय**--निर्विकार.

**निर्वाळिजे** -धुवून स्वच्छ करावें.

**निष्की ओपिसी**–निष्क नांवाच्या नाण्या-वर ओपिसी म्हणजे तेज ज्याप्रमाणें झळकतें.

**नेहटी**–जवळ.

**परवडी**–प्रकार.

**परेपार**--पराप्रकृतीच्या पलीकडे.

**प्रमेय**--चिंतनाचा विषय.

**पागीलागीं**--परस्वाधीन रहाणें.

**पाडाचा**--वाईट.

**पारापरेनें**--(अन्यपाठ परापरेनें) परंपरेनें.

**पीयूख**--अमृत.

**पुरति कमाय**--पूर्ण लाभ.

**पेणें**--मुक्काम, उतारपेठ.

**पोल**--( फोल ) अर्थहीन.

**फामना**--शुद्धि नाहीं असा.

**बाधान**--बधन.

**बुजती**--जाणतात.

**बेकाम**--कामाशिवाय.

**भगवंत**--ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान व वैराग्य हे ज्याच्याठिकाणीं वास करतात त्याला भगवान् किंवा भगवंत म्हणावयाचें.

**मन इंदु**--मन हाच कोणी एक चंद्र.

**मराळ**--हंस पक्षी.

**मलप**--पापणी.

**महाशून्यीं**--निर्गुण परब्रह्मीं.

**मायामय**--सर्व मायाच माया. निखिल माया.

**माया विवशी**--मायारूप हडळ.

**'मी'**--सोहिरोबा म्हणतात 'मी' अहंवृत्तीनें; 'त्याचें स्वरूप नेणें' म्हणजे परमात्म्याचें स्वरूप आकलन करू शकत नाहीं.

**मोहर नेघे**--त्या रोखानें जात नाहीं.

**राऊत**--घोडेस्वार.

**राजी**--तयार; कबूल.

**रिझाला**--रमला.

**रिझावें**--रमावें.

**रूपातीत**--व्यवहारकाळीं कोणत्या तरी रूपाचा आश्रय असतां त्या रूपाहून भिन्नरूपाविषयीं जें स्मरण तें रूपातीतत्व.

**रंभास्तंभ**--केळीचा खुंट.

**लगन**--लग्न, चिकटलेला.

**लय**--तद्रूपता.

**लाय**--लाहे, लाभे.

**लाव**--लाभ.

**लासून घेतो**--डागून घेतो.

**लुंचित**--कापलेलें.

**लेपें**--आवरणें.

**वाय**--वहातो, अर्पण करतो.

**वंग**--फूट, किडाळ.

**विचंविला**--श्रमी केला, हैराण केला.

**वितराग**--प्रेम गेलें आहे असें.

**विषयबाधान**--विषयबाधेच्या योगानें.

**विषद्‌बोध विदाता**--स्पष्ट बोध देणारा.

**व्यक्ति**--प्रादुर्भाव, स्पष्ट दशेला येणें.

**व्योम**--आकाश.

**वोखें**--वाईट.

**शमुनि**--शांत होऊन.

**श्रीहाट**--ब्रह्मरंध्र सहस्रदळकमळ म्हणून योगशास्त्रोक्त स्थान.

**सकळांसि 'गणी' तें मीपण**--गणी-समावेश करितें. नामरूप अवस्था, लिंगवर्ण इत्यादिकांचें भान होण्यापूर्वीचें जें स्फुरण तें.

**सद्भाव**--नित्य आणि अनित्य या दोहींही अवस्थांस अधिष्ठानभूत अशी जी सहज अवस्था ती सदैव ध्यानीं धरणें.

**सम तुक**--सारख्या योग्यतेचा.

**सवें**--बरोबर, सह.

**सहज निज निर्भरू**--अकृत्रिम असा जो आत्मा त्याचे ठायीं पूर्ण रमलेला.

**सहा**--षड्शास्त्रें.

**सादान**--मोठ्यानें हाक मारणें.

**सीताराम**--या चार अक्षरांवर चार कडवीं रचिलीं आहेत. (पृ. ५२ प. ८३)

**सुणें**--कुत्रें.

**सुये** घालतो, चढवितो.

**सुरवाडें** सुखानें.

**सैंधव** मीठ.

**स्वगत**--स्वगत, सजातीय व विजातीय हे त्रिविध भेद होत. वृक्षाचीं पानें व पुष्पें यांमधील भेद स्वगत होय. दोन निरनिराळ्या वृक्षांमधील भेद तो सजातीय, व दगड, माती व वृक्ष यांमधील भेद तो विजातीय होय.

**स्वार्थ साधनान**--स्वार्थसाधनासाठी.

**षड्चक्रें**--योगशास्त्रोक्त सहाचक्रें.

**हरिख**--हर्ष, आनंद.

**हालचि**--अत्यंत मारक विष.

**हेळतां**- हेळसांड करतां.

**हेळाडू**--अपेक्षा करणारा.

**हेळुनी**--तिरस्कार करून.

**होवरी**--खोली.

**ज्ञानअनंग**--ज्ञानरूपी मदन.

[ कविता-संग्रह छापून झाल्यावर पहाण्यांत आलेलें पद. ]

पद.

कवणाचा कोण हा कोठील जाणोनियां नेणो कीं जी । जाणिवेसीं नेणपण लया गेलें निजनिजीं ॥ ध्रु० ॥ सत्ता जेथ हारपली माध्यानीं जैसी साउली । मन बुद्धि हे ठकलि नसोनि जी ॥ १ ॥ नाहीं माय नाहीं बाप नाहीं रेख नाहीं रूप । रूपाचा हा स्वयें दीप न लपवितां लाविला उमजोनि जी ॥ २ ॥ सेखींचें सुख हारपे जेथ नामरूपाचा चळथ । निरालंबीं पहुडे नाथ अरुवार उन्मनीसेजीं ॥ ३ ॥ सोहिरा म्हणे धरोनि सोडा कल्पनेचा करोनि धोंडा । धांव घ्या महाशून्यामाजीं ॥ ४ ॥

## गुरुवर्य श्रीरामचंद्र शंकर टाकी, बी. ए.,
### रिटायर्ड डेप्युटी एज्युकेशनल् इन्स्पेक्टर, मुंबई,
### यांनीं लिहिलेले ग्रंथ.

(१) **पुरुषार्थदीपिकाः**--यांत परमार्थप्राप्तीकरतां काय केलें पाहिजे हें श्रुति, स्मृति, पुराणें व साधुसंत यांच्या अवतरणांच्या आधारें दाखविलें आहे. पृ. सं. ७००, बांधणी कापडी, किं. रु. ३, ट. ख. वेगळा.

(२) **ज्ञानेश्वरमहाराज** अथवा **सद्भक्ति-विजयः**—या ग्रंथांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र व त्यांचें अवतारकार्य यांचें विवेचन नऊ समासांत केलें आहे व पांच सुंदर चित्रेंही दिलीं आहेत. पृ. सं. २२०, बांधणी कागदी, किं. रु. १.

(३) **भगवद्भजनः**—यांत सद्भक्ति मंदिरांतील नित्य उपासनाक्रम संगतवार आला असून वामनपंडितांची भगवद्गीता-समश्लोकी व करुणाष्टकें; श्रीनारायणमहाराजांचीं गुरुपादुकाष्टक, बोधाष्टक, चिद्रत्नमाला, विचारमालादि स्तोत्रें; रामदास व शिवरामस्वामींच्या 'भूपाळया;' एकनाथमहाराजांची 'संध्या;' तुकाराममहाराजांची 'पूजा' व सोहिरोबादि संतांचीं 'भजनें' यांचाही समावेश या लहानशा पुस्तकांत झाल्यामुळें तें नित्यक्रमयोग्य झालें आहे. चतुर्थावृत्ति पृ. सं. ५८, बांधणी कागदी, किं. ४ आणे, ट. ख. वेगळा.

(४) **करुणासागरः**—यांत कर्म, उपासना, ज्ञान, भक्ति वगैरे सर्व कांहीं परमार्थविषय आले असून सबंध ग्रंथ भक्तिरसानें ओथंबलेला आहे. पृ. सं. १६५, बांधणी कागदी, किं. १२ आणे, ट. ख. वेगळा.

(५) **बोधसागरः**—मनोभूमिका अतिशुद्ध झाली आहे अशा सच्छिष्यास सद्गुरूनें केलेला संवादरूपी गद्यात्मक बोध ह्या पुस्तकांत दिला आहे. पृ. सं. २०, किं. ४ आणे, ट. ख. निराळा.

(६) **कैवल्यसागरः**—हा सागर जरी बोधसागराचीच प्रतिकृति आहे, तथापि यांतील सर्व सिद्धांत श्रुति, स्मृति, पुराणांमधील भरपूर आधार देऊन स्थापित केले असल्यामुळें तो विद्वज्जनांस विशेष मान्य होण्यासारखा झाला आहे. पृ. सं. ५०, किं. ४ आणे, ट. ख. वेगळा.

(७) **ज्ञानसागरः**—या सागरांत विपरीतज्ञानाचें खंडन करून ज्ञानतत्त्वाचें निरूपण पांच तरंगांत केलें आहे. पृ. सं. ८१, किं. ८ आणे, ट. ख. वेगळा.

**(1) AMOURISM or PREMAMRITA.**—This is quite a readable and inspiring book on the subject of Devotional Love, containing learned and yet easily intelligible discourses on the only

safe path to Salvation. Pages 255. Price—*Cloth bound Rs. 3/-; Paper bound Rs. 2/-. Postage extra.*

**Prabuddha Bharata** (October 1922):—"This is a learned treatise on the Religion of Love. The whole book breathes a spirit of catholicity which is rather rare to meet with in works of this type. The author supports his conclusions by numerous quotations from the scriptures and sayings of the saints and teachers of all religions. Passages from the works of renowned philosophical and religious writers of the West have also been freely quoted."

**(2) DE CARMINE DEI DEORUM or ON THE SONG OF THE GOD OF GODS.**—This is an exhaustive Commentary in English on the Bhagavad-Gita in three Volumes. Pages 1205. *Price—Cloth bound Rs. 10/-; Paper bound in One Volume Rs. 7/-. Postage extra.*

**Mr. Rag. L. G. Zopegni, Corino, Italy:**—"These books are of the most learned and deep character, throw a wonderful light on the Hindu Systems of Philosophy and Theosophy and show in many places the beauty of your ancient Vedas. I am very proud to be the possessor of such grand books. I have given them to read to a University Professor and while he has not read them through yet, he has told me that it is a great pity that such a wonderful book should be nearly unknown in Europe."

**'सद्भक्ति-प्रकाश' मासिक:**—या मासिकांत फक्त सद्भक्तींत किंवा ज्ञानयुक्त भक्तींत समावेश होणारीं व सर्व धर्मांस व पंथांस संमत असलेलीं अशीं जीं मोक्ष-साधनें भक्ति ज्ञान वैराग्य यांना परिपोषक असेच विषय घेतले जातात. श्रीज्ञानेश्वर-महाराज, एकनाथमहाराज, समर्थ, तुकाराममहाराज आदिकरून भगवद्भक्तांनीं आपापल्या ग्रंथांतून केलेल्या उपदेशामृताचें सार, संतांचीं चरित्रें व छायाचित्रें वगैरे या मासिकांतून दर महिन्यास प्रसिद्ध होतात. मासिकाच्या अंतरंगाप्रमाणेंच बहिरंगही फार मोहक असतें. वार्षिक वर्गणी रु. ३. वर्षारंभ अक्टोबरपासून होतो.

"आपलें मासिक संतांचे नजरेखालीं सत्कविसेवा उत्तम करीत आहे, हें पाहून आनंद वाटतो."—"**मुमुक्षु.**"

"मासिकांतील सुंदर चरित्रें व ज्ञानानें पूर्ण, अतिसुंदर निरूपण वाचून मन रंगून जातें."—"**दिनकर.**"

पुस्तकें मिळण्याचें ठिकाण:—

**सद्भक्ति-प्रकाश प्रिंटिंग प्रेस,**
३९, नानाभाई लेन, कोट, **मुंबई.**

प्रकाशक:- **सद्भक्ति प्रसारक मंडळी,**
श्रीशंकर लॉज, सरस्वतीबाग,
**जोगेश्वरी (मुंबई उपनगर)**